


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ पुरस्कृत मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादन समिती : डॉ. अशोक रा. केळकर, प्रा. म. ना. अदवंत, प्रा. द. मा. मिरासदार, श्री. शंकर सारडा, डॉ. भीमराव कुलकर्णी
जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९७२ पौष-माघ-फाल्गुन १८९३ मूल्य तीन रुपये
प्रसिद्धि-दिनांक २० मार्च १९७२ संपादक : डॉ. स. गं. मालशे

---

## अनुक्रमणिका



---

# म. सा. परिषदेचे साहित्य संमेलन : कल्याण १९७२

म. सा. परिषदेचे १९७२ चे साहित्य संमेलन कल्याण येथे एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यात भरणार आहे. साहित्य-संमेलनाचे उद्घाटन दि. २० एप्रिल रोजी होणार असून साहित्य संमेलनाबरोबरच मराठी नाट्यसंमेलनाचे अधिवेशनही आयोजित करण्यात आले आहे. नाट्य संमेलनाचे उद्घाटन दि. १९ एप्रिलला होईल.

हे संमेलन कल्याणच्या ' मराठी साहित्य मंदिर ' या संस्थेतर्फे भरविण्यात येणार असून संस्थेच्या कार्यकर्त्यांनी उत्साहाने सारी तयारी केली आहे.

साहित्य-संमेलन व नाट्यसंमेलन यांचा १९ एप्रिल ते २३ एप्रिल असा भरगच्च कार्यक्रम संस्थेने योजिलेला आहे. चर्चा, परिसंवाद, भाषणे, अभिरूप न्यायालय, कवि-संमेलन आणि नाटके, गायन व सहल असे त्याचे स्वरूप राहील.

दोन्ही संमेलनांचे संयुक्त शुल्क खालील प्रमाणे राहील :—

( १ ) प्रतिनिधी शुल्क रु. ५ ( २ ) निवास व भोजन शुल्क रु. २५ (पाच दिवसांकरिता व रु. १८ तीन दिवसांकरिता:) ( ३ ) करमणुकीच्या कार्यक्रमाचे शुल्क रु. ३०, १५ व १० ( चार कार्यक्रमांची संयुक्तपत्रिका ) ( ४ ) सहल शुल्क रु. १०

अशा तऱ्हेचे संयुक्त संमेलन महाराष्ट्रात प्रथम कल्याणलाच भरत आहे. कल्याण हे मोठे शहर असून पुणे, मुंबई, नाशिक वगैरे सारख्या मोठ्या शहरांना मध्यवर्ती ठिकाण आहे. येथे येण्यास रेल्वे व राज्यपरिवहन मंडळाची उत्तम सोय आहे. तरी सर्व साहित्यप्रेमी व नाट्यप्रेमी रसिकांनी या संमेलनांस उपस्थित राहून ही संमेलने यशस्वी करावी अशी विनंती आहे.

रा. शं. यार्दी
वा. ना. उपासनी
द. रा. पुराणिक
कार्याध्यक्ष

डॉ. रा. शं. वाळिंबे,
श्री. ग. ल. ठोकळ कार्याध्यक्ष
डॉ. भीमराव कुलकर्णी
डॉ. वि. म. कुलकर्णी कार्यवाह
म. सा. परिषद, पुणे

मराठी साहित्य मंदिर, कल्याण

पत्र व्यवहाराचा पत्ता :– श्री. रा. शं. यार्दी, रामवाडी, टिळक चौक कल्याण, जि० ठाणे.

संमेलन शुल्क परिषदेतही स्वीकारण्यात येईल.

## संपादकीय

### स. गं. मालशे

### माधवानुजांची जन्मशताब्दी

कै. काशिनाथ हरी मोडक ऊर्फ कवि माधवानुज यांची जन्मशताब्दी १६ मार्च १९७२ रोजी आहे. कविश्रेष्ठ केशवसुतांनी आधुनिक कवितेची तुतारी फुंकली आणि त्यांच्या झेंड्याखाली जी कविमंडळी गोळा झाली त्यांपैकी माधवानुज हे एक होत. ज्यांचे अनुज म्हणून 'माधवानुज' हे नाव त्यांनी मिरविले त्या माधवराव मोडकांचा आणि केशवसुतांचा स्नेह होता. माधवानुजांची आणि केशवसुतांचीही पुढे मैत्री झाली. माधवानुज स्वतःला केशवसुतांचे शिष्य म्हणवीत हे खरे असले, तरी माधवानुजांच्या कवितेची प्रकृती बरीच भिन्न आहे. 'मूर्तिभंजन', 'रूढीचा प्रभाव' या कवितांचा तोंडवळा केशवसुती वाटला, तरी केशवसुतांची भावनोत्कटता आणि ओजस्वीपणा त्यात नाही. माधवानुजांचे वैशिष्ट्य प्रसाद, साधेपणा, साध्या विषयातून केलेले चिंतन हे आहे. 'कृष्णाकोयनासंगम' 'दीपविसर्जन' यांसारख्या त्यांच्या कविता रसिकांच्या जिव्हाग्री वसल्या, त्या यामुळेच. 'स्थितीचा असे किंकर प्राणिमात्र । स्थिती त्या करी पात्र किंवा अपात्र' असे अर्थान्तरन्यास त्यांना सहज सुचत असत. निसर्गप्रेमातून स्फुरलेल्या कवितेतही हे बोधपर चिंतन दिसून येते. त्यांना अलंकरणाचा सोस मुळीच नव्हता. आधुनिक कवितेच्या या सच्च्या भक्ताच्या पुण्य-स्मृतीस जन्मशताब्दीनिमित्त प्रणाम !

### अभिनंदन

### डॉ. शं. दा. पेंडसे

गेल्या २८ फेब्रुवारीला म. सा. परिषदेचे एक जवळचे ऋणानुबंधी डॉ. शं. दा. पेंडसे यांना पंचात्तर वर्षे पूर्ण झाली. सध्या डॉ. पेंडसे हे पुणेकर झाले असले, तरी त्यांची कर्मभूमी नागपूर होती. पश्चिम महाराष्ट्र आणि विदर्भ या दोन साहित्य-विश्वांना जोडणारा दुवा म्हणून डॉ. पेंडसे यांनी मोलाचे कार्य केलेले आहे.

डॉ. पेंडसे यांचा जन्म कोकणात खेडला झाला. शिक्षणासाठी ते वाशीमला होते. पण १९०८ साली लोकमान्य टिळकांच्या शिक्षेच्या निषेधार्थ हरताळ पाळल्या-

मुळे सरकारी शाळांचे दरवाजे त्यांना बंद झाले. मग खाजगी पाठशाळांतून स्वतःच्या धडपडीने त्यांनी तत्त्वज्ञान विषयाच्या वेदान्ततीर्थ आणि शास्त्री या पदव्या संपादन केल्या. प्रभावशाली वक्ते आणि प्रवचनकार म्हणूनही त्यांचा बोलबाला झाला आणि १९२७ साली ते नागपूरच्या हिस्लॉप महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक झाले. प्राध्यापकी करीत असतानाच त्यांनी 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' हा त्यांचा सर्वोत्तम ग्रंथ लिहून पीएच्.डी. ही पदवी मिळविली (१९३९). १९५५ साली पंढरपूरच्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांनी 'कर्मयोग की कर्मसंन्यास,' 'लो. टिळकांची धर्म-विषयक मते,' 'समर्थ रामदास आणि त्यांचे आक्षेपक,' 'श्रीज्ञानेश आणि शैवागम' अशा लेखमाला लिहिल्या. तसेच महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान, हिंदुस्थानातील धार्मिक इतिहासाचे सामान्य निरीक्षण, ज्ञानेश्वरीचा अभ्यास, वैदिक वाङ्मयातील भागवतधर्माचा विकास, पौराणिक भागवतधर्म या त्यांच्या व्यासंगी ग्रंथरचनेने सांस्कृतिक इतिहास आणि तत्त्वज्ञान या क्षेत्रात उत्कृष्ट भर घातलेली आहे.

स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा यांचा त्यांना गाढा अभिमान. विद्वत्ता, व्यक्ति-मत्त्व आणि वक्तृत्व या बळांवर त्यांनी अनेक सभासंमेलने गाजविली आहेत. त्यांच्या वाणीच्या प्रभावाचे एक उदाहरण आठवते. १९४३ साली मे महिन्यात वीर सावरकरांना एकसष्ठीच्या निमित्ताने एक मानपत्र पुण्याच्या गोखले-सभागृहात मराठी साहित्य-संस्थांच्या विद्यमाने देण्यात आले. हे मानपत्र डॉ. पेंडसे यांनी अशा ओजस्वी ठसक्यात वाचले की वाचन संपताच टाळ्यांचा कडकडाट झाला! सध्या या उतार वयात 'महाराष्ट्राचा भागवतधर्म' ही ग्रंथमालिका त्यांनी हाती घेतली आहे. 'ज्ञानदेव, नामदेव' आणि 'एकनाथ' हे या मालिकेतले ग्रंथ बाहेर पडलेले आहेत. त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो आणि त्यांनी संकल्पिलेली ग्रंथरचना त्यांच्या हातून पूर्ण होवो, अशा शुभेच्छा, या प्रसंगी व्यक्त करून आम्ही त्यांचे आशीर्वाद मागतो.

## डॉ. रा. शं वाळिंबे

म. सा. परिषदेचे सन्माननीय कार्याध्यक्ष आणि मराठीतील नामवंत समीक्षक डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या वयाला ९ नोव्हेंबर १९७१ या दिवशी साठ वर्षे पूर्ण होऊन त्यांनी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले, याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. डॉ. वाळिंबे म्हणजे अखंड कार्योत्साह! कधीही पाहा, अध्ययन, अध्यापन, व्याख्यान, वादविवाद, परिसंवाद, नाही तर साहित्य परिषदेसारख्या एखाद्या संस्थेची बैठक यात ते बुडून गलेले दिसतील. इतके असूनही त्यांच्या लेखनाचा वेग मंदावलेला नाही. आपल्या विद्यार्थ्यांविषयी, आपल्या प्राध्यापकाच्या पेशाविषयी आणि तदनुषंगाने साहित्य आणि कला यांविषयी त्यांना कमालीची कळकळ आहे. पाणी जसे खड्डा भरून पुढे जात असते, त्याप्रमाणे मराठी विषयाच्या अध्यापनाच्या साधनात ज्या ज्या

उणिवा, त्यांना जाणवल्या, त्या त्या भरून काढण्यासाठी ते पुढे सरसावलेले दिसतील. याच गरजेतून त्यांनी पाश्चात्त्य आणि पौरस्त्य साहित्य सिद्धान्तांचे आलोडण करून सैद्धान्तिक आणि प्रायोजित अशा उभयविध समीक्षाप्रकारांत मोलाची भर घातली आहे. साहित्याचा ध्रुवतारा, वाङ्मयीन टीका, साहित्यातील संप्रदाय, साहित्यातील ग्राम्य आणि अश्लील, मराठी नाट्यसमीक्षा हे त्यांचे तात्त्विक ग्रंथ तसेच ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती, गडकऱ्यांचे अंतरंग, नाटककार गडकरी, बालकवी हे त्यांचे ग्रंथकारांचे अभ्यास यांची दखल घेतल्यावाचून मराठी विषयाची पदवी पदरात पाडणे, आज अशक्य झालेले आहे. याशिवाय काव्यनाटकांच्या पुस्तकांच्या विवेचक प्रस्तावना तर अनेक आहेत. स्फुट लेखांची संख्याही थोडीथोडकी नाही. गेली दोन तपे केलेल्या बहुविध लेखनामुळे समीक्षेच्या क्षेत्रात त्यांनी स्वतःला एक स्वतंत्र स्थान प्राप्त करून घेतले आहे.

मराठी विषयाच्या प्राध्यापकांत आणि समीक्षकांत बहुधा संस्कृतच्या व्यासंगाविषयी आणि एकंदर संशोधन-संकलनकार्याविषयी अनास्था आढळते. डॉ. वाळिंब्यांच्या ठायी ही अनास्था सुतराम् नाही की कष्टांचा कंटाळा नाही. ' एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना ' किंवा ' प्राचीन भारतीय कला : इतिहास आणि रूपदर्शन ' या त्यांच्या ग्रंथांमध्ये याचा प्रत्यय आल्यावाचून राहात नाही.

डॉ. वाळिंब्यांची वृत्ती मनस्वी आणि वक्तृत्व प्रभावी. अस्खलित वाणी, अद्भुत स्मरणशक्ती, अफाट पाठांतर, शब्दप्रभुत्व आणि स्वमताविषयी आग्रह यामुळे त्यांचे साधे साहित्यविषयक व्याख्यानही आवेशी असते. मग वाङ्मयातली बीभत्सता किंवा अश्लीलता यांसारखा विषय असला की पाहायलाच नको. अशा वेळी या वाग्भटाचे व्याख्यान लढाऊ पवित्र्यात उभे राहून द्रुतगतीने बाणामधून बाण सोडणाऱ्या योद्ध्याच्या शरसंधानासारखे भासते ! महाभारतावर अलीकडे झालेले लालित्यपूर्ण लेखन विपर्यस्त आहे, असे त्यांचे प्रामाणिक मत आहे. ' सीमावृक्ष ' आणि ' राधेय कर्ण ' ही त्यांची पुस्तके ही त्याचीच प्रतिक्रिया. या त्यांच्या पुस्तकांविषयी कोणाचे कितीही मतभेद असले, तरी त्यांत दिसून येणारी सत्यान्वेषी संशोधकी वृत्ती आणि स्वमताच्या मंडणासाठी त्यांनी घेतलेले अपार कष्ट कोणालाही नाकारता येणार नाहीत.

त्यांनी जमविलेले दुर्मिळ ग्रंथ आणि असंख्य टिपणे पानशेतच्या पुरात वाहून गेली. त्यांच्या संकल्पित ग्रंथांवर अक्षरशः पाणी पडल्यागत झाले. या ग्रंथवेड्या गृहस्थाच्या चेहऱ्यावरचा काळजाला चिमटा घेणारा भिंगुळवाणा भाव ज्यांनी प्रत्यक्ष पाहिलेला असेल, त्यांनाच त्यांच्या त्या काळच्या भग्नमनस्कतेची खरीखुरी कल्पना येईल. परंतु थोड्याच काळात ते सावरले. ' की तोडिला तरु फुटे अणखी भराने ' या



अनुक्रमणिका

न्यायाने ' पुनश्च हरिः ॐ ' म्हणून त्यांनी भरताच्या नाट्यशास्त्रावरील टिपणे करण्यास दुप्पट जोमाने प्रारंभ केला.

अशा या व्यासंगी विद्वानाला आणि परिषदेच्या आधारस्तंभाला दीर्घायुरारोग्य लाभो आणि त्यांच्या परिणतप्रज्ञेच्या विलासांनी महाराष्ट्र सारस्वत उत्तरोत्तर अधिकाधिक समृद्ध होवो अशी शुभेच्छा आम्ही या प्रसंगी व्यक्त करतो.

## कुसुमाग्रज

विष्णु वामन शिरवाडकर अर्थात कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांच्या वयाला २७ फेब्रुवारी रोजी साठ वर्षे पूर्ण झाली. काव्य, नाटक, कादंबरी, लघुकथा, लघुनिबंध अशा ललित लेखनाच्या विविध प्रकारांत लक्षणीय भर घालणाऱ्या या मराठी सरस्वतीच्या अग्रेसर मानकऱ्याचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो.

नाशिकच्या गोदामाईच्या पाण्याचा गुण असा काही विलक्षण असला पाहिजे, की तिचे स्तन्य पिऊन धन्य झालेल्या प्रतिभेला भव्यदिव्याचे आकर्षण वाटावे. सावरकर–गोविंदांचा वारसा मागे असलेल्या व पुढे साम्यवादी विचारसरणीने भारलेल्या तरुण कुसुमाग्रजांनी डमडमच्या तुरुंगातील कैद्यांचे मनोगत म्हणून ' क्रांतीचा जयजयकार ' घुमविला आणि महाराष्ट्राचे चित्त प्रथम ओढून घेतले. त्यानंतर पृथ्वीचे प्रेमगीत, अग्निकुल, स्वप्नाची समाप्ती यांसारख्या केशवसुत-गोविंदाग्रजांच्या स्वच्छंदतेचा आणि अभिजाततेचा संगम झालेल्या त्यांच्या कवितांनी रसिकांवर कायमची मोहिनी टाकली. जीवनलहरी, विशाखा, किनारा, मराठी माती, स्वगत, हिमरेषा हे यांचे संग्रह एकामागून एक प्रसिद्ध झाले. उपेक्षित मानवतेविषयी सहानुभूती, राष्ट्रीय आकांक्षांचे भान, उत्कट प्रणयभावना हे त्यांच्या कवितेतील आशयाचे गुण; तर ओजस्वी रेखीव शब्दशिल्प आणि उत्तुंग कल्पनाविलास हे अभिव्यक्तीचे गुण. अशा गुणसंपन्न कवितेने कुसुमाग्रजांचे महाराष्ट्र कविमंडळातले स्थान अढळ झाले आणि १९६४ मध्ये मडगाव येथील मराठी साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदाची माळ गळयात घालून महाराष्ट्रीय रसिकतेने त्यांचा यथोचित गौरवही केलेला आहे.

पूर्वीच्या नाटकमंडळयांच्या जमान्यात सर्वच नाटककारांना ' कवि ' म्हणण्याची पद्धत होती. पण ती पदवी खरीखुरी लागू होईल दोघां नाटककारांनाच : गोविंदाग्रजांना आणि कुसुमाग्रजांना. काव्य आणि नाटक या दोन्ही क्षेत्रांत असाधारण यश मिळविणारे सव्यसाची लेखक हे दोघेच. दूरचे दिवे, वैजयन्ती, राजमुकुट, ऑथेल्लो ही कुसुमाग्रजांची रूपांतरित व भाषांतरित नाटके. दुसरा पेशवा, कौन्तेय, ययाति आणि देवयानी, वीज म्हणाली धरतीला, आमचं नाव बाबूराव, नटसम्राट ही त्यांची स्वतंत्र नाटके. यांतले ' आमचं नाव बाबूराव ' हे एकच नाटक हास्यप्रधान आहे; बाकीची गंभीर प्रकृतीची आहेत. गडकऱ्यांप्रमाणे कुसुमाग्रजांनाही त्यागाचे, कारुण्याचे जबरदस्त










आकर्षण आहे. थोरल्या बाजीरावासारख्या पराक्रमी पेशव्याची अगतिकता, कर्णासारख्या धुरंधराची कुचंबणा, राणी लक्ष्मीबाईची हाराकिरी, ययातीची तगमग, नटसम्राट बेलवलकरांची किंग लियरसारखी वंचना या सनातन व्यथांनीच त्यांच्या कविमनाला आवाहन केले. त्यांची नाट्यवस्तू आणि एकूण साचा खाडिलकरी असला, तरी त्यांची भाषेची लयबद्धता गडकरी पद्धतीची, देखणी आहे. राम गणेशांच्या नामदेव–पायरीला प्रणाम करून आपण वाङ्मयाच्या विठ्ठलमंदिरात प्रवेश केला, अशा आशयाचे त्यांचे उद्गार यथार्थच म्हटले पाहिजेत.

त्यांची गृहस्वामिनी नुकतीच त्यांना सोडून गेली. या कौटुंबिक दुःखात त्यांचे असंख्य चाहते सहभागी आहेत, हे ध्यानात घेऊन त्यांचे दुःख हलके होवो आणि त्यांच्या प्रतिभेचे तेज उत्तरोत्तर वर्धिष्णू होत जावो, अशी इच्छा त्यांच्या षष्ट्यब्दीपूर्तीच्या निमित्ताने आम्ही व्यक्त करतो.

## दुर्गा भागवत

दुर्गा भागवत यांच्या ' पैस ' या ललित लेखांच्या संग्रहाला गतवर्षीचे साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

धर्म, इतिहास, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, व्याकरण, मानववंशशास्त्र, लोकसाहित्य, समीक्षा इत्यादी विविध विषयांत दुर्गाबाईंना गती आहे. किंबहुना या ' साहित्य दुर्गेला ' दुर्गम असे काहीच वाटत नसावे. ' नास्ति कश्चित् अविषयो नाम ' असाच दुर्गाबाईंचा व्यासंग आहे. दुसरे वैशिष्ट्य असे की, संशोधनात्मक व्यासंगी लेखनाला लागणारा चिकित्सकपणा आणि विश्लेषक दृष्टी व ललित साहित्यनिर्मितीला लागणारी संवेदनाशीलता आणि संश्लेषक वृत्ती ह्या सहसा एकत्र न आढळणाऱ्या परस्परविरोधी गोष्टींचा त्यांच्या ठायी संगम झालेला आहे. त्या सामाजिक प्रश्नांची चर्चा जितक्या सडेतोडपणे करतात, तितक्याच तन्मयतेने निसर्गाची गूढे उकलून दाखवितात. त्यांनी महाराष्ट्रातील एक थोर समाजक्रांतिकारक राजारामशास्त्री भागवत यांचे चरित्र लिहिले आणि त्यांचे निवडक लेख संपादित केले. राजारामशास्त्र्यांचा सडेतोडपणा त्यांच्या वृत्तीत आहे. १९५६ साली प्रसिद्ध झालेल्या ' लोकसाहित्याची रूपरेषा ' या ग्रंथात त्यांच्या लोकसाहित्याच्या दीर्घ अभ्यासाचा अर्कच साठविलेला आहे, तर ' केतकरी कादंबरी ' हा टीकाग्रंथ त्यांच्या स्वतंत्र समीक्षादृष्टीचा द्योतक आहे. मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांत त्यांनी संशोधनात्मक लेखन केले आहे आणि ते विद्वन्मान्य झाले आहे. परंतु मराठी रसिकांच्या मनांत त्यांनी जे जिव्हाळ्याचे स्थान पटकावले आहे, ते ऋतुचक्र, पूर्वा, भावमुद्रा, व्यासपर्व, पैस या ललित गद्यात्मक पुस्तकांमुळेच. या लेखनामागेही तत्त्वचिंतन आणि सत्यान्वेषक सामाजिक दृष्टी नाही, असे नाही, पण ती मनात मुरवण होऊन भाव-

सत्याच्या सांद्ररूपाने बाहेर पडलेली आहे. ' पैस ' मध्ये ' स्वच्छंद ' म्हणून प्रास्ताविक प्रकरण आहे. त्यांत दुर्गाबाईंनी आपल्या ललित लेखनामागचे रहस्य अतिशय ललितरम्य रीतीने कथन केले आहे. मरगळलेल्या मनाने त्या रुग्णशय्येवर पहुडलेल्या होत्या. अकस्मात त्यांचे निसर्गप्रेम जागृत झाले. आपल्या स्फूर्तीच्या प्रारंभक्षणांचा हलुवार अनुभव त्यांनी तितक्याच हलुवार शब्दांत पकडला आहे. ते शब्द असे : " संस्कृतातल्या दक्षिणानिलाला मी हसत असे. पण उन्हाळ्यातल्या तप्त वातावरणात, पान नि पान स्तब्ध उभे असताना ही मंदशीतळ झुळूक आली आणि ती सरळ माझ्या अधरांत शिरली. केवळ भावनावेगानेच स्पंदन पावणारा अधर आता हा आपोआप फुलल्यासारखा भरला; त्यात जोराने रक्त वाहू लागले. काही क्षणांचा हा अनुभव; पण सुख सुख म्हणजे काय, असे मला कुणी विचारले, तर वाऱ्याची झुळूक हलुवारपणे अधराला अनाहूत स्पर्श करते नि त्यात खेळते, ते खरे सुख असे मी सांगेन. तेव्हापासून मला आकाश बदललेले दिसले " इ. इ. लोकसाहित्यावर पोसलेली, अर्थगर्भ, प्रसन्न आणि लवचीक अशी त्यांची शैली असल्यामुळे त्यांच्या चिंतनशीलतेला रूक्षपणा येत नाही. ' रूपधर फाल्गुन ' ' कोंडलेले क्षितिज ' ' पैसाचा खांब ' ' ऊनपारखी ' ' मोहरीतली ठिणगी ' यांसारखे त्यांच्या लेखांचे मथळेच किती अन्वर्थक वाटतात. लतेच्या पानावर थबकून राहिलेल्या दवबिंदूत सभोवतीचे ताटवे प्रतिबिंबावे तसे ह्या मथळ्यांत साऱ्या लेखाचेच मर्म हाती आल्यासारखे वाटते. अशा लालित्याचा सन्मान करण्याची गुणज्ञता अकादमीने दाखविली याबद्दल दुर्गाबाईंबरोबर अकादमीचेही अभिनंदन !

## द. र. कोपर्डेकर

मराठीतले एक ध्येयनिष्ठ प्रकाशक श्री. दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर यांची १ डिसेंबर १९७१ रोजी षष्ठ्यब्दीपूर्ती झाली. कोपर्डेकरांचा जन्म प्राचीन कविश्रेष्ठ कृष्ण दयार्णव यांच्या कुळात झाला. तेव्हा कृष्णदयार्णवांच्या ' हरिवरदा ' कडे त्यांचे लक्ष जावे हे साहजिकच, पण ' हरिवरदा ' हा ग्रंथ ९० अध्यायांचा आणि बेचाळीस सहस्र ओव्यांचा. प्रकाशनासाठी तीसपस्तीस सहस्र रुपये लागणार होते. पण कोपर्डेकरांची जिद्द दांडगी. त्यांनी शं. ना. जोशी, डॉ. राहुरकर, रा. चिं. ढेरे प्रभृति विद्वानांचे संपादन-साहाय्य मिळवून १९५५ साली ' हरिवरदा ' हा बृहद्ग्रंथ आठ खंडांत प्रसिद्ध केला. एका परीने त्यांनी हे पितृऋण फेडले असले, तरी दुर्मिळ झालेला रसाळ ग्रंथ नव्या पिढीच्या हाती पडावा हाही व्यापक हेतू त्यात होता. कोपर्डेकरांनी स्वातंत्र्यलढ्यात विद्यार्थिदशेत भाग घेतलेला होता, ' चलेजाव 'च्या काळात भूमिगतांना आश्रयही दिला होता. असा त्यांचा एकूण पिंड राष्ट्रीय वृत्तीचा; तेव्हा ' देशऋण ' फेडण्याच्या दृष्टीने सानेगुरुजींचे बालवाङ्मय बाळगोपाळांच्या हाती पडावे आणि त्यांचे

मने सुसंस्कारित व्हावी, असे त्यांना मनोमन वाटले. त्यांनी साने गुरुजींच्या वाङ्मया-बरोबरच काव्य, कथा, चरित्र, वैचारिक निबंध असे विविध प्रकारचे सकस प्रकाशन केलेले आहे. इंद्रायणी हे उच्च श्रेणीचे मासिक त्यांनी दोन वर्षे चालवून पाहिले. पण तो आतबट्टयाचा व्यवहार ठरला. आता चिरंजिवांवर प्रकाशनाचा व्यवसाय सोपवून दयार्णवपंत निवृत्त झाले आहेत. या सात्त्विक प्रकाशकाचे भावी जीवन सुखासमाधानाचे जावो, अशी इच्छा आम्ही या शुभप्रसंगी व्यक्त करतो.

श्रद्धांजलि

## कै. ताराशंकर बंदोपाध्याय

१४ सप्टेंबर १९७१ रोजी विख्यात बंगलेखक ताराशंकर बंदोपाध्याय यांचे कलकत्ता येथे वयाच्या ७३ व्या वर्षी निधन झाले आणि बंगालीच नव्हे, तर भारतीय वाङ्मयविश्वात फार मोठी पोकळी निर्माण झाली.

कै. ताराशंकरांचा जन्म पश्चिम बंगालमधील लाभपूर खेड्यात एका सुसंस्कृत जमीनदार कुळात २३ जुलै १८९८ रोजी झाला. क्रांतिकारक चळवळीत पडल्यामुळे त्यांच्यावर संचारबंदी आली आणि त्यांच्या पुस्तकी शिक्षणात खंड पडला.

पण ताराशंकरांच्या मनात ज्वलंत राष्ट्रभावना धगधगत होती. त्यांनी राजकीय चळवळीत जातीने भाग घेतला. मिठाच्या सत्याग्रहाच्या वेळी त्यांना कारावासही घडला. या चळवळीच्या निमित्ताने जनजागृती करण्यासाठी त्यांना आपल्या बिरभूम जिल्ह्यात संचार करावा लागला. त्यांनी ह्या जिल्ह्यातले खेडेन् खेडे पालथे घातले. जनतेची हलाखीची स्थिती त्यांना जवळून पाहता आली. बिरभूम जिल्ह्यात वैष्णव आणि तांत्रिक पंथाचा पगडा फार होता. नव्या उद्योगधंद्यांच्या उदयाबरोबर गरीब जनतेची नि विशेषतः आदिवासींची पिळवणूक वाढू लागली. दारिद्र्याने आणि अज्ञानाने हीनदीन अवस्थेत जगणारे आदिवासी पाहून ते अस्वस्थ झाले. दलितांचा कैवार घेऊन त्यांचे मन उचंबळून उठले. ताराशंकरांच्या कथाकादंबरीत त्याचेच विदारक आणि जिवंत दर्शन पाहावयास सापडते.

रवींद्रोत्तर बंगाली साहित्यात तीन बंदोपाध्याय विशेष प्रसिद्ध आहेत. पथेर पांचालीचे लेखक बिभूतिभूषण, पद्मानदिर मझीचे लेखक माणिक आणि गणदेवतेचे लेखक ताराशंकर. ह्या त्रयीने आपापल्या स्वतंत्र पद्धतीने बंगाली खेडूत जनतेची दुःखे ललित वाङ्मयात मुखर केली. ताराशंकरांची पहिली कथा 'कल्लोळ' या वाङ्मयीन नियतकालिकात १९३० साली प्रसिद्ध झाली, पण 'चैताली धुनीं' या पहिल्या कादंबरीने त्यांचा साहित्यसंचार खऱ्या अर्थाने सुरू झाला. त्यांनी शंभरावर पुस्तके लिहिली. त्यांतल्या चाळीस कादंबऱ्या आहेत. धात्रिदेवता, कालिंदी, गणदेवता, हांसुली बांकेर उपकथा या त्यांच्या प्रसिद्ध कादंबऱ्या. आयुष्याच्या उत्तरपादात अनेक वाङ्मयीन

मानसन्मान त्यांच्या पायाशी चालत आले. अलीकडे त्यांच्या प्रतिभेला शब्दाचे माध्यम अपुरे वाटले म्हणून की काय, त्यांना चित्रे रंगविण्याचा छंद लागला होता. त्यांच्या काही चित्रांतून पृथगात्मता आणि मौलिकता दिसून येते.

कै. ताराशंकरांच्या अनेक कादंबऱ्यांची भारतीय भाषांत आणि इंग्रजीत भाषांतरे झालेली आहेत. ' मोले घातले रडाया ' या न्यायाने त्यांचे एखादेच पुस्तक मराठीत आलेले आहे, ही खरोखर लज्जास्पद गोष्ट आहे. ही खंत व्यक्त करून आम्ही या थोर वंगसाहित्यिकाच्या स्मृतीस विनम्र प्रणामांजली सादर करतो.

## कै. वि. सी. सरवटे

मराठी आणि हिंदी या भाषांवर सारखेच प्रभुत्व असणारे नामवंत, वयोवृद्ध लेखक विनायक सीताराम तथा तात्यासाहेब सरवटे हे वयाच्या ८८ व्या वर्षी इंदूर येथे दिवंगत झाले. सामाजिक वाद ( १९२१ ) हे दाभोळकरमालेतले उत्कृष्ट पुस्तक आणि ' आईबापांस चार शब्द ' ही त्यांची छोटेखानी पुस्तिका आता विस्मृतीत गेलेली आहे. परंतु 'महाराष्ट्र साहित्य समालोचन : १८१८–१९३४' या १९३७ साली प्रसिद्ध झालेल्या अर्वाचीन मराठी साहित्याच्या इतिहासामुळे मराठी भाषेच्या अभ्यासकांच्या मनात त्यांचे नाव चिरंजीव झालेले आहे.

कै. सरवटे भारताच्या स्वातंत्र्य-लढ्याच्या पहिल्या पर्वात क्रांतिकारक म्हणून गाजले. पुढे मध्यभारतीय राष्ट्रीय सभेचे पुढारी म्हणून त्यांनी कार्य केले. अनेकदा कारावासही भोगला. स्वातंत्र्योत्तर काळात घटनासमितीवर आणि घटनेच्या मसुदा-समितीवर एक ज्येष्ठ सभासद म्हणून त्यांनी कार्य केले. १९६१ साली भारतीय शासनाने त्यांना पद्मभूषण ही पदवी बहाल केली. बृहन्महाराष्ट्रातील म. सा. परिषदेच्या या हितचिंतकाला आम्ही प्रणामांजली अर्पण करतो.

## कै. ना. ह. आपटे

१४ नोव्हेंबर १९७१ रोजी नारायण हरी आपटे यांचे वयाच्या ८२ व्या वर्षी निधन झाले आणि महाराष्ट्र एका ध्येयवादी साहित्य-महर्षीला मुकला. १९०९ साली त्यांची ' अजिंक्यतारा ' ही पहिली कादंबरी आणि १९६२ साली ' जवानांचा जीवन-धर्म ' ही अखेरची कादंबरी प्रसिद्ध झाली. दरम्यानच्या काळात विद्यार्थी आणि तरुण स्त्री-पुरुषांना मार्गदर्शन करणारी पुस्तके, कादंबऱ्या, लघुकथा अशी त्यांनी पाऊणशे पुस्तके लिहिली. दोन वर्षांपूर्वी श्री. ह. वि. दाते यांच्या पुढाकाराने त्यांच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त त्यांच्या पंधरा कादंबऱ्या संक्षिप्त रूपाने प्रसिद्ध झाल्या. प्रा. ना. सी. फडके यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या त्यांच्या गौरवसमारंभाने ते भारून गेले होते. आपले आत्मचरित्र आणि ' अटलांटिक ' नि ' सहारा ' या अपुऱ्या कादंबऱ्या पूर्ण करण्याची त्यांनी उमेदही व्यक्त केली होती. पण हे त्यांचे लिखाण विशेषतः आत्मचरित्र

त्यांना काळाचे बोलावणे आल्याने अपुरेच राहिले, याची हळहळ वाटल्यावाचून राहात नाही.

कै. आपटे यांचा जन्म १८८९ साली सातारा जिल्ह्यातील समडोळी या खेड्यात झाला. शिक्षण बेतास-बातच झाले. १९०४ साली सशस्त्र क्रांतीच्या नादाने ते घरातून परागंदा झाले. भारतभर भ्रमंती घडली. अनुभवाची शिदोरी बरीच जमा झाली. हरिभाऊ आपट्यांची उषःकाल कादंबरी वाचून लेखनाची स्फूर्ती मिळाली आणि त्यांनी अजिंक्यतारा ही पहिली कादंबरी लिहिली. ते गमतीने म्हणत की नारायण हरी या नावाचे हरी नारायणांशी जे साम्य होते, त्यामुळे ती प्रकाशकाने प्रसिद्ध केली. राष्ट्रीय सद्गुण वाढीस लावणारी आणि मध्यमवर्गीय आदर्श चित्रित करणारी त्यांची लेखन-तपस्या तेथपासून सुरू झाली. त्यांनी साहित्याकडे कलादृष्टीने न पाहता बोधदृष्टीने पाहिले. तरीसुद्धा आपले लिखाण प्रासादिक, सुबोध आणि रंजक व्हावे याची काळजी घेतली. आपला असा स्वतंत्र वाचकवर्ग तयार केला. १९२० ते १९५० ह्या काळात त्यांची लोकप्रियता चढती-वाढती होती. त्यांच्या काही कादंबऱ्यांच्या पाच पाच आवृत्त्या तर 'गृहसौख्य' या पुस्तकाच्या नऊ आवृत्त्या खपल्या आहेत.

महाराष्ट्र कै. आपट्यांना ओळखतो तो सोज्वळ कादंबरीकार म्हणून. ऐतिहासिक सामाजिक आणि अद्भुतरम्य असे त्यांचे कादंबरीलेखन त्रिविध आहे. अजिंक्यतारा राजपुतांचा भीष्म, संधिकाळ, लांछित चंद्रमा, नमो बुद्धाय या त्यांच्या ऐतिहासिक, पहाटेपूर्वीचा काळोख, सुखाचा मूलमंत्र, उमज पडेल तर, आम्ही दोघं, जाऊबाई, पुरुषाचे भाग्य, ऐरणीवर, मी वाट पाहीन, वेटिंगरूम, पाच ते पाच या सामाजिक, तर हृदयाची श्रीमंती, वैभवाच्या कोंदणात, केवळ नवलाई या अद्भुतरम्य कादंबऱ्या वाचकांच्या ध्यानात राहिलेल्या आहेत. बनारसी बोरे, कोंडाकणी, आरामविराम ह्या कथासंग्रहांना मध्यम प्रतीची लोकप्रियता लाभली. पण गृहसौख्य, सुगरिणीचा संसार, संसारात पडण्यापूर्वी यासारख्या जुन्यानव्याचा समन्वय साधण्याचा बोध करणाऱ्या त्यांच्या निबंध-प्राय लेखनाला खूपच लोकप्रियता लाभली. ही निबंधाची पुस्तके रुक्ष नसल्याने काही काळ अनेक पांढरपेशा कुटुंबांची प्रेमळ सल्लागारच बनली होती. कुंकू, ध्रुवकुमार, प्रतिभा, रजपूतरमणी, गंगावतरण असे चित्रपटही त्यांच्या ललितकथांवर निघाले.

पण एवढे विविध आणि विपुल लिहूनही कै. आपट्यांना आर्थिक स्वास्थ्य आणि मनःस्वास्थ्य लाभले नाही. काही काळ ते किर्लोस्कर मासिकाच्या संपादकमंडळात होते. स्वतःचे वाङ्मय प्रसिद्ध करण्यासाठी त्यांनी मुद्रणालय आणि आपटे मंडळी काढली. परंतु या खटाटोपात 'येणे आले नाही; देणे मात्र उरावर बसले'. पण आपट्यांचा स्वभाव अबोल आणि संकोची, वृत्ती विनम्र आणि ध्येयवादी. एकदा एका तरुण लेखकाने त्यांना विचारले, " तुमच्या कादंबऱ्यांत नेहमी आनंदपर्यवसायी

शेवट का असतो ?" आपटे म्हणाले, "माझी पात्रे मी माझी मुलेच समजतो. त्यांनी दुःखी असलेले मला बघवत नाही" अशी त्यांची ओळन् ओळ आदर्शवादी होती. राष्ट्रीय सद्‌गुण वाढीस लागावे, भोगाऐवजी त्यागाची महती समाजाला कळावी या उन्नत हेतूने त्यांनी लिहिले. स्वतःच्या संसाराच्या फाटकेपणाऐवजी इतरांच्या संसारांच्या नेटकेपणाची काळजी करणाऱ्या या सत्प्रवृत्त साहित्यसेवकास आमची कृतज्ञ श्रद्धांजली !

## कै. कॅप्टन लिमये

कॅ. गोपाळ गंगाधर लिमये हे प्रसिद्धिपराङ्‌मुख साहित्यिक दि. १८–११–७१ रोजी दिवंगत झाले. विनोदी लेखक म्हणून त्यांचा बोलबाला मराठी साहित्यविश्वात काहीसा झालेला असला, तरी त्यांच्या साहित्यगुणांचे चीज व्हायला फार उशीर झाला. तीन वर्षांपूर्वी श्री. राम कोलारकर या कथावेडया अभ्यासकाने लघुकथाक्षेत्रातले त्यांचे श्रेष्ठत्व दाखवून दिले आणि पॉप्युलर प्रकाशन या संस्थेने त्यांच्या निवडक कथांचे पुस्तकही प्रकाशित केले. गेल्या वर्षी ८० व्या वर्षात पदार्पण केल्याचा योग साधून त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला. या प्रसंगी कुसुमाग्रज, पु. ल. देशपांडे यांच्यासारख्या मातब्बर साहित्यिकांनी त्यांच्यावर मुक्तकंठाने स्तुतिसुमने उधळली. श्री. राम कोलारकर यांनी कॅ. लिमयांच्या नावाने सर्वोत्कृष्ट लघुकथेला भरघोस पारितोषिक देण्याची वार्षिक योजनाही जाहीर केली. अशा प्रकारे या उपेक्षित साहित्यसेवकाची योग्यता पुनर्स्थापित होत असतानाच काळाने त्यांला आपल्यामधून न्यावे, ही खरोखर शोचनीय गोष्ट आहे.

कॅप्टन लिमये यांचा जन्म १८९१ मधला. वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी ते मॅट्रिक झाले. १९१६ त एम्. बी. बी. एस. झाले. मलेरिया-निवारण आणि नेत्रदोप-निवारणाचे छोटे अभ्यासक्रम पूर्ण करून त्यांनी सुवर्णपदकेही पटकावली होती. १९१८ ते १९२१ च्या दरम्यान तीन साडेतीन वर्षे ते सैन्यात वैद्यकीय पथकात होते. त्यानंतर मुंबई नगरपालिकेच्या आरोग्यखात्यात दीर्घकाल सचोटीने नोकरी करून ते सेवानिवृत्त झाले. नगरपालिकेतली नोकरी काही त्यांच्या आवडीची नव्हती. ते म्हणतात, "माझी महत्त्वाकांक्षा शांतपणे, एकांतात बसून संशोधन करण्याची होती, पण ते जमले नाही." तरीपण आपला नोकरीधंदा चोख बजावणे हीही देशसेवाच होय असे ते मानीत. कर्तव्यनिष्ठा, शिस्त, वक्तशीरपणा आणि उद्योगशीलता हे त्यांच्या अंगचे आदर्श गुण होते. लग्नमुंजीत किंवा सभासंमेलनात ते सहभागी होत नसत. ते म्हणत, "आपले लोक बेशिस्त, अनियमित आणि बोंगळ आहेत त्यामुळे 'born in a wrong country at a wrong time' असे म्हणण्याची मजवर पाळी येते." प्रकृतिस्वास्थ्य होते तोपर्यंत त्यांनी आपला क्षणन् क्षण उद्योगात वेचला.

कै. लिमये तसे हरहुन्नरी होते. ते पेटी आणि फिड्ल् वाजवीत. मेडिकल महाविद्यालयात त्यांनी त्राटिका नाटकात नायिकेचे काम केले होते. चित्रे, व्यंगचित्रे आणि

छायाचित्रे काढण्यात त्यांचा हातखंडा होता. त्यांच्या छायाचित्रांना आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांमधून स्थान मिळालेले होते. प्लायवुडची मॉडेल्स बनविणे, आगपेट्या, सिगारेटची पाकिटे यांच्या सुबक वस्तू बनविणे हे त्यांचे छंद होते. आठ मिलिमिटरचे बेबी चित्रपटही त्यांनी तयार केले होते.

त्यांचे वाङ्मयाचे वेड शालेय जीवनापासूनचे होते. त्यांचे थोरले बंधू ना. ग. लिमये लेखक होते, विनोदी लेखक चिं. वि. जोशी हे त्यांचे भाचे. त्यांच्या भोवतीचे वातावरण लेखनाकडे प्रवृत्ती व्हावी असे होते. १९१२ च्या सुमारास त्यांचे पहिले पुस्तक "बापूची प्रतिज्ञा अर्थात् माझी बायको मी पसंत करीन' प्रसिद्ध झाले. सैन्यातल्या नोकरीत त्यांना पेशावर, दारेसलाम, इराक इत्यादी ठिकाणी जावे लागले. फलटणीबरोबर कूच करीत असताना त्यांच्या पायाला गोळीही लागली होती. आपले आघाडीवरचे रोमहर्षक अनुभव त्यांनी 'सैन्यातील आठवणी' (१९३९) या पुस्तकात ग्रथित केले आहेत. असे अनुभव सांगणारे मराठीतले हे पहिलेच पुस्तक असावे. "विनोदीलेखसंग्रह,' 'जुनाबाजार,' 'शकूचा भाऊ,' 'तिच्याकरिता' 'विनोदसागर' अशी त्यांची गंभीर आणि विनोदी कथांची पुस्तके प्रसिद्ध झाली. त्यांचा विनोद जसा श्रीपाद कृष्णांच्या पठडीहून वेगळा होता, तद्वतच त्यांची कथाही तत्कालीन कथेहून वेगळी होती. 'मेकॅनो', 'किरमत,' 'विठूचे भविष्य' या त्यांच्या कथा याचा प्रत्यय पटवितात. 'डास तो काय!' म्हणून त्यांचा पाचशे पानी प्रबंध आहे. त्यासाठी त्यांनी खूप अभ्यास केला, अनेक चित्रे आणि आकृती काढल्या. आपल्या ह्या 'डासबोधा' ला पुणे विद्यापीठाने वाटाण्याच्या अक्षता लावल्या याबद्दल त्यांनी खंत व्यक्त केली आहे.

कै. लिमयांची मते सुधारक होती. त्यांनी तिसाव्या वर्षी लग्न केले. पत्नी सुविद्य मिळाली. पण संसारसुख काय ते पाच वर्षेच लाभले. १९२७ साली भाऊबिजेच्या दिवशी त्यांची पदवीधर सहचारिणी निर्वतली. 'शकूचा भाऊ' या पुस्तकात त्यांच्याबरोबरच त्यांच्या पत्नीच्याही कथा अंतर्भूत झालेल्या आहेत. पुन्हा लग्न करण्याचे त्यांचे वय होते, पण ते सांगतात, " आम्ही पडलो भावनाप्रधान...त्यामुळे तसेच राहिलो."

असा त्यांच्या मनाचा हळवा कोपरा सोडला, तर त्यांचे जीवन 'ना खंत ना खेद' या मनोवृत्तीच्या कर्मयोगाचे होते. कै. लिमयांच्या स्मृतीस आम्ही आदरांजली अर्पण करतो!

### कै. प्रभाकर कोल्हटकर

मोठ्या वृक्षाच्या डेरेदार छायाबहुलतेमुळे त्यालाच फुटलेला पांगोरा डोळ्यांत भरू नये, असे कधी कधी होते. गेल्या अठ्ठावीस जानेवारीला श्रीपाद कृष्णांचे चिरंजीव प्रभाकर तथा बापूराव यांचे पंचाहत्तरी उलटल्यावर निधन झाले. १९२८ साली

मानसपूजा हा त्यांचा कथासंग्रह प्रसिद्ध झाला आणि परवा परवापर्यंत आलमगीर-मधून ते स्तंभलेखन करीत होते. कथा, विनोद, नाटक, चरित्र, स्फुटे असे जवळ जवळ ४० / ४५ वर्षे लेखन करूनही बापूरावांच्या वाङ्मयीन कामगिरीचे स्मरण फारसे राहिलेले नसावे ही दुःखाची गोष्ट होय. श्रीपाद कृष्णांची विनोदबुद्धी त्यांच्यांत संक्रांत झालेली होती, हे त्यांची ऋणानुबंधी किंवा आकाशवाणीसारखी पुस्तके चाळताना सहज दिसून येते. बातमीदार सारखी प्रयोगशील नाटके त्यांनी लिहिली. अनंत काणेकरांना त्यांनी लघुनिबंधकार बनविले. काणेकरांची चांदरात, लक्ष्मीबाईंची स्मृतिचित्रे, गु. ह. देशपांड्यांचे निवेदन, केशवकुमारांची झेंडूची फुले, गोपीनाथ तळवलकरांची गृहरत्ने इ. महत्त्वाची पुस्तके त्यांनी प्रकाशात आणली. १९३३ साली शांताबाई बागळे यांच्या सह-कार्याने ‘ संजीवनी ’ हे खास स्त्रियांसाठी पाक्षिक काढून चार वर्षे चालवले. जाहिरात-वितरणही काही काळ यशस्वितेने केले. अलीकडे वृद्धाश्रम काढण्याची कल्पना त्यांच्या मनात घोळत होती. परंतु पित्याच्या देदीप्यमान कीर्तीपुढे पुत्राची लक्षणीय कामगिरी झाकल्यागत झाली. मराठी साहित्याच्या या उपेक्षित मानकऱ्यास आमचे प्रणाम.

## कै. बाबुराव इनामदार

गुरुवार दिनांक २ मार्च १९७२ रोजी प्रकाशक बा. शा. तथा बाबुराव इनाम-दार यांची आकस्मिक निधन झाल्याची वार्ता ऐकली व एक सज्जन प्रकाशक आपल्यातून गेला या विचाराने अतिशय वाईट वाटले. एकदोन वर्षांपूर्वी पन्नाशी उलटलेले बाबुराव इतक्या लवकर जातील असे वाटले नव्हते !

जाहिरात–वितरण आणि प्रकाशन या क्षेत्रांत गेल्या काही वर्षांत बाबुरावांनी लक्षणीय कामगिरी बजावली आहे. साऱ्या प्रकाशकांना व लेखकांना बाबुराव हा एक मोठा दिलासा वाटे. बाबुरावांकडे कोणतेही काम विश्वासाने सोपवावे आणि निर्धास्त राहावे, अशी परिस्थिती होती. त्यांनी काढलेली पुस्तके त्यांच्या चोखंदळ दृष्टीची निदर्शक आहेत. आपल्या लहानशा प्रकाशनव्यवसायात बाबुरावांनी धंद्यापेक्षा लेखकाच्या आवडीनिवडीकडे व आकर्षक निर्मितीकडे लक्ष दिले. डॉ. बाळिंबे, भीमराव कुलकर्णी, म. श्री. दीक्षित. वि. स. वाळिंबे, वि. ग. कानिटकर, वि. शं. पारगावकर दि. बा. मोकाशी, सौ. स्नेहलता दसनूरकर, रा. भि. जोशी, राजेंद्र बनहट्टी, पंढरीनाथ रेगे, मंगळवेढेकर, शंकरराव खरात इत्यादिकांची त्यांनी प्रकाशित केलेलीं पुस्तके त्यांच्या या दृष्टीची साक्ष देणारी आहेत. आस्था, अगत्य आणि सौजन्या-पूर्ण वागणूक यामुळे लेखकांना बाबुरावांच्या सहवास मोठा आनंदायक वाटे. त्यांच्या निधनामुळे अनेक लेखक व प्रकाशक यांना आता चुकल्यासारखे वाटत असेल !

बाबुरावांनी अगदी सामान्य परिस्थितीतून चिकाटीने व प्रेमांने आपला व्यवसाय उभा केला. अनेकांची अनेक कार्ये अगत्याने केली. नातेवाईकांना उदंड प्रकाराने त्यांच्या संसारात हातभार लावला. त्यांच्या स्मृतीला आमचे अभिवादन.

# 'प्रभाकर'च्या संचिकांतून

ॐ

संग्राहक–संगम

## प्रतापसिंहाची शेवटची मुलाखत

सातारचा राजा प्रतापसिंह (१७९२–१८४७) आणि इंग्रज यांच्यात तेढ निर्माण होऊन इंग्रजांनी राजाला पदच्युत करून १८३९ मध्ये काशीला नेऊन ठेविले. 'प्रभाकर'कर्त्यांने या स्वाभिमानी पण दुर्दैवी राजाची बाजू आपल्या पत्रातून पुढे मांडण्याचा सतत प्रयत्न केला. मेजर कार्पेंटर याने राजाची मुलाखत घेऊन अगदी शेवटी शेवटी जे बोलणे केले त्यासंबंधीचा मजकूर पुढे देण्यात येत आहे. हे बोलणे मार्च १८४६ च्या सुमारास झालेले दिसते. 'प्रभाकर'कर्त्यांने ते १७–१०–४७ च्या अंकात प्रसिद्ध केलेले आहे. दैवदुर्विलास असा की १४ आक्टोबरलाच म्हणजे या प्रसिद्धीच्या आधी तीनच दिवस राजा कैलासवासी झाला होता. राजाच्या मृत्यूसंबंधीच्या 'प्रभाकरा'च्या कर्त्यांचा तेजस्वी स्फुटलेख यापूर्वीच आम्ही वाचकांस सादर केलेला आहे.— [ मसाप, अं. १७६–१७७ ( जाने–जून ७१ ) पृ. १३३–१३४.]

काशी येथील गवर्नर जनरलचा एजेंट व सातारचा माजी माहाराज यांजमध्यें अमूक भाषण जाहालें ह्मणोन जार्ज टामसन याणे कोर्ट प्रोप्रैटरच्ये सभेंत भाषण करीत असतां त्या बोलण्याचा संदर्भ आणला होता. परंतु असें भाषण जाहाल्याची कोर्ट डरेकटरांस काहींच माहीत नव्हती. सबब त्यांहीं गवर्नर जनरल याजला पत्र लिहिलें तें व त्याजवरून जो खरा मजकूर पुढें उघड जाहाला तो येणेप्रमाणें.

नामदार गवर्नर जनरल यांशी

काशींतील गवर्नर जनरलचा एजेंट आणि सातारचा माजी राजा यांजमध्यें जें भाषण जाहालें त्यांतील सारांश अशे सदराचा एक कागद मेस्तर जार्ज टामसन याणें १८ वे तारिखेस इष्ट इंदिया कंपनीच्ये जनरल कोर्टांत वाचला तो तुह्माकडेस पाठऊन दिल्हा आहे.

मेजर क्यारपेंटर याणे जे करार करण्या विषयींचें बोलणें माजी राजा पाशीं लाविलें होतें असें या कागदांत लिहिलें आहे त्याची खबर कोर्ट डरकटर यांजला अगदींच नाहीं तरी या मजकुराचीं नकल तुह्मी त्याजकडेस पाठऊन द्यावी आणि त्यास ल्याहावें कीं त्याबाबद त्यास जें ल्याहावयाचें असेल तें त्याणी तुह्माकडेस तावडतोब लिहून पाठवावें.

तो जें लिहील त्याची नकल व त्याजवर तुह्मांस जो विचार सुचेल त्यासुद्धां आह्माकडे पाठऊन द्यावा.

इष्ट इंडिया हैास
२४ मार्च १८४६

सही
हेनरी विलाक जे. डब्लु. हाग.

इशवी १८४६ मार्चाच्ये १८ वे तारिखेस इष्ट इंदिया प्रोप्रैटरच्ये सभेंत जार्ज टामसन याणें वाचलेला काशींतील गवर्नर जनरलचा एजेंट आणि माजी राजा यामध्यें जाहालेले भाषणाचा सारांश –

मित्र ( ह्मणजे गवर्नर जनरलचा एजेंट ) ह्मणाला, " माहाराजांचे मुकदम्या बाबदचे जे नाना प्रकारचे कागद व दस्तायवज मी वाचले आहेत त्यावरून व वर्तमानपत्रांवरून माझे बुद्धीने असें दिसतें कीं तुमची गादी व राज्य मिळण्याची तुमची आशा सफळ होणार नाहीं. तुह्मांस माहीतच आहे कीं इंग्लंडमध्यें कामकाज पाहाण्याकरितां इष्ट इंदिया कंपनीचे प्रोप्रैटरची सभा तीन महिन्यांनी एकदां भरत असती व तेथें तुमचे मुकदम्याची वारंवार भवती न भवती जाहाली. तस्मात् तुमच्ये दाव्याबाबद वारंवार वादविवाद करणें बंद करावें यांत चांगलें आहे असें माझें तुह्मांस सांगणे आहे. " राजाने उत्तर केलें, " मजवर जे जुलूम गुजरले आहेत ते सर्व इंग्रेजांस जाहीर करण्यास हेंच काय तें द्वार आहे असें असतां त्याचा वादविवाद कां बंद करावा ? आणि एणेकरून जी प्रसिद्धी होती ती जर बंद केली तर माझे मुकदम्याची आणखी चौकशी होऊन इनसाफ होण्याचें द्वारच बंद केल्यासारखें होईल. " मित्राने उत्तर दिल्हें, " इंग्लंडांतील कोणाही अमलदाराचे हातांत तुम्हास सातारच्ये गादीवर पुनः बसविण्याची मत्ता नाहीं ह्मणून मी तुह्मांस शिफारस करितों कीं मी तुमच्या विचाराकरितां जे करार तुह्मांपासीं पुढें बोलणार त्याचे पूर्वी मी एक करार सांगतों तो तुह्मी कबूल करावा. या वरील करारावर तुह्मीं आपली मान्यता घालावी हें माझें सांगणे आहे.

" पहिल्याने तुह्मी असें कबूल करावें कीं इनसाफ होण्याकरितां साहा वर्षें पर्यंत आपण होता नवता तेवढा प्रयत्न केला परंतु आपले दावे कबूल होतील याची आपणास अगदीं आशा राहिली नाहीं. त्यास सातारची गादी व राज्य यावरील आपण आपला दावा अगदीं सोडून दिल्हा आहे.

दुसरें तुह्मी आपला लंडनातील वकील काढावा व इंग्लंडांत तुमच्ये मुकदम्याचा गवगवा बंद करावा.

तिसरें तुह्मी सरकारापाशीं विनंती करावी कीं, आपणास दुसरें चांगलें ठिकाण राहावयास नेमून द्यावें. तुमची खासगी दौलत तुह्मास परत द्यावी, तुमची दरमहा नेमणूक वाढवावी, व त्रिंबकजी राजाजी यास तुह्मीं दत्त घेतला आहे त्यास सरकाराने कबूल करावा. या मुलकांत गवर्नर जनरलसाहेब लवकरच यावयाचे आहेत त्यांजपुढें तुमच्ये तर्फेने हे करार हजर करण्याविषयी तुह्मी आपले सही शिक्यानशीं मला मुखत्यारी द्यावी. गवर्नर जनरलसाहेबानी हे करार मान्य केले नसतां मी इंग्लंडास लवकरच जावयाचा आहें, त्यास मी तेथें गेल्यावर हे करार मी स्वतः कोर्ट डरेकटर आणि बोर्ड आफ कंत्रोल याजपुढें हजर करीन."

यावर महाराजांनी उत्तर दिल्हें–

" मी महाजन, साहुकार, वाणु किंवा जमीदार नाहीं व जे करार मला कबूल करावयास तुह्मीं सांगत आहां ते कबूल करून मी राज्यावरील वारसा सोडून देईन असा अर्थ नाहीं. माझे पूर्वजांनी ज्याप्रमाणें वर्तणूक केली आहे त्याप्रमाणें मी करीन व माझे पुढील वंशजही त्याचप्रमाणें करतील अशी मला आशा आहे. माझे धर्मांत जें सांगीतलें आहे त्यास अनुसरूनच ही गोष्ट आहे. मला राहावयास योग्य ठिकाण नेमून द्यावें. माझी खासगी दौलत परत करावी व माझी दरमाही नेमणूक वाढवावी, असा मी सरकारास अर्ज करावा, या कलमाबाबद माझें असें म्हणणें आहे कीं हीं कलमें जरी मला देऊं केलीं असें घटकाभर मानलें तथापि तीं घेऊन मी राज्यावरील वारसा सोडून देईन असें होईल तरी? इंग्रेजांचा मित्र व दोस्त अशा मला माझेकडून कांहीं एक कारण जाहालें नसतां तुह्मीं गादीवरून काढलात. मला माझे देशांतून काढून दिल्हेंत, व मज वर सर्व प्रकारचा जुलूम व माझा अपमान तुह्मीं करीत आहां. आणि शेवटीं तुह्मीं मला काय ती इतकीच दाद देणार? तुह्मी जे करार सांगतां त्याजवर मान्यता घालण्यापेक्षां मी नाश पावेन तें चांगलें!"

मित्रानें उत्तर दिल्हें, " तिसरे कलमात जे च्यार ठराव आहेत ते तुह्मास फायदा होई असे पार पाडवणार नाहींत कीं काय?"

महाराजांनीं उत्तर दिल्हें, " मनांत आणा कीं ते पार पाडवले तरी मला काय आहे? मी मेलों असतां त्यापैकीं तीन करार माझे कां उपयोगीं पडतील? तसा प्रसंग घडून आला असतां माझी हुरमत व अब्रू मात्र जाईल."

मित्र बोलला, " परंतु तुह्मीं दत्त पुत्र घेतला आहे तो तुमचे जागेवर होईल."

महाराजांनी उत्तर दिल्हें, " तुह्मांबरोबर माझा निरंतर अतिशय स्नेह आहे आपले तहनामे जाहाले, आपण त्याच विषयावर पुनः पुनः कागद पत्र लिहिले. आणि ही माझी सांप्रतची हलकी स्थिती हा मला त्यापासून काय तो फायदा जाहाला आहे. तरी माझे गादीवर माझा वारिस पुढें होईल हें तरी मी कशावरून समजावें?

यास तरी मला काय बहादारी आहे. कदाचित् त्या वेळेस तुह्मीं क्षण न लागता मनास वाटेल त्या प्रमाणें वर्तणूक करून माझे गादीवर पुढें होईल त्याची खरात्री करून टाकाल. तुह्मीं ज्या प्रमाणे वर्तणूक करावयास मला सांगितली त्या प्रमाणे मी एक-सारखी करीत असता तुह्मी मला अशे स्थितीस आणिलेंत. मजबरोबर जी तुह्मी वर्तणूक केलीत त्या पेक्षां माझे पुढील गादीचा अधिकारी असें तुमचें सरकार कबूल करणार नाहीं."

मित्र बोलला, "याबाबद सरकारांतून मला कांहीं हुकूम आले नाहींत ही गोष्ट मी आपलेच खात्रीवरून सांगतों कीं हे च्यार करार महाराजांनी कबूल केले असतां, सरकार त्या प्रमाणे बंदोबस्त करण्यास तावडतोब कबूल होईल."

महाराजांनी उत्तर दिल्हें, "तुह्मी ह्मणतां ते करार कबुल करणे जर योग्य असतें तर इंग्लंडांतील माझा मित्र व वकील ते कबूल करण्यास राजी जाहाले असते. परंतु तेही हे करार मान्य करण्यास राजी जाहाले नाहींत."

मित्र ह्मणाला, "बरें जर तुह्मी दत्त घेतलात तो सरकारने कबूल केला तर तुह्मी माझे दुसरे करारांस मान्य व्हाल ?"

राजानें उत्तर दिल्हें, "तुह्मी जे जुलूम केले आहेत ते मजवर केले आहेत आणि त्याची दाद मला दिल्ही पाहिजे. मी मेल्यावर माझे पुढील गादीवर बसणारावर तुह्मीं मेहेरबानी केलीत किंवा नाहीं केलीत त्याचें मला काय आहे ?"

मित्र ह्मणाला, "मला कांहीं कारणावरून ठाउक आहे की तुमचा दत्त पुत्रास सरकार कबूल करणार नाहीं."

महाराजांनीं उत्तर दिल्हें, "दत्त पुत्र घेण्याची मी तुमचे सरकारापाशीं कांहीं परमाणगी मागत नाहीं. मी आपले धर्मांतील चाली प्रमाणें दत्त घेतला आहे. कारण कीं माझे पूर्वजांनी आपले वंशांत कित्येक पिढ्या याच प्रमाणें दत्त पुत्र घेतले आहेत. आणखीं मी दत्त पुत्र अशा करितां घेतला कीं काशीची हवा माझे शरीर प्रकृतीस माफक पडत नाहीं. तेव्हां मी किती वर्षें आणखीं वांचेन याचा भरवसा नाहीं. तूं माझा मित्र ह्मणोन मी हें तुज पाशीं सांगतों. मी दत्त घेतला हें सरकारच्ये पसंतीस येऊ किंवा न येऊ, त्याची मी कांहीं परवा करीत नाहीं. व याबाबद तुमचे सरकारास लिहून पाठवण्याची ही कांहीं जरूर आहे असें मला वाटत नाहीं. कपतान ग्रांट डफ याणे पूर्वी मला असें सांगितलें होतें कीं तुमचे सरकारांत सर्व पृथ्वींतील राज्यांतले पेक्षां इनसाफ फार होतो. मला त्याचें बोलणें खरें वाटलें व सरकार इनसाफ सोडून दुसरे प्रकारची वर्तणूक कधीं करणार नाहीं असें मला वाटत होतें. दाद मिळण्यां करितां माझे सामर्थ्यात होते नवते तितके मी प्रयत्न केले. हा माझा मतलब सिद्धीस जाईपर्यंत तुह्मी माझें राज्य तुह्मांपाशीं ठेवा. परंतु जेव्हां माझी दाद लागेल तेव्हां माझे अधिकार मला प्राप्त होतील. तुह्मीं आपा-साहेबाला माझे पूर्वजांचे गादीवर बसविला आहे, व त्याणें वाईट वर्तणूक केली, व

तुह्मांस दिलेलें वचन पार पाडलें नाहीं सबब त्यास गादीवरून काढण्याचें सामर्थ्य तुह्माला आहे."

मित्र ह्मणाला, "आपासाहेबाला गादीवरून काढणें यांत कांहीं कठीण नाहीं परंतु तसें केल्याने दुसरी एक अडचण आहे."

महाराजानीं विचारिलें, "ती कोणती अडचण आहे—"

मित्रानें उत्तर दिल्हें, "ती अडचण ही आहे कीं जी गोष्ट एकदा सातारचे रसिडेंटाने केली व ती सरकाराने पसंत केली आणि कोर्ट डरेकटर आणि बोर्ड आव कंत्रोल याहीं ज्या गोष्टीला आपलें अनुमोदन दिल्हे ती गोष्ट मोडली असता फार गैर सोय जाहाल्यावांचून राहाणार नाहीं. एथें किंवा इंग्लंडमध्यें तुम्हीं आपले दाव्याचा गवगवा आणखीं कोठपर्यंत तरी करणार?"

राजाने उत्तर दिल्हें, "सत्य माझे पक्षास आहे. मी जीवंत आहें पर्यंत मी आपले दाव्याची फिर्याद करीन. मी मेल्यानंतर माझे पुढील वंशज वंशपरंपरा असाच गवगवा करीत जातील. मी जरी फकीर जाहालों तथापि मी जीवंत आहेंपर्यंत दाद मागावयास मी राहाणार नाहीं. परंतु तुमचे करारावर मी आपली मान्यता कधीं करणार नाहीं."

नंतर तीन वेळां त्या मित्राने विचारलें, "तुमचा शेवटला निश्चय हाच आहे?"

महाराजानीं उत्तर दिल्हें, "होय, हाच आहे." राजा नंतर आणखीं असें बोलिला कीं "उभय पक्ष ह्मणजे इंग्रेज सरकार आणि आपण यांचा परस्परांविषयीं ज्या पेक्षां स्नेहभाव आहे तेव्हां सर्वांचें समाधान होईल अशे रीतीने खटला तोडून टाकावा असें सरकारच्ये मनांपासून असलें तर हें वैमनस्य सहज दूर करून टाकतां येईल. व असा बंदोबस्त केल्याने इंग्रेज सरकार व आपण या दोघांकडेस ही कांहीं दोष येणार नाहीं. परंतु जे मध्यें तर्कटी होते त्यांस मात्र त्यांचे अपराधांचें शासन होईल. आणि असें असतां तुमचें सरकार याप्रमाणें कां करीत नाहीं."

**प्रभाकर**, पु. ५ अं. ५२ (१७ – १० – १८४७), पृ. २४८७ – २४९०.

*

# मिखाईल शोलोखोव्चे थिटे ' महाकाव्य ' : ' शांत दोन '



अशोक रानडे

[ मिखाईल शोलोखोव् ( जन्म २४।५।१९०५ ) हा रशियाचा नामांकित हयात कादंबरीकार. स्टॅलीन पारितोषिक, ऑर्डर ऑफ लेनिन, नोबेल पारितोषिक असे अनेक बहुमान या लेखकाने पटकावलेले आहेत. ' शांत दोन ' या त्याच्या सर्वोत्कृष्ट कृतीचे हे गुणदोषविवेचन. ]



रशियन साहित्यात कादंबरी हा वाङ्मयप्रकार खूप फोफावला. विशेषतः १९ व्या शतकात टॉलस्टॉय, डोस्टोयेवस्की, तुर्गेनिफ, गोगोल यांसारख्यांनी जागतिक कादंबरीवाङ्मयात मानदंड निर्माण केले. चालू शतकातही सोलत्झेनित्सिन, शोलोखोव व पास्तरनाक इत्यादी नावे कोणत्याही रसिक वाचकांच्या मनात ठसलेली आहेत. १९६५ साली नोबेल पारितोषिक मिळालेल्या शोलोखोवचा विचार करताना ही रशियन कादंबरीकारांची प्रभावी परंपरा मनात ठेवूनच पुढे गेले पाहिजे.

१९०५ साली जन्माला आलेल्या शोलोखोवचे शालेय शिक्षण फारसे झाले नाही आणि ते नीटसे का झाले नसावे, हेही त्याचा जन्मकाळ पाहता सहज लक्षात येते. रशियातली १९१७ ची ऑक्टोबर क्रांती, पाठोपाठ यादवी युद्ध, तदनंतर रशियात साम्यवादाचे बस्तान बसेपर्यंतचे रक्तपात, दडपशाही इत्यादी प्रकार हा सर्व क्रम लक्षात घेता शोलोखोव संक्रमणकाळात जन्माला आला, क्रांतिकाळात वाढला आणि तणा-तणीच्या कालखंडात जगला, असे म्हणण्यास हरकत नाही. लेखकाचे चरित्र पाहून त्याच्या साहित्याचा अन्वयार्थ लावणाऱ्या चरित्रानुसारी समीक्षेचा दृष्टिकोण जर स्वीकारावयाचा असता तर शोलोखोवच्या जडण-घडणीची अनेक सूत्रे त्याच्या आयुष्याच्या कालखंडातील ऐतिहासिक घडामोडींच्या आलेखात शोधावी लागली असती, इतका तो कालखंड चिरपरिणामी व उत्पाती घटनांनी खच्चून भरलेला आहे.

शोलोखोवच्या कादंबऱ्यांविषयी लिहिण्याऐवजी कादंबरीकार शोलोखोवविषयी लिहिणे अधिक बरे. कारणे दोन : चांगल्या वाईट सर्व कादंबऱ्यांची कथानके सांगणे,

प्रसंगाची मांडणी, स्वभावचित्रण, भाषाशैली अशा रकान्यात प्रत्येक कादंबरीवर शेरे मारणे या तऱ्हेच्या समीक्षेनून पुष्कळ वेळा कादंबरीकाराचे एक कलावंत म्हणून निश्चित स्थान कोणत्या दर्जाचे आहे, याचा बोध होत नाही. शिवाय कलावंताचे मूल्यमापन त्याच्या उत्तम कलाकृतीवरून व्हायला हवे हेसुद्धा लक्षात घेतले पाहिजे. या कारणा-साठी कादंबरीकार म्हणून शोलोखोवचा विचार करणे आणि त्याच्या "शांत दोन" (अँड क्वायेट फ्लोज द डॉन) या कादंबरीवरच लक्ष केंद्रित करणे असे माझे उद्दिष्ट राहील.

शोलोखोव्ची ही कादंबरी १९२२ ते १९४० या बारा वर्षांत प्रथमतः चार खंडांत प्रसिद्ध झाली. तिसऱ्या आणि चौथ्या खंडांत पुन्हा सात वर्षांचा कालावधी गेला. हा कालावधी का गेला, याचे स्पष्टीकरण पुढे येईलच.

या कादंबरीची प्राणप्रतिष्ठा 'दोन' नदीच्या परिसरात झालेली आहे. लेखकाला या प्रदेशाविषयी व तेथे राहणाऱ्या 'कोसॅक' लोकांविषयी अंतरीचा जिव्हाळा आहे, ही गोष्ट कादंबरी वाचू लागताच जाणवते. त्यातही पुन्हा तीन-एकशे कोसॅक कुटुंबांपैकी पाच कुटुंबांवर त्याचे लक्ष केंद्रित झाले आहे. त्यात पुन्हा 'मेलेखोव्' कुटुंबाभोवती कादंबरीचे धागे जास्त गुंतले आहेत. अशा तऱ्हेने सर्व रशियाला व्यापून टाकणाऱ्या महायुद्ध–क्रांती–यादवी या घटनांच्या संदर्भाबरोबर रशियाचा एक विशिष्ट भाग–त्यातही विशिष्ट लोक–त्यातही विशिष्ट कुटुंब–आणि त्यात पुन्हा कादंबरीचा नायक ग्रेगॉर यांचे अधिकाधिक बारकाव्याचे चित्रण असा लेखकाचा विशिष्ट परिघ आहे. व्यापक संदर्भ आणि जगड्व्याळ घटना व त्यांचे दर्शन एका कुटुंबाच्या एका व्यक्तीच्या जीवनाच्या आरशात घेणे या तंत्राचा वापर टॉल्स्टॉयपासून सगळ्यांनी केला. कारण परिणामाची तीव्रता आणि अनुभूतीची व्याप्ती, या दोन्ही गोष्टी याच मार्गाने साध्य होतात. एखादी कुलकथा सांगता सांगता कालाच्या, राष्ट्राच्या, विचारांच्या पातळी-वरील सर्वंकष नाट्य पकडणे हे या तंत्राने शक्य होते. या संदर्भात असे म्हणता येईल की, रशियाई कादंबरीचा हा साचा 'युद्ध आणि शांतता' या कादंबरीमुळे पक्का रुळला आणि अशा तऱ्हेने विसाव्या शतकातील कादंबरीकारालाही हा साचा टाळता आला नाही. विस्तार, आशय, आवाका या तिन्ही बाबतीत 'युद्ध आणि शांतता' आणि 'शांत दोन' या कादंबऱ्यांत वरवर पाहता जाणवणारे साम्य म्हणजे शोलो-खोवने पत्करलेला एक कलात्मक धोकाच होता असे म्हटले पाहिजे. कारण या साम्यामुळे वाचक तुलना आणि अपेक्षा या दोन्हींच्या बाबतीत 'युद्ध आणि शांतते'-च्या पार्श्वभूमीवर 'शांत दोन' पाहतात. या धोक्यातून शोलोखोवच्या प्रतिभेने कसा मार्ग काढला हे पाहणे मोठे उद्बोधक ठरेल.

पहिली गोष्ट अशी की शोलोखोवने प्रदेशात रुजलेल्या, मुरलेल्या व्यक्तीला वेढ-णारे प्रसंग विशिष्ट व्यक्तीचे निमित्त करून पाहिले. शोलोखोव स्वतः व्यक्तीबरोबर

आहे, असे आपल्याला जाणवत राहते, तसाच तो विशिष्ट प्रदेशावर प्रेम करणारा आहे याचाही आपल्याला प्रत्यय येतो. कादंबरीत लेखक स्वतः एक विशिष्ट स्थान घेत असतो आणि याचा परिणाम राष्ट्रीय प्रश्न, ऐतिहासिक समस्या इत्यादी गोष्टी आपल्याला वेगळ्या न जाणवता व्यक्तिजीवनाचा एक भाग म्हणून जाणवतात. टॉलस्टॉय व्यक्तींचे जीवन व्यक्तींचेच ठेवतो, पण त्याने निवडलेल्या व्यक्तीच अशा आहेत की, त्या राष्ट्रीय ऐतिहासिक पातळीवरील घटनांत स्वाभाविकपणे भाग घेणारी पात्रे वाटतात. काहीतरी ऐतिहासिक घडते आहे, प्रचंड घडामोडी होत आहेत आणि कर्ती-करविती पात्रे आपल्या व्यक्तिगत जीवनांच्या उपनद्या घेऊन त्यात मिसळत आहेत असे टॉलस्टॉय वाचीत असताना वाटत राहते. उलटपक्षी व्यक्ती वा समूहातील व्यक्ती आपापली स्वप्ने उराशी बाळगून, आपापल्या आशा-आकांक्षांच्या सिद्धीसाठी कडोनिकडीचे प्रयत्न करीत आहेत आणि त्यांच्या नियंत्रणाखाली नसलेल्या पण त्यांना वेढून टाकणाऱ्या, त्यांच्या धडपडींना कमी-अधिक यश बहाल करणाऱ्या घडामोडींच्या प्रवाहात गुंतून जात आहेत, असे चित्र शोलोखोवच्या कृतीत आढळते.

टॉलस्टॉय आणि शोलोखोव यांच्यातील फरकाच्या या पहिल्या विशेषातूनच दुसऱ्या फरकाचा जन्म होतो. टॉलस्टॉयची पात्रे अधिक जाण असलेली आहेत. आपण काही विशिष्ट गोष्टी कराव्यात, कारण भोवताली घडणाऱ्या विस्तृत घटनापटाशी आपला असा असा संबंध आहे, अशी जाणीव त्यांना असते. घटना, त्यांची उगमकारणे, त्यांचे परिणाम, त्या परिणामांचे परिणाम या सर्वांशी आपले नाते आहे हे मनात बाळगून टॉलस्टॉयची पात्रे वावरतात. ज्याला जाणीव त्याच्यावर जबाबदारीही अधिक, आणि ज्याची जबाबदारीची जाणीव अधिक त्याची उपक्रमशीलताही अधिक. टॉलस्टॉयची पात्रे हतबुद्ध झाली आहेत, असे आढळत नाही. काय करावे ते समजत नाही अशा अवस्थेत ती असली तरी तशा अवस्थेत येऊन पडण्यासही त्यांच्याच जाणीवपूर्वक केलेल्या कृती कारणीभूत झालेल्या असतात. याउलट शोलोखोवची नायकासकट सर्व पात्रे जेव्हा किंकर्तव्यमूढ होतात तेव्हा ती हतबलच नव्हे, तर सर्वस्वी हतबुद्धही झाली आहेत, असे दिसते. घटना, दैवी शक्ती, नशीब, काहीही म्हणावे, पण अशा एखाद्या खेचून नेणाऱ्या जबरदस्त प्रभावाखाली शोलोखोवची पात्रे वावरतात. त्यांना प्राणिसदृश सहजप्रेरणा आहेत. या प्रेरणांनी ती नियंत्रित आहेत. या प्रेरणांचे स्वरूप त्याना उमजत नाही. त्यांचे उगमस्थान कोणते, त्यांना विरोध कसा करावा, त्यांच्या परिणामापासून आपली कमीत कमी हानी वा जास्तीत जास्त लाभ कसा होईल याचा विचार करून मग पुढचे पाऊल कसे उचलावे, हा विवेक शोलोखोवच्या पात्रांना नाही.

तिसरा भेद म्हणजे पात्रांचे घटनांकडे आणि एकंदरीत जीवनाकडे पाहण्याचे दृष्टिकोण आणि त्यांची पातळी. टॉलस्टॉयची पात्रे जीवनाकडे, त्यातील घटनांकडे काहीशी तत्त्वज्ञानी दृष्टीने पाहतात; ती घटनांचे विश्लेषण करताना दिसतात. त्यांचे

अन्वयार्थ लावण्याचा ती पात्रे प्रयत्न करीत असतात. सर्वच पात्रे जीवन, जीवनातील घटना यांकडे ' वस्तू ' म्हणून पाहू शकतात. तर शोलोखोवची पात्रे घटना, जीवन यांत विरघळून जातात. घटना ओढवल्या की त्या धुक्यासारख्या पात्रांभोवती गुरफटतात आणि पात्रे गोंधळतात, तशीच चालत राहतात किंवा थांबतात. पण घटनांचा अन्वयार्थ लावण्याचे त्यांच्या मनातही येत नाही. त्यांच्या आयुष्यात घटना सुट्या सुट्या राहतात; कारण त्यांना एकत्र गुंफणारे कोणतेही तत्त्वज्ञान कोणत्याही स्वरूपात त्यांच्या ठायी नाही. त्यांच्यात आहे ती फक्त मनःपूर्वकता. ती सर्व घटनांचा सारख्याच मनःपूर्वकतेने स्वीकार करतात. प्रसंग आणि व्यक्तिस्वभाव यांच्या कादंबरीतील संबंधाविषयी हेन्री जेम्सने एके ठिकाणी म्हटले आहे, "व्यक्तिस्वभाव म्हणजे काय ? – तर प्रसंगांनी सिद्ध होत जाणारी गोष्ट आणि प्रसंग म्हणजे तरी काय ? – तर व्यक्तिस्वभावाचे एक उदाहरण." या सूत्राला अनुसरून टॉलस्टॉय आणि शोलोखोव यांच्यातला भेद स्पष्ट करावयाचा असेल तर असे म्हणता येईल की, टॉलस्टॉयच्या कादंबऱ्यांत प्रसंगाचे कारण पात्रे असू शकतात, प्रसंगांचे स्वरूप व्यक्तिस्वभावामुळे निश्चित होऊ शकते; तर शोलोखोवच्या कादंबऱ्यांत व्यक्तिस्वभाव प्रसंगांनी सिद्ध होतो.

तसे पाहिले तर टॉलस्टॉय आणि शोलोखोव यांच्यात मानसिक दृष्ट्या विरोधी प्रेमाचे नाते होते, असे म्हटले पाहिजे. शोलोखोवपुढे ' युद्ध आणि शांतता ' ही कृती सारखी तरळत असली पाहिजे. आधी म्हटल्याप्रमाणे आशय, व्याप्ती इ० बाबतीतला सारखेपणा सहजच लक्ष्यात येण्याजोगा आहे. याशिवाय काही अंतर्गत पुरावाही सापडतो. शोलोखोवचे एक पात्र आपला युद्धातला अनुभव रोजनिशीत नोंदून ठेवताना चक्क टॉलस्टॉयचा निर्देश करते. ग्रेगरीला-शोलोखोवच्या नायकाला ही रोजनिशी सापडते आणि ती तो वाचतो. ही सारी नोंद अगदी ' बुकिश ' वाटावी अशा तऱ्हेने शोलोखोवने समोर ठेवली आहे. याच्याच शेजारी त्याने ग्रेगरीच्या स्वतःच्या पहिल्या तरवारबहादुरीचे वर्णन केले आहे ते ठेवावे म्हणजे लगेच तोच अनुभव पण शोलोखोव वेगळ्या तऱ्हेने मांडतो; एवढेच नव्हे, तर हा वेगळेपणा नजरेत भरावा अशा पद्धतीने, त्याच अनुभवाची दोन्ही तऱ्हेची नोंदही करून दाखवितो, असे ध्यानात येईल. टॉलस्टॉयने जी गोष्ट केली, तीच गोष्ट पण आपण वेगळ्या तऱ्हेने करावयाची असा जणू शोलोखोवचा निर्धार दिसतो. एका कुटुंबाचे चित्रण, जगड्व्याळ घडामोडींचे चित्रण, रशियाच्या भूमीचे व निसर्गाचे चित्रण, युद्ध, मृत्यू या गोष्टींचे यथार्थ दर्शन, लग्नोत्सव, जन्मोत्सव, अंत्यसंस्कार, प्रेमाच्या तऱ्हा या साऱ्यांचे पुन्हा विविध प्रकार, समाजातील विविध थरांतील लोकांच्या लकबी या सर्व गोष्टी उभय कादंबरीकार समोर ठेवतात. तरीसुद्धा दोघांचे दृष्टिकोण सर्वस्वी भिन्न दिसतात. टॉलस्टॉयइतके मोठे व्हायचे; पण त्याच्यापेक्षा वेगळ्या मार्गाने जाऊन, असा शोलोखोवचा पणच आहे, असे म्हटले ते ह्याच संदर्भात. उदाहरणार्थ, मृत्यू, युद्ध यांचे चित्रणच पाहा. टॉलस्टॉयच्या ॲन्ड्र्यूला

रोस्टॉवला, पिएरला मरण आणि युद्ध दिसते. पण ते नुसते नाही; त्यांना त्यांची निष्फळता, अंतिमता आणि अटळताही जाणवते. मरण येते, तेव्हा आकाश अगदी काहीही न घडल्यासारखे निळेशार असू शकते हे या पात्रांना जाणवू शकते. टॉलस्टॉयने उभी केलेली मृत्युदृश्ये एक प्रकारे शांत वाटतात, तटस्थ वाटतात. या उलट शोलोखोव्हच्या ग्रेगरीला त्याच्या बुंचुक, मिश्या इत्यादींना दिसणाऱ्या मरणात एक हिंस्रता, क्रूरता आहे. मरण म्हणजे एक विध्वंस, एक मोडतोड, भीतीने गारठवून टाकणारी एक शक्ती असा शोलोखोवच्या पात्रांना लागलेला अर्थ असतो. निसर्ग, रशियाची भूमी, ऋतुचक्र घ्या, टॉलस्टॉय नेमकेपणाने टिपतो. त्यांच्या सामर्थ्य-मर्यादांचा प्रत्यय आणून देतो, पण या साऱ्यात भावव्रुडलेपणा-हळवेपणा यांचा लेशही नसतो. हे सारे सुंदर असते, किंवा मनाला उदासताही आणू शकते पण टॉलस्टॉयच्या पात्रांना या साऱ्या गोष्टी माहीत आहेत. शोलोखोवच्या पात्रांना त्या भावुक रीतीने जाणवतात. शोलोखोवला स्वतःला त्या इतक्या जाणवतात की रशियाच्या मैदानी गवताळ प्रदेशाचे, स्टेप्सचे काव्यात्म वर्णन तो कादंबरीत करतो आणि तेही अशा तऱ्हेने की स्टेप्सचे तो जणू स्वतंत्र स्तुतिस्तोत्र गात आहे ! एखाद्या स्तोत्राच्या समाप्तीत आढळते, तद्वत या वर्णनाच्या अखेरीस शोलोखोव लिहितो, " हे स्टेप्स, मी तुला वंदन करतो. शिरसाष्टांग प्रणिपात करतो." लग्न इ. विधींतही शोलोखोव हात राखून वर्णन करीत नाही. अशा प्रसंगी टॉलस्टॉय त्या विधीचे गांभीर्य, पावित्र्य आणि एकूण प्रयोजन यांचे भान राखून शब्दयोजना करतो, तर शोलोखोव या विधीमागील सांकेतिकता, अर्थहीनता यांकडे आपले लक्ष वेधतो. हे विधी म्हणजे एकाची पदरमोड आणि अनेकांचे उदरंभरण किंवा हे विधी म्हणजे शोकसमारंभाच्या वेळी यथेच्छ ताव मारणे, किंवा सुखासमाधानाच्या प्रसंगी आजारी होण्याइतकी दारू ढोसणे, या कोटीतली विसंवादांची मालिकाच होय, असे तो सुचवीत राहतो. जमिनीची ओढ, शरीराची भूक, पोटातील आग, रक्तपातांची वगळ्यागत पसरत जाण्याची वृत्ती, आत्म्याचे अजाण, वैदेह्य आक्रंदन ह्या गोष्टी शोलोखोव उभ्या करतो. यामागे एक प्रकारचा जिवंतपणा आहे, वावटळी जोष आहे. नाही आहे ते एकच, ते म्हणजे सुजाण, चिंतनशील मन !

या वृत्तिभेदाचा आणखी एक मनोवेधक पुरावा म्हणजे नृत्यगायनादी कलाविष्कारांचे दोघांनी आपापल्या कृतीत केलेले उल्लेख. टॉलस्टॉयची नताशा शिकारीहून परत आल्यावर म्हाताऱ्या शेजाऱ्याच्या घरी उत्स्फूर्तपणे नृत्य करते, खिन्न झाली असता पिआनो वाजवते. म्हातारा शेतकरी शेजारीसुद्धा मोडक्यातोडक्या गिटारवर घोगरट आवाजात मनःपूर्वक गातो. शोलोखोवमध्ये असे काही आढळत नाही. त्याची पात्रे वीरश्रीयुक्त आरोळ्या देतात, धाय मोकलून रडतात आणि हसतातही गर्जत गर्जत. कलेची नजाकत, भावनाविष्काराचे संस्कारित संयत मार्ग या पात्रांच्या बाबतीत संभवतच नाहीत.

पात्र आणि प्रसंग यांच्या चित्रणाबाबत विचार करीत असतानाच स्वभाव-चित्रणाच्या पद्धतीविषयीचा एक खास विशेष नोंदला पाहिजे. टॉलस्टॉय पात्रांच्या मनात प्रवेश करून त्यांची स्वगते ऐकतो आणि आपले स्वभावचित्रण करतो, असे जाण-कारांनी प्रतिपादन केले आहे. याला 'Psychological eavesdropping' अशी नेमकी संज्ञाही पाश्चात्त्य समीक्षेत रूढ आहे. उलटपक्षी शोलोखोव वापरतो त्या पद्धतीला 'Saturation method' म्हणतात. गोगोल ही पद्धत अतिशय चपखलपणे उप-योगात आणीत असे. जो प्रसंग, जे पात्र वर्ण्य असेल, त्याचा तपशील असा भारंभार नोंदवीत जायचा की, अंती प्रसंग किंवा व्यक्तिचित्र साकार होऊन समोर उभे राहिले पाहिजे. या पद्धतीत, अर्थातच धोका असतो. तो म्हणजे जादा तपशील नोंदविण्याच्या भरातच वाहून जाण्याचा. तपशिलाची रास रचीत गेले की, मग प्रसंगांची जंत्री आणि व्यक्तींची वर्णने हाती लागतच जातात. गोगोल या धोक्यातून निभावला, याचे कारण त्याची सूक्ष्म विनोदबुद्धी आणि शोलोखोवही बराचसा बचावतो याचे कारण दोन नदी, कोसॅक लोक आणि ग्रेगरीसारखी पात्रे या सर्वांशी असलेली त्याची भावनिक गुंतवणूक.

टॉलस्टॉयपासून दूर राहण्याच्या या व्यापक प्रयत्नाचे आणखी एका दृष्टिकोणातून स्पष्टीकरण मिळू शकते. रशियाच्या कादंबरीवर अगदी आरंभापासून नसला, तरी बराच काळपर्यंत ज्याला Critical realism म्हणतात, त्याचा पगडा होता. या संज्ञेचा अर्थ तपशीलवार स्पष्ट करण्याची इथे गरज नाही. लेखकाची अलिप्तता, वर्ण्यविषयाच्या लौकिक रूपाचे प्रामाणिक चित्रण, याखेरीज एक प्रकारच्या कला-वादाचाही या संज्ञेने बोध होतो. साहित्याची फलश्रुती काय, या प्रश्नाचे संदिग्ध स्वरूपाचे उत्तर, वास्तववादाच्या या रशियाई आवृत्तीत दिले जाते. ते म्हणजे – 'मानवाच्या उन्नतीसाठी!' हे उत्तर कलाकृतीला अगदीच साधन बनविणाऱ्या भूमिकेहून काहीसे उजवे आहे. परंतु ऑक्टोबर क्रांतीनंतर, साहित्य म्हणजे एक साधन आणि लेखक म्हणजे हे साधन कौशल्यपूर्णतेने हाताळणारे कसबी समाजघटक आणि त्यांच्या कृतींचे फलित म्हणजे कामकऱ्यांच्या क्रांतीचे सर्वांगीण यश, अशी विचारधारा पुढे मांडणारा समाजवादी वास्तववाद हळूहळू पुढे सरसावू लागला. स्टॅलीनची सत्तेवरील पकड जसजशी मगरमिठीसारखी बळकट होऊ लागली, तसतशी या 'समाजवादी वास्तव-वादा' ने लेखकांच्या मानगुटीवर व्यवस्थित मांड ठोकली. लेखक हे "मानवी आत्म्याचे एंजिनियर्स" आहेत, हे सूत्र स्टॅलीनप्रणीत होय. १९२० सालापासून चार-पाच वर्षे रशियात नवीन अर्थधोरण प्रचारात होते. त्या कालखंडात भांडवलदारी युगातल्या सर्व गोष्टींचे समूळ शिरकाण करण्याचा वेडगळ प्रयत्न सुरू झालेला नव्हता. किंबहुना साम्यवाद आणि भांडवलशाही अर्थव्यवस्था यांचा या कालखंडात संकरच झालेला होता. हा संकर केवळ आर्थिक बाबींपुरता वा आर्थिक धोरणापुरताच मर्यादित नव्हता, त्याचा प्रभाव इतर जीवनक्षेत्रांतही पडलेला होता. पर्यायाने सांगायचे तर

लेखकांना कोणत्याही तत्त्वाच्या, धोरणाच्या, पक्षप्रणीत आदेशांच्या, फतव्यांच्या तालावर आपली लेखणी नाचवावी लागत नव्हती. या ' नेप ' कालखंडानंतर मात्र मनू पालटला. काय लिहावे, कसे लिहावे, याविषयी लेखकांना आदेश सुटू लागले. या सर्व तपशिलाचा उल्लेख करण्याचे प्रयोजन असे की ' शांत दोन ' चे पहिले दोन खंड ' नेप ' कालखंड संपेपर्यंत प्रसिद्ध झालेले होते. तिसरा आणि चौथा खंड यात सात वर्षांचे अंतर पडले होते. मधल्या काळात शोलोखोव स्टॅलीनला भेटला होता आणि त्याच्या सांगण्यावरून त्याने शेतीच्या सामुदायिकीकरणावर " वर्जिन सॉइल अपटर्न्ड " ही कादंबरी लिहिली. सांगायचा मुद्दा असा की, ज्या कादंबरीचा संकल्प आणि घडण " क्रिटिकल रिॲलिझम " च्या मुशीत झाली, तिच्या अखेरच्या भागाची सिद्धी मात्र ' समाजवादी वास्तववादा ' च्या साच्यातून झाली. झारचा शिपाई, श्वेत बोल्शेविक योद्धा, लाल शिपाई, कोसॅक बंडखोर इत्यादी अनेक नात्यांनी ग्रेगरीने बजावलेली कामगिरी सांगताना शोलोखोवने प्रारंभी तरी आपले लेखकाचे इमान सोडलेले नव्हते. पण तिसऱ्या व चौथ्या भागात तो ' लाल ' गोष्टींचा समर्थक बनलेला आहे. १९५९ सालच्या शोलोखोवने स्वतः सुधारलेल्या आवृत्तीत, लाल लष्करी सैन्याच्या दिशाहीनपणे झालेल्या आणि गोंधळलेल्या परिस्थितीत घडून आलेल्या चकमकींचेही वर्णन ' लष्करी डावपेच ' म्हणून केलेले आहे. शोलोखोव हा नंतर पक्का कम्यूनिस्ट बनला, सरकारी मानमरातबांचा धनी झाला आणि स्वतःला प्रमुख रशियाई कादंबरीकारही समजू लागला. पास्तरनाकसारखा प्रतिभावंत हयात असता, सोल्झेनित्सिनसारखा समर्थ साहित्यिक समोर असता बढाईखोरपणे आत्मप्रौढी बोलून दाखविणे हे केवळ लेखनगुणांच्या बळावर कोणाही मोकळ्या मनाच्या लेखकाला जमले नसते. शोलोखोवला ते जमले; कारण स्टॅलीनप्रणीत पोथीनिष्ठ साम्यवादी आग्रही ढापणे त्याने आपल्या विवेकदृष्टीला लावली. आपल्या मुक्त कोसॅक प्रतिभेच्या मानेवर त्याने साम्यवादाचे जोखड बांधून घेतले आणि त्याची कादंबरी ( आणि तदनंतरचे त्याचे लेखन तर विशेषच ) अडखळू, लटपटू लागली. शोलोखोवच्या ग्रेगरी साम्यवादी शिपाई म्हणून मरत नाही, तर दोन नदी, रशियाची भूमी, कोसॅक लोक आणि स्वतःचे कुटुंब यासाठी जगू पाहणारा, एक गोंधळलेला आणि भोवतालच्या परिस्थितीत न मावणारा माणूस म्हणून मरतो. बदललेल्या शोलोखोवच्या हातून ही घटना घडणे अशक्य वाटावी, इतका तो पार पालटून गेला, झापडे बांधून बंद झाला. आपल्याच प्रतिभेने निर्माण केलेल्या ग्रेगरीच्या आत्म्याची अगदी कम्युनिस्टी निर्घृणपणे तो हत्या करू शकला नाही, म्हणूनच केवळ ' शांत दोन ' ही एक कलाकृती म्हणून आपल्यापुढे उभी राहू शकते.

आता एकच महत्त्वाचा मुद्दा विचारात घ्यायचा राहिला आहे. टॉलस्टॉयप्रणीत ' महाकाव्य ' पद्धतीच्या कादंबरीचा आदर्श शोलोखोवपुढे, अजाणता का होईना,

असला पाहिजे. पण शोलोखोवच्या या कृतीची श्रेणी त्या महाकाव्यात्म कादंबऱ्यांच्या कोटीतली आहे काय ? मानवी जीवन सामग्र्याने लक्षात घेणे, मानवी जीवनाचा अर्थ कोणत्या तरी भूमिकेवरून शोधण्याचा प्रयत्न करणे, केवळ स्वतःला पटलेल्या तत्त्वाच्या, सत्याच्या वा तत्त्वप्रणालीच्या चौकटीत मानवी जीवनाला न कोंबता मानवी जीवनातल्या वरवर परस्परविरोधी वाटणाऱ्या प्रवृत्तींचे व्यापक दृष्टिकोणातून दर्शन घेणे व घडविणे इत्यादी अनेक गोष्टी महाकाव्याचे विशेष म्हणून नमूद करता येतील. व्यापकता, खोली आणि मानवी जगतातली गुंतागुंत या सर्वांना आपल्या कवेत घेऊ शकणारी साहित्यकृती 'महाकाव्य' या बिरुदावलीवर अधिकार सांगू शकते. शोलोखोव ही उंची गाठू शकत नाही; कारण त्याला जीवनाचा हा व्यापक दृष्टिकोण नाही. तो साम्यवादी विचारसरणीचा किंवा कोसॅकभूमीच्या भक्तीचा चष्मा लावल्याखेरीज जीवनाकडे सरळ बघूच शकत नाही. दुसरे कारणही या काहीशा मर्यादित आवाक्यातूनच उद्‌भवलेले आहे. ते कारण म्हणजे शोलोखोवची भावविवशता. तो मर्यादित भावनापटातच गुरफटून राहतो. शारीरिक वासना, मातृ-पितृ-वात्सल्य, भय, लौकिक आनंद, क्रौर्य इत्यादी मोजक्या भावनांखेरीज इतर असंख्य भावच्छटांचे दर्शन त्याला घडलेले नसावे आणि म्हणून त्याने आपल्या लेखणीचे सामर्थ्य मोजक्याच भावनांच्या रेखाटणात पणाला लावले आहे. आपण भावविवश होत आहोत याचेही भान त्याला राहात नाही. त्याचा भावनापट मर्यादित आहे आणि म्हणून त्याचे चित्रण प्रसंगात्म episodic आहे. काही सुट्या सुट्या प्रसंगांच्या चित्रणात तो फार यशस्वी होतो. आपल्या साम्यवादी ढापणांचा तेवढ्यापुरता त्याला विसर पडलेला असतो. 'शांत दोन' मधील ग्रेगरी– अक्सिनिया प्रेमकथा, चुंचुकची कथा इत्यादी भाग पाहावेत. पण याच गुणामुळे तो कथा मात्र चांगल्या लिहू शकला. 'दोनच्या कथा' हा त्याचा १९२५ साली प्रसिद्ध झालेला पहिला कथासंग्रह याचे प्रत्यंतर पटवितो.

शोलोखोवने आणखी काही खास महत्त्वाचे लेखन अजूनपर्यंत केलेले नाही. ज्या ताजेपणाने दोनची विविध रूपे तो पाहू शकला, तो ताजेपणा आता त्याच्या जवळ राहिला नसावा असे वाटते. नोबेल पारितोषिक स्वीकारताना त्याने केलेले भाषण एका संवेदनशील लेखकाचे मन राजकीय आणि अवांतर कारणांनी निबर झाले असल्याच्या खुणा पटविणारे आहे. पण त्याबद्दल केवळ खंत व्यक्त करण्यापलीकडे 'शांत दोन' च्या वाचकाच्या हाती काहीही नाही.

# एक स्पष्टीकरण

श्री. संपादक, म. सा. पत्रिका यांस— सा. नमस्कार वि. वि.

कै. विनायक लक्ष्मण भावे यांच्या जन्मशताब्दि स्मृत्यंजलिनिमित्त 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा जो विशेष अंक संपादकमंडळाने प्रसिद्ध केला आहे, त्यात पान ४ वर परिच्छेद २ यात पुढील विधान करण्यात आले आहे "हजार पाचशेच्या देगणीची अपेक्षा बाळगून आलेल्या महर्षी कार्व्यांना पन्नास हजार रुपये देऊन त्यांनी चकित आणि हर्षभरित केले." गु. अण्णा हे त्यावेळी म्हणजे रक्कम दिली होती त्यावेळी चकित व हर्षभरित झाले हे खरे पण हे दिलेले पन्नास हजार रुपये गुरुवर्यांना स्वीकारता मात्र आले नाहीत. कारण अगदी त्याच सुमारास कै. सर विठ्ठलदास ठाकरसी यांजकडून १५ लाखांची देणगी 'भारतीय महिलाविद्यापीठा'स मिळाली. आणि या विद्यापीठाचे नव्हे तर या विद्यापीठाने चालविलेल्या सर्व महाविद्यालयांना आणि शाळांनासुद्धा श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरशी असे नाव द्यावे लागल्यामुळे कै. विनायक लक्ष्मण भावे यांनी सुचविल्याप्रमाणे पुणे येथील महिला पाठशाळेस त्यांच्या मातोश्रींचे 'सरस्वती भावे' हे नाव देणे अशक्य झाले. या अटीवरच त्यांनी पन्नास हजार रुपये दिले होते. पण ती अट पुरी करणे संस्थेस शक्य न झाल्यामुळे ५० हजारांची देणगी जशीच्या तशी आभारपूर्वक परत करावा लागली. असा हा विलक्षण योगायोग घडला म्हणून पान ४ वर केलेले विधान जरी एका अर्थी खरे असले, तरी रक्कम परत करावी लागली ही गोष्ट तितकीच खरी आहे.

आपला

**विश्वनाथ आबाजी मोडक**

सेवानिवृत्त आजन्म सेवक, हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था

# मा णू स र वीं द्र ना थ

श्री. वा. जोशी

महाभारत-रामायण लिहिणाऱ्या व्यास-वाल्मिकींविषयी 'कवि ते होते कसे आननी' ही विचारणा सदैव अनुत्तरितच राहील. महाकवी रवींद्रनाथांच्या बाबतीत मात्र असा प्रश्न गैरवाजवी ठरेल एवढे त्यांचे चित्र परिचित आहे. 'दाढीदार सतेज शांत वदनी गांभीर्य हे प्रेमळ। अंगी नाजुक सैल रेशमि झगा टोपी शिरी मखमली ॥' अशा थाटाचे त्यांचे व्यक्तिमत्त्व लहानापासून थोरापावेतो सर्व सुशिक्षित भारतीयांच्या परिचयाचे आहे. मात्र 'कवि तो होता कसा जीवनी' असे विचारण्याइतपत कुतूहल त्यांची कितीही चरित्रे लिहिली गेली तरी कायम आहे. बंगाली वाङ्मयात रवींद्रविषयक ग्रंथांची डोंगराएवढी रास झाली आहे. रावींद्रिक अध्ययनाची एक स्वतंत्र शाखाच इथे आकारास आली आहे. अभ्यासजड अशा प्रबंधग्रंथांबरोबरच रवींद्रनाथ ठाकूर, देवेंद्रनाथ ठाकूर या व्यक्तींची ओळख करून देणारे, 'रविरायाचे कैसे बोलणे। रविरायाचे कैसे चालणे। रविरायाचे सलगी देणे। कैसे असे ॥' हे सांगणारे ग्रंथही कमी नाहीत. खुद्द कवींचे लेखन, पत्रसंग्रह, आत्मचरित्रादी साहित्याच्या जोडीने त्यांचे आप्तेष्ट, स्नेहीसोबती, शिष्यवृंद नि समकालीन साहित्यिक यांच्या स्मरणगाथांतून या माणसाची ओळख पटते. सीतादेवी, मैत्रेयीदेवी, राणी चंदा, निर्मला महलानबीस, लीला मजुमदार, इंदिरादेवी, सरलादेवी, प्रतिमादेवी, प्रमथनाथ बिशी, नंदगोपाल सेनगुप्त, दिलीपकुमार राय, बुद्धदेव बसू, काननविहारी मुखोपाध्याय, सुधीरचंद्र कर, प्रभात गुप्त, खगेंद्रनाथ चट्टोपाध्याय, जसीमुद्दीन, शचींद्रनाथ अधिकारी अशी किती नावे सांगू? या साऱ्यांच्या आठवणींतून उमटणारे गहिरे रंग एका महाकवीच्या मानव-रूपाचा मनोज्ञ साक्षात्कार घडवितात. श्रीगौरसुंदर गंगोपाध्याय यांनी या सर्व ग्रंथांचे मंथन करून काढलेले नवनीत आपल्या 'आटपौरे रवींद्रनाथ' या पुस्तकात नुकतेच

सादर केले आहे. त्यांना वाट पुसत मराठी वाचकांसाठी घेतलेला हा मागोवा. महामानव असूनही तुमच्यामाझ्यासारख्याच असणाऱ्या माणूस रवींद्रनाथांचा.

### वंदिस्त बालपण

महर्षी देवेन्द्रनाथांचे हे चौदावे रत्न! जन्म २५ वैशाख १२६८ वंगाब्द (७ मे १८६१) रोजी झाला. कलकत्ता शहर आधीच किती जनाकीर्ण! त्यातही घनदाट वस्तीच्या अशा जोडा सांको विभागात ठाकूर परिवाराची वाडी आहे. 'ठाकुरवाडी' म्हणूनच ती ओळखली जाते. रवींद्रांच्या लहानपणी ठाकुरवाडीत नोकरशाही अंमल असे. महर्षी देवेन्द्रनाथ स्वतःला कामात इतके गाडून घेत की, मुलांच्या वाट्यास वडील येणे कठीण असे. त्यांचे दौरेही चालू असत. त्यामुळे नेमलेल्या नोकराचाकरां-वरच मुलांचा भार सोपवलेला असायचा. चाकरांनी आखून दिलेल्या चौहद्दीबाहेर जाण्याची मुलांची छाती नसे. रवींद्रांनाही त्यांच्या श्याम या चाकराने एक लक्ष्मण-रेषा आखून दिली होती. तिला ते 'श्याम गंडी' म्हणत. या नोकरप्रधान व्यवस्थेला पुढे त्यांनी 'भृत्यराजक तंत्र' असे मोठे भारदस्त नाव मिस्किलपणे बहाल केले होते! घरातील वातावरण सामान्य मध्यमवर्गीय कुटुंबासारखेच होते. थाटमाट नि भोगविलास त्यांना त्यात अवसर नव्हता. भाऊ, भाचे, चुलतभाऊ, मामेभाऊ इ. बालसेना शाळेत जाऊ लागली तसा बाल रवी पण हट्ट धरू लागला. शाळा म्हणजे काय हे माहीत नसण्याचे ते वय! पण कमीत कमी घरच्या कोंडवाड्यातून सुटून ही मुले काही वेळ तरी बाहेर जातात, असा विचार रवीला सुचला असावा. त्याने रडून घर डोक्यावर घेतले. तेव्हा शिकवणीसाठी घरी येणारे माधव पंडित म्हणालेच, "आज शाळेत जाण्यासाठी रडतोय, उद्या न जाण्यासाठी अधिक रडेल." आणि त्यांचे हे भाकित खरे ठरले. १८६८ मध्ये ७ व्या वर्षी हे बाळ ओरिएंटल सेमिनरीत दाखल झाले. पण त्यानंतर नॉर्मल स्कूल, बेंगॉल ॲकडेमी, सेंट झेवियर्स अशा शाळा बदलत बदलत शेवटी नववीच्या वर्गात नापास होऊन बाळाने शाळेस रामराम ठोकला! त्यांचे गुरुजन त्यांच्या भवितव्याविषयी हताश झाले होते. पण वडिलबंधू सत्येंद्रनाथ यांनी नेट धरला. सत्येन्द्रनाथ विलायतेहून आय. सी. एस. होऊन आलेले पहिले भारतीय. त्यांनी रवीला बॅरिस्टर करण्याचा चंग बांधला. पण विलायतेत जाऊनही रवींद्रनाथांचे मन शाळेच्या चार भिंतींत रमेना. एक पब्लिक स्कूल नि लंडन युनिव्हर्सिटी कॉलेज यांत काही महिने इतस्ततः काढून १८८० च्या फेब्रुवारीत ते भारतात परतले. शाळा-कॉलेजातील चाकोरीबद्ध विद्यार्जनाची अशी इतिश्री झाली, तरी घरच्या घरी त्यांनी नाना विषयांशी जानपछान करून घेतली. वाचनाचा त्यांना अनावर छंद. गणित, विज्ञान, यंत्रविद्या, चित्रकला, काव्य, व्याकरण, इतिहास, भूगोल, वाङ्मय, किंबहुना कोणतीही शास्त्र, त्यांच्या तैलबुद्धीने अविषय मानली नाही. अध्ययनाइतकीच गायनवादनात गोडी

आणि गाण्यावजावण्याच्या जोडीनेच आखाड्यात जोडी मुद्गर फिरवून पहिलवान उस्तादाकडून कुस्तीचे पेचही शिकून घेण्यातही आघाडीवर. त्यांच्या सुडौल सुगठित देहयष्टीचे श्रेय किशोरवयात अंगास लागलेल्या लाल आखाडमातीस द्यायला हवे.

### आकृतिविशेष आणि पोशाख

आपादमस्तक ऐटबाज, पुरुषोचित देहसौंदर्याचे त्यांना वरदान लाभले होते. हस्तिदंतासारखी कांतिमान वपुश्री, रुबाबदार दाढी नि जटाभार नि साजेसा पोशाख यात पुऱ्या उंचीची त्यांची भरदार मूर्ती एखाद्या ऋषिमुनीसारखी भासे. अगदी ऐन यौवनभरातही दैवी देखणेपणाने नटलेल्या त्यांच्या अपरूप सौंदर्याचे वर्णन करताना दीनेशचंद्र सेन म्हणाले होते की, त्यांना पाहून मनात येई की भगवी छाटी याला किती शोभून दिसेल! भव्य भृकुटिहीन कपाळ बहुधा चंदनचर्चित असे. त्यांचे डोळे टपोरे नि करुणार्द्र दिसत. कुणाला त्यात मोगल सम्राटाची शान आढळली आहे, तर कुणाला हरिणशावकाच्या स्वच्छ डोळ्यांचे नितळ भान. मोर सुंदर असला तरी त्याच्या केका कर्कश असतात. इथे विधात्याने काहीच हातचे राखून ठेवले नव्हते. त्यांच्या गोड श्रुतिमधुर स्वरावलीने लुब्ध झालेल्या अनेक 'कान' सेन रसिकांनी त्याबाबतही निर्वाळा दिलेला आहे. बुद्धदेव बसूंनी कवीच्या स्वर्णझंकृत कंठस्वराची तारीफ केली आहे. तरुणपणीचीच एक गोष्ट आहे. पंडित रामेंद्रसुंदर त्रिवेदींकडे ते काही कामानिमित्त गेले. त्रिवेदीजी घरी नव्हते. त्यांच्या वृद्ध मातोश्रींनीच अतिथिसत्कार केला. नंतर चिरंजिवांस विचारले, " बाळ, कोण देवपुरुष आला होता रे! चौपाईवर बसला नि सारं घर जणूं उजळून गेल्यासारखं भासलं!"

त्यांच्या मनमोहक रूपवत्तेची भारून जाऊन केलेली वर्णने अनेक देशी-परदेशी व्यक्तींच्या लेखण्यांतून उतरली आहेत. परखड स्वभावाची प्रौढी मिरविणाऱ्या काही आधुनिक वाचक मंडळींना त्यात पायघोळ भावुकता भासण्याची शक्यता आहे. अशा शंकेखोरांना कदाचित शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांची साक्ष स्वीकार्य वाटेल. अमल होम हे पत्रपंडित रविबाबू नि शरद्बाबू या उभयतांचेही स्नेही! अमलच्या विवाह-समारंभास ही दोन्ही नक्षत्रे उपस्थित होती. नंतर एका पत्रात शरदबाबूंनी लिहिले, " फार काळानंतर परवा मी रवींद्रनाथांना पाहिले. किती विस्मित करणारे सौंदर्य लाभले आहे त्यांना! डोळे दूर करावेसे वाटेनात. वय वाढतंय तसं रूप जणु उमलतंय. रूप नव्हे सौंदर्य. जगात याहून विलक्षण नवल मला तरी माहीत नाही." रविबाबू ६६ वर्षांचे असताना निघालेले हे उद्गार आहेत!

पोशाखपरिवेषातही त्यांची मूळची अभिजात कलादृष्टी प्रत्ययास येई. घरात वावरतानाही साधे हातसुती धोतर नि शाल ते अशा संभावीत, सुरुचिसंपन्न धाटणीने नेसत की पाहणाराचे डोळे निवावेत. पायापर्यंत पोचणाऱ्या बरसाती बरकोटात लपेटलेली,

रिमझिम पावसात गान गुणगुणत शांतिनिकेतनच्या लताकुंजांतून लगबगीने जाणारी कविमूर्ती प्रमथनाथ बिशींना पद्मवनात शिरणाऱ्या ऐरावताची आठवण करून देते. शुभ्र जटाजूट, शुभ्र उत्तरीय, धुवटस्वच्छ धोतर नि झब्बा दक्षिणवायूच्या झुळुकांवर भुरभुर उडताना धीरोदात्त पदक्षेपांत भूमी नमवीत चालणाऱ्या त्यांच्या आदरणीय आकृतिविशेषाकडे टक लावून पाहणारे दीनबंधू अंड्र्यूज उद्गारले, " He looked like Christ in his years." त्यांच्या ठायी हे खिस्तमूर्तिसादृश्य अनेकांना अनेकदा जाणवले आहे.

त्यांचा रोजचा पोशाख म्हणजे पायजामा नि त्यावर सैलसा झब्बा किंवा गाऊन-सारखा दिसणारा ' आलखेल्ला ' नावाचा पायघोळ झगा. वृद्धवयात हालचाल सुकर व्हावी म्हणून लुंगी नि परकर यांचा मिलाफ करून त्यांनी नाडीलुंगी शिवून घेतली होती. हिवाळ्यात कधी काळ्या कांबळ्याचा ग्रेट कोट घालत, कधी शेरवानीसारखा गरम पायघोळ झगा वापरीत तर कधी कडक थंडीतसुद्धा साधे खादीचे कपडे वापरीत. अंगावर नारिंगी रंगाची शाल असे. कधी शांतिनिकेतनच्या वैशिष्ट्यपूर्ण बाटिककलेचे रंगकाम केलेली रेशमी चादरही असे. त्यांचा ' आलखेल्ला ' बसंती, अंजिरी, बदामी, भगवा, घननील अशा रंगांवर असे. पळसाच्या फुलांसारख्या लाल किंवा कातखड्यासारख्या मातकट खैरी रंगाचा गरम कोटही ते वापरीत. त्यात त्यांचा कर्पूरगौर वर्ण अधिक खुलून दिसे. उन्हाळ्यात घाम येई तो टिपण्यासाठी बाहेरच्या कळीदार झब्ब्याआत ते आणखी एक जाकीटवजा झब्बा वापरीत. खादीत अनेकदा रेशमी बाणही असे. उत्सव-समारंभात ते विशेष आस्थापूर्वक पेहराव करीत. पायात साध्या चपला असत. कधी आकडा वर वळणारे ऐटबाज नागदाइ चढावही वापरीत. बाहेर जाताना मस्तकावर टोपी वापरीत. ती मखमली किंवा जाड रेशमी असे. अनेक प्रयोगानंतर त्यांनी ती स्वतः बनवून घेतली होती. काहीशी नेपाळी, काहीशी इराणी, उंच दिवालीची, धड गोल नाही, धड चौकोनी नाही, अशी ती खास टोपी त्यांच्या माथ्यावर चढताच कशी मुकुटासारखी शोभायची ! त्यांच्या लहरदार वेषभूषेची एक आठवण राणी चंदांनी सांगितली आहे. सरत्या शिशिराच्या मोसमात एकदा पाहिले तर गुरुदेव बसंती रंगाचा झब्बा घालून व्हरांड्यात बसलेले. बाकीची मंडळी अजूनही शाली-दुशालीतच होती. नवल वाटून राणी चंदांनी कवींना विचारले. त्यांचे उत्तर असे, " लिहायला बसलो होतो. एकाएकी हवेत दक्षिणवायूच्या चोरपावलांची चाहूल लागली. तो स्पर्श होताच लेखन थांबवून आधी पोशाख बदलला. वसंतागम आता दूर नाही. ऋतुराजाचं स्वागत करण्यासाठी त्याला साद घालण्यासाठी इथं बसलो आहे. " गोरज वेळेच्या सोनसळ्या संधिप्रकाशात न्हाऊन निघालेल्या बसंती झब्ब्यात शोभून दिसणारी ती ध्यानमग्न कवि-मूर्ती पाहणाऱ्याला मुग्ध न करती तरच नवल !

## आहारवैचित्र्य

रवींद्रनाथ खवय्ये नव्हते, पण चोखंदळ रुचीचे होते खास. त्यांचे बालपण काहीशा व्रतस्थ वातावरणात गुदरले असल्याने भोजनविलासाला त्यात स्थान नव्हते. त्यामुळे अनाहार, मिताहार, सत्त्वाहार, यांचेच प्रयोग जीवनभर त्यांनी केले. परोपरीच्या रुचिवैचित्र्याचा, आगळ्यावेगळ्या खाद्यपदार्थांचा आस्वाद त्यांना हवा असे. पण केवळ चव चाखली की हा सोस पुरा होई. बकासुरासारखे उदरंभरण करण्याचा त्यांना तिटकारा असे. पंक्तीला चार मित्रमंडळी असावीत नि त्यांना आग्रहाने खाऊ घालावे, अशी त्यांची वृत्ती होती. या बाबतीत ईश्वरचंद्र विद्यासागरांशी त्यांचे नाते जुळते ! टेबलावर आलेल्या पदार्थांत काही खुमासदार आढळले की लगेच त्या पदार्थाच्या खास भोक्त्याची त्यांना आठवण होई नि त्याच्याकडे तो रवाना करण्यासाठी तगादा लावीत ! जवळपासच तो असेल तर त्याला तावडतोब बोलावून खाऊ घालीत. मग अगदी स्वतःच्या पुढ्यातील वाटीसुद्धा ! उलट शांतिनिकेतनमध्ये कुणाकडेही काही चांगली रसोई झाली की गुरुदेवांना नैवेद्य पोचवला जाई. अशा प्रसंगी घरचा स्वयंपाक बाजूस राहून या नवागत गुडखाद्याचेच चवीने रसग्रहण चालायचे !

मांसाहार निषिद्ध नसला तरी त्यांचा स्वाभाविक कल शाकाहाराकडे होता. शांतिनिकेतनची सुरुवात ब्रह्मचर्याश्रमाने झाली. त्या काळी शाकाहार हे व्रत होते. मत्स्याहारी मंडळींना फार खडतर वाटणारे असे हे व्रत ! त्यांच्या सूनबाई प्रतिमादेवी लिहितात की, निरामिष आहारच त्यांना पसंत असे. पण स्वास्थ्यरक्षणासाठी डॉक्टरी सल्ल्याने सामिष आहार कधी कधी घ्यावा लागे. शाहजादपूर येथे जमीनदारीच्या भागात वास्तव्य असताना ( १८९१ ) त्यांचा निरामिष आहार, भाताऐवजी रोटी खाणे इत्यादी प्रकार पाहून गावकऱ्यांना मोठा अचंबा वाटे. उपासतापास करणारा असा हा एक परमधार्मिक ठाकूरबाबा असल्याचा त्या काळी बोभाटा झाला होता ! पद्मा नदीत नौकावास असताना एकदा बवर्जीखान्यातून पळालेल्या कोंबडीची तडफड त्यांनी पाहिली नि मांसाहारावरील त्यांची उरलीसुरली वासनाही नष्ट झाली. पूर्व बंगालमधील जेसोर जिल्ह्यात त्यांची सासुरवाड होती. कुश्तीया येथे एकदा मुक्कामास असताना त्यांच्या सासूबाईंनी त्यांना आग्रहाने मांसाची कढी खाऊ घातली. घरी पत्नीस लिहिलेल्या पत्रात त्यांनी लिहिले, " खाल्ली खरी, पण जिभल्या चाटीत नव्हे !"

रोज रोज एकाच धर्तीचा खाना त्यांना रुचत नसे. अनेकवेळा त्यांनी घरच्या लेकीसुनांना तक्ता बनवून दिला होता. एकच पदार्थ पुनः लवकर येणार नाही असा त्यात कटाक्ष असे. पद्मा नदीवरील नौकानिवासात एकदा नाटोरचे महाराज त्यांचा पाहुणचार घ्यायला आले. रवींद्रनाथांनी स्वतः तिन्ही त्रिकाळचा मेनू आखून दिला आणि जेवढे दिवस महाराज राहिले तेवढे दिवस सतत नवनवीन पदार्थ करून टेबल

सजविले. स्वतःच्या पाककौशल्याचे त्यांना स्वतःला कौतुक असे. चांगल्या सुगरिणींना सुद्धा चार शब्द सुनावता यावेत, इतकी त्यांची गती याही छंदात होती. स्वयंपाक-घरात स्टूल ओढून त्यावर बसून पत्नीस पाकशास्त्रातील सूचना देणाऱ्या कवीची आठवण तर अनेकांनी सांगितली आहे. पदार्थांच्या कृती लिहून ठेवण्याची त्यांची एक चोपडी असे. आपल्या मनाने ऐकीव कृतीत फेरबदल करून तसे नवे फॉर्म्युलेही ते लिहून ठेवत ! एका पत्रात त्यांनी मुलीला लिहिले आहे, " माझ्या वहीतील कृतीनुसार पदार्थ करून पाहुण्यांना वाढलेस तर ते मुक्काम हलवण्याचे नाव काढणार नाहीत. " त्यांची ही वही कुणी तरी लांबवली, तेव्हा ते फार हळहळले. आपली एक महान रचना लुप्त झाली असेच जणू त्यांना दुःख झाले. एका पत्रात त्यांनी लिहिले, " रूपकार रवींद्र-नाथेर नाम टिकतेओ पारे, सूपकार रवींद्रनाथके केऊ जानबेना !" (साहित्यिक रवींद्रांचे नाव टिकून राहीलही, पण स्वयंपाककुशल रवींद्रांची आता कशी ओळख पटणार ! )

आप्तस्वकीयांतील सुगरिणींचे ते कौतुक करीत यात नवल नाही. सुनेने पाठविलेल्या 'रेसीपीज' वाचून त्यांनी लिहिले, "शास्त्रानुसार तुझे लेखन काव्यात मोडू शकेल. कारण साहित्यदर्पणकार सांगतात की, ' वाक्यं रसात्मकं काव्यम् ! ' " मैमनसिंग गौरीपूरचे जमीनदार ब्रजेंद्रबाबू यांची कन्या हेमंतबाला उत्तर बंगालमधील पाकक्रियांत निपुण होती. ताडगोळ्याचे किंवा कोवळ्या वेताचे विविध जिन्नस ती चांगले बनवी तिला ते विनोदाने लिहितात, " वेताची भाजी तू कशी करतेस कोण जाणे ! वेत म्हटला की, माझ्या डोळ्यांपुढे तरी गुरुजींची छडी उभी राहते ! " या हेमंतबाला देवी कवीच्या कौतुकाने हुरूप येऊन नवीन पदार्थांच्या कृती पत्राने कळवीत नि इकडे ठाकुरवाडीतील मुलीबाळी त्यांचे प्रयोग करताना धामधूम होत ! एकदा त्यांनी केळफुलाच्या भाजीची एक बादशाही कृती कळवली. पत्र वाचून कवी खूप झाले; त्यांच्या एका भोजनभाऊ मित्राच्या अंगावर तर रोमांच उभे राहिले ! त्यांचे मित्र श्रीशचंद्र मजुमदार यांची कन्या जोत्स्नालता अशीच सुगरण होती. तिने एकदा त्यांना ओळीने तेरा दिवस केळफुलाचा रोज नवा प्रकार करून घातला. " तुला असं सर्टिफिकेट लिहून देतो आता की यंव ! " अशी कवींनी तिची पाठ थोपटली. पूर्व बंगालमधील गृहिणी या विशेष रंधनकुशल मानल्या जातात. त्यातही जेसोर जिल्ह्यातील अधिकच. तशी कुणी पाहुणी शांतिनिकेतनमध्ये आल्याचे कळले की, यांची काही तरी फर्मायश झालीच म्हणून समजावे. कधीमधी त्यांच्या कौतुकास पात्र होण्यासाठी एखादी अनाडी अन्नपूर्णा जो पदार्थ करून पाठवी, तो त्यांच्या पसंतीस येत नसे. पिठा किंवा पिष्टक हा पूर्व भारतातील पिठाच्या मिष्टान्नांपैकी एक प्रकार आहे. अशाच एका उत्साही मुलीच्या हातचा पिठा खाऊन रवींद्रांनी अशी हाय खाल्ली की, त्यांच्या तोंडून पुढील आशयाचे उद्गार निघाले. " लोह कठीण, दगड कठीण, तशाच कठिण विटा। त्याहूनही कठिण बये तुझ्या हातचा पिठा ! "



अनुक्रमणिका






सकाळच्या न्याहरीसाठी ते टोस्ट व लोणी घेत. चहापेक्षा कॉफी त्यांना अधिक पसंत असे. पण दुधात स्वादापुरती कॉफीपूड घालत एवढेच. चहामात्र शौकीन चहा-बाजांसारखा उंची चिनी जातीचा आवडत असे. जेवण लवकर म्हणजे साडेदहाच्या सुमारास घेत. भात नि भाजी हे पदार्थ त्यात मुख्य असत. जेवण थाळ्यात न घेता खास बनवून घेतलेल्या दगडी ताटल्या वाट्यांतून घेत. भाजी बहुधा शांतिनिकेतन-मधीलच असायची. भीतभीत सुरणाची पण वर्णी कधी लागे. (बंगालमधला लाल-गुलाबी सुरण जालीम खाजरा, विषारी असतो.) दुपारी ते ताज्या फळांचा रस घेत. द्राक्षांचा रस त्यांना फार आवडे. हिवाळ्यात खजुरीचा रस किंवा ताजा मध असा ऋतुपरत्वे बदलही होई. आंबा अत्यंत आवडता आहार होता. आंब्याच्या मोसमात ते खूप असत. दिवसाकाठी ते दोनपासून आठ-दहापर्यंत देखील आंबे खात. कल-कत्त्याच्या बाजारात दशहरी आंबा आल्याची कुणकुण पत्रातून लागताच त्यांनी पर-देशातून हळहळ व्यक्त केलेली आहे. एकदा कुणी तरी त्यांना वय विचारले. त्यांनी ७६ ऐवजी ७५ सांगितले. विचारणाऱ्याला ७६ हे खरे वय माहीत असल्याने तो दुरुस्ती करू गेला. कवी उद्गारले, " वारे ! एक वर्षभर मी परदेशात होतो. त्या वर्षी एकही आंबा खाल्ला नाही. अन् ज्या वर्षी आंबा चाखला नाही त्या वर्षाला हिशेबात धरायचं कसं !" चीनच्या दौऱ्यात त्यांची आवड ओळखून तिकडे मिळणाऱ्या आंब्याच्या फोडी टेबलावर पुढे आल्या. कवींनी त्यावर एक शाब्दिक कटाक्ष टाकलाच, " अरे, हा तर माझा सहोदर दिसतोय." भोवतालची मंडळी बुचकळ्यात पडली. कवींनी हसत खुलासा केला, " अहो, माझ्यासारख्याच दाढीमिश्या भरपूर आहेत या आंब्याला !" तो रेषाळ आंबा पाहून उत्तमोत्तम आम्रफलांचा आस्वाद घेणाऱ्या चोखंदळ रुचि-रसिकाला अशी गोड थट्टा सहज सुचावी यात नवल नाही.

पानविडी तंबाखू किंवा सुपारी-तपकीर त्यांना वर्ज होती. चॉकोलेट किंवा चुइंग गम आवडत असे. स्वामी विवेकानंदांप्रमाणेच आईस्क्रीमचे ते भोक्ते होते. शांतिनिकेतन-मध्ये बर्फ मिळत नसे. त्या काळात चित्रकार मुकुल दे यांच्या पत्नी वीणादेवींनी मुद्दाम कलकत्त्याहून बर्फ, यंत्र इ. सरंजाम आणवून त्यांना छानसे आईस्क्रीम करून घातले. ते फार प्रसन्न झाले. बाग बाजारचे रसगुल्ले त्यांना विशेष आवडत. आहारातल्या या आवडीनिवडीला आणखी एक बाजू होती. ती म्हणजे त्यांच्या चंचल, लहरी वृत्तीची. त्यांचे मन सदाचे मंथर. नवनव्या प्रयोगांत त्यांना आनंद. खाद्याहाराच्या प्रयोगात ते महात्माजींनाही हार गेले नसते ! कारण महात्माजींना केवळ सात्त्विक आहार हवा असे. रवींद्रनाथांना त्रिगुणात्मकच काय त्रयोदशगुणी आहाराचेही वावडे नव्हते. तोलून-मापून खाणे, कच्चे खाणे, वाफेवर शिजवून किंवा भाजून खाणे असेही प्रयोग चालत. कधी सातूच्या पीठाची सद्दी असे, कधी मुगाच्या डाळीच्या पिठाच्या भाकऱ्या बनत. कधी पालेभाज्यांतील हरितद्रव्यावर भर असे. काकवी, आल्याचा रस, लिंबूरस, अशा नाना

रसांची मिश्रणे चालत. काही दिवस सकाळच्या चहाऐवजी पांता भातच खात (रात्रीचा उरलेला भात पाण्यात भिजवून ठेवायचा व तो सकाळी खायचा यालाच 'पांता किंवा पुरातन भात' म्हणतात. अधिक माहितीसाठी प्रा. दुर्गा भागवतांचा 'नवी क्षितिजे' त्रैमासिकात गतवर्षी आलेला लेख जिज्ञासूंनी पाहावा.) वीरभूमच्या रखरखत्या मरु-भूमीत लिंबूमीठ लावून खाल्लेला पुरातन भात पोटात गारवा आणीत असे. पण त्याचीही चलती चार दिवसच! जेवण्यापूर्वी पेलाभर कडूनिंबाच्या पानांचा रस ते घेत. ताजी पाने मिळत नसत, तेव्हा वाळलेल्या पानांची पूड ते पाण्यात घालून घेत. पित्त्याची थंडाई घ्यावी एवढ्या थंडपणाने ते तो कडू पेला मिटक्या मारीत रित-करीत. एकदा एक प्राणाचार्य आले नि भारतासारख्या उष्ण प्रदेशात हविष्यान्नासारखा श्रेष्ठ आहार नाही असे सांगून गेले. दुसऱ्या दिवसापासून यांच्या रसोईघरात मातीच्या परळात वरखाली विस्तव रचून हविष्यान्ननिर्मिती सुरू झाली! येणाऱ्याजाणाऱ्यांच्या जवळ लगेच शिफारससुद्धा होई, "काय तकवा वाटतो हो! तरी म्हटलं आपलं चुकतं कुठं?" एका गोऱ्या साहेबानं कोंबडीचे अंडे पूर्णान्न आहे म्हटले. काही दिवस मग कुक्कुटाराधना झाली. सेवाग्रामहून खबर आली की, सध्या तिथं लसणीचं राज्य आहे!' लगेच शांतिनिकेतनमध्ये लसून राणी झालीच. और घटकेसाठी! एक गुजराती वैद्य एकदा सांगू लागले की, कणकीत एरंडेल घालून ती तिंबली तर जन्मात कधी दवा-खान्याची पायरी चढायला नको. 'खाईल सफरचंद त्याचा दवाखाना बंद' अशा गोडगुलाबी आहारशास्त्राला सोकावलेल्या कविमित्रांच्या उरात ते ऐकून धडकीच भरली! कुणी आवळा हा रसराज आहे असे प्रतिपादन केले. आश्रमात आवळींना तोटा नव्हता. रोज ताज्या आवळ्यांची आहारात योजना झाली. मग कलकत्त्यास निघाले तरी आवळ्यांची एक मोटली सामानात!

## वि श्रां ति

भोजनानंतर वामकुक्षी आलीच. रवींद्रांना या वामकुक्षीचा तिटकारा होता. वास्तविक दुपारची डुलकी कुणाला प्रिय नसते! पण यांचा खाक्याच वेगळा. मध्यान्ह भोजनानंतर दारे लावून घेऊन पान-तंबाकू नि निद्रा यांच्या आधीन होण्याच्या बंगाली मिजाजीमुळे दुपारची झळझळीत सोन्याची वेळ आपण हरवून बसलो आहोत, असे ते म्हणत. कधी विनोदाने असेही म्हणत की, "लहानपणी उपनयन झाले तेव्हा दिवसा झोपणार नाही असं अभिवचन आपण उच्चारलं होतं तेच जीवनभर पाळत आलो.' ते सांगत की, पोते भरावे तसे पोट भरण्याचे काम मी करत नाही त्यामुळे देह सुस्ता-वत नाही. भर दुपारी रखरखीत उन्हाळ्याच्या दिवसांत दारे खिडक्या सताड उघड्या टाकून दारुण गरम अशा हवेच्या झळया अंगावर घेत कामात गुंतलेल्या रवींद्रांना अनेकांनी पाहिले आहे. हाताशी ताडपत्राचा पंखा नसे की पाण्याने भिजवलेल्या वाळ्या

च्या तट्टया नसत. उन्हाळ्याचा स्पर्श त्यांच्या जीवनसरणीत दिसायचा तो फक्त झब्ब्याची बटणे न लावण्यात. त्यांची ही ग्रीष्मसहिष्णू वृत्ती महात्माजींना रुचली नाही. ते कवींना म्हणाले, " गुरुदेव, एक भिक्षा हवी आहे. देणार का ? " गुरुदेव म्हणाले, "दिली, मागा काय हवं ते." "दुपारी भोजनोत्तर वामकुक्षी करीन, असं वचन द्या " महात्माजींनी मागणे मागितले. " अहो, पण दुपारची झोप मला अजिबात आवडत नाही. मला सोसणारही नाही." गुरुदेवांनी कुरकुर केली. बापू बधणारे नव्हते. ते म्हणाले, " ठीक आहे. नुसते घटकाभर स्वस्थ पडून राहात जा. " तेव्हापासून ते भोजनोत्तर अंमळ विसावा घेत. एकदा गंमत झाली. ते असेच पहुडले असताना आचार्य क्षितिमोहन सेन खोलीत आले. रवींद्रनाथांना लेटलेले पाहून ते परतणार होते. इतक्यात कवींचा आवाज ऐकू आला, " अरे, ये बैस, मी झोपलो नाही, महात्माजींना भिक्षा घालीत होतो ! " आयुष्यातील अखेरची चार-पाच वर्षे मात्र डॉक्टरी सल्ल्यानुसार ते आरामखुर्चीत पडून विश्राम करीत.

रात्रीची झोपही त्यांना चार-पाच तासांची पुरे होई. त्यांचे बरेचसे लेखन रात्री नि पहाटेच्या निवांत वेळी होई. उगीच नाही एवढी अफाट ग्रंथरचना झाली ! पहाटे ३॥-४ वाजता ते उठत. सूर्योदयापूर्वीच त्यांच्या लेखनास, चित्रांकनास, वाचनास आरंभ झालेला असे. पाहुणेमंडळी चकित होत की हे उठले कधी, प्रातर्विधी उरकले कधी नि स्थानापन्न झाले कधी ! रविउदय होतो केव्हा नि त्याच्या कोवळ्या किरण-धारांत स्नान करतो केव्हा, असे त्यांना होऊन जाई. आपल्या नावावर ते नेहमी कोटी करून स्वतःला ' सूर्यवंशी किंवा सूर्योपासक ' म्हणवत. ते उठले नसताना त्यांचा ' मिता ' ( मित्र, सूर्य ) उठला असे जीवनात कधीच घडले नसल्याची त्यांची यथार्थ प्रौढी असे. अरुणोदयापासून जो दिनक्रम आरंभ होई त्यात खळ अशी नसायची. स्वान्तःसुखाय केलेल्या लेखन-वाचनाबरोबरच इतर कामेही असत. भला दांडगा पत्रव्यवहार पाहावा लागे. संगीत चित्रकला हे छंद पुरवायचे असत. अतिथिअभ्याग-तांचे कोड पुरवावे लागत ( दिनक्रमातील सहनशक्तीवर सर्वांत अधिक ताण देणारा हाच भाग ! ) आणि शांतिनिकेतन-श्रीनिकेतनचा वाढता पसारा होताच. ' उदंड खस्तीची कामे ' करणारा कर्मयोगी, हे त्यांचे रूप अनेकांना माहीतच नसावे. कदाचित त्याकडे सोयिस्कर दुर्लक्ष होत असावे ! कारण थोरांच्या चरित्रातील अशा भागाचे अनुकरण करणे अवघड !

### मुक्तद्वार मीलनतीर्थ

कवींद्रकीर्ती जसजशी वाढत गेली, तसतशी शांतिनिकेतनमधील अतिथि-अभ्या-गतांची संख्याही वाढू लागली. भारतातून आणि परदेशातूनही साहित्यरसिकांची रीघ तर लागलीच. त्याशिवाय संताळ आदिवासी, आसपासच्या परिसरातील भूमिजन, वैष्णव

वरागी, बाऊल कविगण, राष्ट्रीय आंदोलनातील कार्यकर्ते, विद्यार्थी, कलावंत असा समाजाच्या सर्व थरांतील मंडळींचा राबता सतत असे. त्यांच्या निवासस्थानी कुणाला मज्जाव नसे. बरीचशी मंडळी दुरून दर्शन घेत नि डोळ्यांची धणी पुरवून परत फिरत. कुणी जवळ गेले तर रवींद्रनाथ त्यांची विचारपूस करीत; कुठून आले, कुठे जाणार इ. यथोचित प्रश्न विचारीत. रवींद्रनाथांशी संभाषण केल्याच्या समाधानाने मुशाफीरही हरखून जाई. आणि त्याच्या चेहऱ्यावरील निरागस संतोषाची रवींद्रांनी नेहमी कदर केली. अगदी डॉक्टरी सल्ल्यानुसार पडून असले तरी आपण दुरून येणाऱ्या या दर्शनेच्छूंची निराशा करतो, म्हणून कळवळत. निकटवर्तीयांनी कुणाला अटकाव केला नि विन्मुख पाठवले, तर ते संतापत. संभावित पोशाखाचा पासपोर्ट नाही म्हणून केवळ कुणा गरिबाची डाळ शिजली नाही, असे त्यांच्या ध्यानात आले तर ते चिटणिसावर डाफरत असत. कित्येकदा त्यांनी परिवारातील मंडळींची यावरून कानउघाडणी केली होती. ते म्हणत, "अरे, कुठून कुठून केवढ्या आस्थेने हे लोक येतात. काय हवं असतं त्यांना ? फक्त ओझरतं दर्शनच ना ? मग त्यांच्यावर अरेरावी गाजवता नि बूटपाटलोणी घालणाऱ्या रिकामटेकड्या शिष्टांना डोक्यावर घेऊन येता. हीच तुमची बहादुरी ? मला समजता तरी कोण ? नबाब की बादशहा ?"

### राग-लोभ-आनंद-अभिमान

क्रोधवश होऊन कुणाला टाकून बोलल्याचे असे प्रसंग त्यांच्या जीवनात विरळ होते. संयम हा जीवनाचा स्थायीभाव होता. राग आला तर लाल होत, भुवया आकसत, कपाळावर दोन उभ्या आठ्या पडत. रागावले तरी अपशब्द ओठांतून निसटत नसे. अशा वेळी बोलणे अधिक मोजके होई. शून्यात दृष्टी रोखून ते मनातील नापसंती दोन शब्दांत व्यक्त करीत. ते शब्दही साहित्यिकाचे असत. परिमार्जनी पण सदभिरुचीला धरून. नोकरांवर रागावले तरी भाषा अशी असे की टिपून घ्यावी ! नेहमीच्या स्वराहून एक पट्टीही वरची नसे ! वनमाळी नावाचा त्यांचा एक ओडिया नोकर होता. त्याच्याकडून एकदा काही आगळीक झाली. हे बोलून बोलून त्याला बोलले काय, तर "बाबा वनमाळी, तुझं हे वर्तन वृत्तपत्रकारांच्या कानी गेलं तर समस्त देशभर तुझा निषेध होईल, स्तंभावर स्तंभ लिहिले जातील. कदाचित एखादा निंदाव्यंजक ठरावही पसार होईल ! तेव्हा सावध हो." ३० वर्षे त्यांच्या सहवासात राहिलेल्या एका प्राध्यापकांनी निर्वाळा दिला आहे की, फक्त दोन वेळा रवींद्रनाथ कोपाविष्ट झालेले त्यांनी पाहिले. एकदा जेवणाची दगडी अस्वच्छ होती म्हणून नि एकदा एक प्राध्यापक घराच्या अंगणात बाजेवर पडून विद्यार्थ्यांकडून स्वतःचे अंग रगडून घेताना पाहिला तेव्हा !

काही वेळा सार्वजनिक जीवनातही संतापाचे, उद्वेगाचे क्षण आले. 'घरे बाइरे'

या कादंबरीतील सीताविषयक एका वाक्याने उगाच वायफळ वादळ उठले. रवींद्र-नाथांना मनस्ताप झाला. ते म्हणाले, "बंगालमध्ये बाकी सगळे विचारवंत नि मीच एकटा तेवढा व्रात्य असेन, तर पुढचा जन्म मला अशा ठिकाणी मिळो की, जिथे आचार शास्त्रसंमत नसला, तरी विचार धर्मसंमत असेल." 'जनगणमन अधिनायक' या दिव्य-स्तोत्राची त्यांच्या हितशत्रूंनी 'पंचमजॉर्जची भूपाळी' म्हणून हेळणा केली, तेव्हाही त्यांचा संताप झाला. तसा द्वेष, मत्सर, हीनमनस्कता इत्यादी क्षुद्रभावनांचा उपसर्ग जन्मभर त्यांना झाला. मन कमालीचे संवेदनाक्षम होते. त्यामुळे निंदानालस्ती-विषयी ते संपूर्ण निर्विकार राहू शकत नसत. पण समर्थ, सत्त्वधीर व्यक्तीचा संताप हा तशाच संयत रीतीने व्यक्त होत असतो, याचा प्रत्यय त्यांच्या जीवनात येतो. १९१३ साली 'नोबेल प्राईज' मिळाल्याची तार कलकत्त्यास येताच ५०० बडी बडी मंडळी खास आगगाडी करून शांतिनिकेतनला त्यांचे अभिनंदन करण्यासाठी आली. या जथ्यात त्यांच्या कालपर्यंतच्या निंदकांचे चेहरेही होते. परदेशी पारितोषिकाच्या झग-मगाटाने दिपून जाऊन उगवत्या रवीचा 'उदो उदो' करू पाहणाऱ्या या धेंडांची लायकी ते ओळखून होते. मनातील राग काबूत ठेवून रवींद्रनाथांनी या अभिनंदनास पुढील उत्तर दिले, "सन्मानाचे सुरापात्र आज आपण माझ्यापुढे धरले आहे; ते मी हाती घेतो; पण त्यातील मदिरा-पान करणे मला अशक्य आहे."

### "कविराज" रवींद्र

"नीम हकीम खतरे जान" (वैद्य अर्धवट नि प्राणांवर संकट) अशी म्हण असली, तरी रवींद्रनाथांसारख्या तरल बुद्धीच्या व्यक्तीने सतत अध्ययन करून कमाविलेली विद्या त्यांना कामचलाऊ वैद्यकी चालविण्यापुरती कामास येई. आसपासचे गोरगरीब गावकरी नि आदिवासी जनतेच्या गरजा भागविण्यासाठी ते पुस्तके धुंडाळून प्राथमिक उपचार करू लागले. विशेषतः होमिओपाथी, बायोकेमिक, आयुर्वेद व निसर्गो-पचार या सुलभ चिकित्सापद्धतींचा त्यांनी अभ्यास केला. ते म्हणत की, आमच्या या दुर्दैवी देशात यमाशी युद्ध करताना अर्ध्याकच्च्या डॉक्टरने देखील जमेल तशी काठी चालवायला हवी! सुरुवातीस हैमवती (होमिओपाथीचे बंगालमध्ये एके काळी असे संस्कृतीकरण झाले होते!) चिकित्सेचा त्यांनी भरपूर अभ्यास केला. त्यासाठी मोठा ग्रंथ-संग्रह केला. औषधांचे भांडार भरले. प्रसंगी काही औषधे परदेशातूनही आणली. चांगल्या निष्णात डॉक्टरांजवळ ते सतत चर्चा करीत. ते म्हणत, "उत्तम डॉक्टरला अभ्यास नि अनुभव यांच्या जोडीस अंतःप्रेरणा (instinct) आवश्यक असते व ती मजजवळ आहे असं वाटतं." कुणी परिचित आजारी आहे, असे समजण्याचा अवकाश, त्यांची लक्षणचिकित्सा सुरू होई. मटीरिया मेडिका, टिश्यू मेडिसिन इ. लठ्ठ ग्रंथांची चाचपणी होई. रोगविज्ञान, औषधविज्ञान नि पथ्याहारविषयक त्यांचा ग्रंथसंग्रह एखाद्या डॉक्टरांनी

हेवा करावा, एवढा खासा होता. कुणी आपण होऊन त्यांच्याजवळ औषध मागितलं तर ते खूप होत. आनंदून म्हणत, " मी केवळ कवी नाही हं. कविराजसुद्धा आहे ! " ( बंगालीत 'कविराज' म्हणजे वैद्य. ) कलकत्ता विद्यापीठाने त्यांना 'डॉक्टरेट'ची सन्माननीय उपाधी दिली तेव्हाही ते मिस्किलपणे म्हणाले, " एवढे दिवस वैदू होतो. आता डॉक्टर झालो. " त्यांच्या या छंदाविषयी प्रमथनाथ विशी गंमतीने लिहितात, " अन्यत्र रोगी डॉक्टरच्या शोधात हिंडतात. इथे आमचा डॉक्टरच रोग्यांच्या शोधात असे ! "

होमिओपाथीच्या सविस्तर अध्ययनास वेळ सापडेना, तेव्हा त्यांनी सोप्या अशा बायोकेमिक पद्धतीचा अभ्यास केला. हातगुण म्हणतात तो त्यांच्यापाशी असावा. कारण संताळ आणि खेड्यापाड्यातले गावकरी लोक सतत त्यांच्याकडे येत. पंचतिक्त कषाय नावाचा कडू काढा ते रामबाण औषध मानीत. स्वतः पीतच, पण आश्रमातील सर्वांना तो पिण्याची सक्ती असे. इन्फ्ल्यूएन्झाच्या भयानक साथीत आश्रमातील एकाही विद्यार्थ्यास लागण झाली नाही आणि त्याचे श्रेय या पंचतिक्त काढ्यास आहे, असे त्यांनी अभिमानाने जगदीशचंद्र बसूंना लिहिलेल्या पत्रात कळवले होते. बायोकेमिक औषधांची पेटी त्यांची जन्मसहचरी होती. पेशंट असो नसो, ते स्वतःही त्या पांढऱ्या गोळ्या सुपारीच्या खांडाप्रमाणे अधूनमधून तोंडात टाकताना आढळत. स्वतःच्या प्रकृतीची चिकित्सा त्यांच्याइतकी क्वचितच कुणी केली असेल !

### जमीनदार रवींद्रनाथ

आजोबा प्रिन्स द्वारकानाथ यांच्यासारखी अव्वल दर्जाची व्यावसायिक प्रतिभा टागोर घराण्यात सोडाच उभ्या बंगल्यात दुर्मिळ होती. त्यांचे जमीनदारीचे उत्पन्न वार्षिक १२ लाख रुपये होते ! पण ते तितकेच बेहिशेबी खर्चिकही होते. त्यामुळे ते गेले तेव्हा १ कोटी रुपयांचा बोजा ठेवून गेले. ७० लाखांची थकबाकी होती पण वसूल झाली तर ! देणी तीस लाखांची होती. म्हणजे महर्षी देवेंद्रनाथांवर ही मोठी जोखीमच पडली. द्वारकानाथांनी यूरोपात राम म्हटला तेव्हा महर्षी तरुण होते. पण धीराने कंबर कसून ते उभे राहिले. येण्यावर पाणी सोडून कर्जफेड करण्यासाठीच फक्त नव्हे तर द्वारकानाथांनी सोडलेले दानधर्मांचे संकल्पसुद्धा यथासांग पुरे करण्यासाठी ! घरातील बहुमोल जिन्नस विकले, इस्टेट कमी केली, घरात अत्यंत साधी नि काटकसरीची राहणी स्वीकारली. " पितामहांची ऐश्वर्यदीपावली असंख्य दीपांनी उजळली होती; पण आमच्या वेळी उरली होती ती फक्त विझलेल्या दिवल्यांतील काजळी नि एक मिणमिणती पणती " असे रवींद्रनाथांनीच वडिलांविषयी लिहिताना वर्णन केले आहे.

उरल्यासुरल्या जमीनदारीचा भार देवेंद्रांनी रवींद्रांच्या ३० व्या वर्षी त्यांच्यावर सोपविला. वडिलांच्या तालमीत रविबाबू तयार झाले होते. ईश्वरदत्त प्रतिभे-

चा अंशही त्यांनी या कामी लावला. याच संपर्कातून ग्रामीण बंगालची सुखदुःखे त्यांना नीट न्याहाळता आली. विधात्याची लेकरे तहानभुकेने टाहो फोडताना पाहून कोवळ्या काळजाच्या या तरुण जमीनदाराचे मन कळवळले. अतिवृष्टी नि अनावृष्टी यांच्या बेगुमान कात्रीत सापडलेल्या शेतकऱ्यांची दैना त्यांनी डोळ्यांनी पाहिली. त्याचे प्रतिध्वनी त्यांच्या साहित्यात नि पत्रव्यवहारात सर्वत्र ऐकू येतात. "हे जगते, हाय सेइ वेशि चाय आछे जार भूरि भूरि। राजार हस्त करे समस्त कांगालेर धन चूरि।" (हाय हाय! या जगात ज्यांच्यापाशी भरपूर आहे त्यांना अधिकाची हाव सुटते. राजाचे कर कंगालाजवळच्या कवड्यांसाठी देखील हपापतात.) किंवा "जार भये तुमि भीत से अन्याय भीरु तोमार चेये। जखनि जागिबे तुमि तखनि से पालाइबे धेये। (अरे भूमि-पुत्रा, ज्या अन्यायाला तू एवढा भितोस तो तुझ्याहूनही भित्रा आहे. तू जागा होशील तर तो केव्हाच पळून जाईल) हे शब्द वानगीदाखल पुरे. जन्मजात पेशा जमीनदारी असला, तरी स्वभावजात पेशा अस्मानदारी आहे, असे ते म्हणत आणि तरीही केवळ कवितावद्ध सहानुभूतीचा उद्रेक महत्त्वाचा नव्हता. त्यांची विधायक कामगिरी त्याहून मोठी होती. रयतेच्या दवापाण्यासाठी त्यांनी दवाखाने उघडले, शेकडो प्राथमिक शाळा सुरू केल्या, पिण्याच्या पाण्याची सोय केली, रस्ते बांधले, जंगलसफाई करवली, कर्ज-मुक्तीची व्यवस्था केली. कोर्टकचेऱ्यांत कवड्यारेवड्या करण्याऐवजी लवादामार्फत तड-जोड करण्याची प्रथा पाडली. नोकरचाकरांना दुर्गापूजेच्या वेळी एक महिन्याचा पगार बोनस देण्याची पद्धत चालू केली. खास कामाबद्दल बक्षिसे दिली. दीर्घ सेवेबद्दल म्हातारदाम (पेन्शन) देण्याची सोय केली. त्यांच्या या कर्तबगारीचा गौरवपूर्ण वृत्तांत गोऱ्या अंमलदारांनी राजशाही डिस्ट्रिक्ट गॅझेटियरमध्ये समाविष्ट केलेला आहे. अन्यत्र अनुकरणीय म्हणून! प्रजेबाबत ते जसे कनवाळू होते, तसेच नोकरचाकरांबाबत कडक शिस्तीचे होते. चढेल किंवा गलथान नोकराची ते अजिबात गय करीत नसत. एका मुनीमजीने म्हटले होते, "कलकत्त्यात तुम्हाला फक्त प्रभातरवीचा परिचय आहे; आम्हाला माध्यान्हीचा मार्तंड अनुभवास येतो आहे." 'जमीनदार म्हणजे प्रजेच्या रक्तावर पोसणारा गोचीड' असे चिडीचे उद्गार त्यांच्या काही पत्रात आढळतात. जमीन जमीनदारांची नसून मातीत खपणाऱ्यांची आहे; तो केवळ विश्वस्त असावा ही त्यांची धारणा त्यांच्या लेखनात व्यक्त झाली आहे. प्रजाहितदक्ष रवींद्रांनी आपल्या दिवाणांना लिहिलेली पत्रे शिवरायांनी रयतेचा कैवार घेऊन मावळातील देशमुखांना लिहिलेल्या पत्रांची आठवण करून देतात. थोरांचे थोरपण, सर्व स्थळी, सर्व काळी एकसारखेच बावनकशी असते, यात शंका नाही.

### व्यापारी-कर्जबाजारी

त्यांनी जमीनदारीत जशी कर्तबगारी दाखवली, तशी व्यापार-व्यवसायात ते



अनुक्रमणिका

दाखवू शकले नाहीत. आजोबा लक्ष्मीचे लाल असले, तरी लक्ष्मीची चंचलताच पुढील पिढ्यांना दिसली. देवेंद्रनाथांनी विरक्त, उपभोगशून्य वृत्तीने जमीनदारी सांभाळली. पण व्यापारात पडलेल्या टागोर कुटुंबियांना पुन्हा पूर्ववैभव लाभले नाही. ज्योतिरिंद्र-नाथांनी जहाजव्यवसायात जबर ठोकर खाल्ली. रवींद्रनाथांनी आपल्या जमिनीत अमेरिकन मका नि मद्रासी तांदूळ यांची उपज करण्याचे प्रयोग केले, ते निष्फळ ठरले. आपला पुतण्या सुरेंद्रनाथ याच्या जोडीने त्यांनी तागाचा व्यापार करून पाहिला; स्वदेशी भांडार, इंडियन स्टोअर्स इत्यादी उदीमही भागीदारीने केले. पण पितामही भाग्यदेवता रुसली ती रुसलीच. एकापरीने तेही बऱ्यासाठीच झाले! श्री प्रसन्न होती, तर कदाचित सरस्वती रुसती!

सांगितले तर अनेकांना आश्चर्य वाटेल, पण आयुष्यातील मोठा काळ रवींद्रनाथ कर्जबाम नि उधारउसनवार यांच्या कटकटींनी कष्टी होते. "कवि प्रभाकर भ्रमर गुंतला कर्जाच्या कमळी" असे त्यांनाही यथार्थपणे म्हणता आले असते. १८८४ च्या सुमारास लिहिलेल्या त्यांच्या पत्रव्यवहारात ओढगस्तीचा पहिला आभास आढळतो. लग्न नुकतेच झाले होते. निश्चित उत्पन्न असे नव्हते. खर्चाच्या वाटा मात्र अनेक. मित्रमंडळींची सरबराई करणे, पुस्तके विकत घेणे, प्रवास करणे नि स्वखर्चाने कवितासंग्रह छापणे असे अवांतर खर्च फार असत. त्यातच व्यापार अंगाशी आल्याने सोसाव्या लागणाऱ्या नुकसानीची भर. पुस्तकांचा सोस मोठा होता. थॅकर स्पिंक कंपनीत त्यांची फेरी कधी चुकली नाही. मित्रमंडळींसाठी ते उदारपणे खर्च करत. नाशिक, सोलापूर, कारवार इकडील पत्रांतूनही त्यांच्या आर्थिक ओढाताणीची छाया आढळते. जमीनदारीतून होणारा मासिक आदा तुटपुंजा होता. लेखनाचा मुशाहिरा नगण्य होता. तरुण लेखकांना म्हणूनच त्यांचे सांगणे असे की "साहित्यके पेशा करो ना, नेशा करो!" (म्हणजे लेखन चरितार्थासाठी करू नका, पुरुषार्थासाठी करा!) 'हौसेचा मामला नि पैशाविना घोटाळा' अशी गत होती. पुढील आयुष्यातही खर्च वाढत गेले. जोडा सांको येथे स्वतःचे वेगळे घर बांधावे लागले. ज्येष्ठ कन्येचा विवाह इतमामाने करावा लागला. घर बांधण्यासाठी बॅ. पालित यांचे मोठे कर्ज काढले होते. छोटी छोटी कर्जे फेडण्यासाठी एकरकमी कर्ज एकाच मोठ्या धनकोकडून घ्यावे असाही प्रयत्न दिसतो. त्यांचे अंतरंगमित्र प्रियनाथ सेन यांना लिहिलेल्या पत्रातील करुण सूर आजही वाचकास व्यथित करतील. ब्रह्मेंद्रस्वामींना थोरल्या बाजीरावांनी कर्जासाठी लिहिलेल्या पत्रात जसा त्यांचा वैताग ओसंडून व्यक्त होताना दिसतो, तसाच रवींद्रांचा उद्वेग प्रियनाथबाबूंना लिहिलेल्या पत्रसंभारात जाणवतो. कर्जापोटी ते १२ टक्के व्याज त्या काळातही द्यायला राजी असत. फार काय, स्वतःच्या ग्रंथांचे कॉपीराइटही विकायला काढीत. घर गहाण ठेवण्याची तयारी होती. मित्रांप्रमाणेच संस्थानिक, मारवाडी, सावकार यांच्याकडेही कर्जासाठी खटपट करताना ते आढळतात. एकदा एका पत्रात

त्यांनी लिहिले आहे, " स्वतःचे ग्रंथ नि स्वतःचे शरीर याखेरीज सांप्रत कोणतीही विक्रेय अशी वस्तू माझ्यापाशी नाही.–ग्रंथ विकत घेणारा सावकार दुर्मिळच आणि स्वतःला विकायला काढलं तरी गिऱ्हाईक मिळेल की नाही कोण जाणे! एखाद्या छापखानेवाल्या सावकाराने जर माझी ग्रंथावली खरेदी केली, तर त्याला पस्तावण्याची पाळी येणार नाही, अशी खात्री वाटते." राजा हरिश्चंद्राच्या देशामधला हा कविराज शोभतो खरा!

### लहरी स्वभाव

या फुलावरून त्या फुलावर बागडणाऱ्या मधुकरासारखी त्यांची लहर सतत नर्तन करीत राही. एका जागेत त्यांना फार दिवस चैन पडत नसे. कोणार्क, मृण्मयी, श्यामली, उदीची, पुनश्च इ. त्यांची कुटिरे त्यामुळेच बनत गेली. ब्राह्म मुहूर्तापासून तो गोरज मुहूर्तापर्यंत छायाप्रकाशाचे नि रात्री चंद्रिका नि नक्षत्रांचे अनंत रंगढंग पाहता येतील अशी जागा त्यांना हवी असे. घरातल्या घरातही खोल्या बदलत. कधी स्वयंपाकघराचे शेजघर होई, तर कधी शेजघराचे अभ्यासघर. घरात उंची, अवजड जिन्नस नसतच. ( सर्व सामान, लाकडी, स्थानिक बनावटीचे असे. त्यात उपयोगिता नि सौंदर्य यांचा मिलाफ साधण्यावर कटाक्ष असे. ) त्यामुळे हलवाहलवी फारशी जड जात नसे. लिहायचे टेबल एकदा पंगू झाले. त्याचे पुढचे दोन पाय जायबंदी झाले. त्यांची प्रथम प्रतिक्रिया अशी, " वा छान! आयतंच काम झालं! हवं तेव्हा पुढे ओढून रेलून लिहिता येईल!" दोन दिवसांनी पुनः येरे माझ्या मागल्या. एकदा लहर लागली तर टेबल, खुर्ची, कॉट, बुकशेल्फ सारे पक्के सिमेंटचे करून घेतले. काही दिवसांतच त्या जखडबंदीचा कंटाळा आला! एकदा घोंगड्या वापरायचे ठरवले. आंथरायला घोंगडे, पांघरायला घोंगडे, उशास घोंगडीची घडी अशी लहर बागडली. मग टोचून टोचून अंग खाजायला लागलं, तशी मग होते तेच ठीक होते, हे ठरले. एकदा अवर्षण पडले. नऊही नक्षत्रे कोरडी गेली. उष्म्याने कहर केला. कॉलिम्पाँगला जायचे ठरले होते. सामानसुमान स्टेशनवर गेले. कवी बोलपूर स्टेशनवर पोचले. तिथे त्यांचे आकाशाकडे लक्ष गेले. दूर आभाळाची कडा त्यांना काळसर भासली. बेत बदलला. मेघमल्हाराच्या स्वागतासाठी सफर रद्द झाली! पण मेहुड्या वेलांटीची ही हूल भूल ठरली! पुनश्च एक दिवस मग कॉलिम्पाँगला प्रस्थान ठेवले. ते म्हणत, " अरे, मी द्वारकानाथ टाकुरांचा नातू आहे, विसरू नका." " The Babu changes his mind every minute." असा आहाणा त्या काळी रवींद्रांच्या आजोबांविषयी रूढ होता!

नौकेत राहून नदीवक्षावर संचार करणे, त्यांना फार आवडत असे. स्वतःला ते म्हणूनच 'गांगेय' म्हणवत. गंगा नि तिच्या शाखाप्रवाहांवर त्यांची बरीच वर्षे गेली.

'वजरा' नामक काश्मिरी शिकाऱ्यासारख्या मयूरपंखी नौकांत ते दिवसचे दिवस घालवीत. नौका वल्हविण्यात ते मागे नसत नि पोहण्यातही त्यांची दमछाक होत नसे. तरुणपणी पद्मा नदीचे विशाल पात्र ते आरपार पोहून गेले होते. नौकेवरून सूर मारून पोहणे, नावाड्यांशी शर्यती लावणे हाही त्यांचा विरंगुळा असे. नौकेत लेखनही चालायचे. घरी-दारी कुठेही असोत, त्यांची लेखनसमाधी चटकन लागे. पेलिकन फाउंटनपेन नि काजळ इंक ते वापरत. लिहिताना केलेली खाडाखोड कलात्मक रीतीने नटवण्याचा त्यांचा छंद सर्वश्रुतच आहे. चित्रांकनही बरेचसे पेनने करीत. पत्रव्यवहार सगळा स्वतः पाहात नि उत्तरे स्वहस्ते लिहीत.

मुक्या प्राण्यांवर ते माया करीत. त्यांनी एक मुंगूस पाळले होते. एक मोर होता. लालू नावाचा कुत्रा बरीच वर्षे त्यांनी बाळगला होता. तो फक्त लोणी लावलेला पाव खाई! ते वनमाळीला म्हणत, " पाह्यलीस ह्याची डिग्निटी! असा प्रतिष्ठित कुत्रा क्वचित आढळेल!"

ज्योतिष, प्लँचेट, हस्तसामुद्रिक. इ. गूढ विद्यांबद्दल त्यांना कुतूहल वाटे. प्राथमिक पंचांगज्ञान त्यांना होते व त्या आधारे ते चांगल्या तज्ज्ञांशी चर्चा करू शकत. स्वतःच्या व मुलाबाळांच्या कुंडल्या त्यांनी करून घेतल्या होत्या. ते म्हणत देवाचे विंदान जाणण्याचे कुतूहल माणसाला असणे गैर नाही. पण त्याच्या आहारी न जाता परीक्षण-निरीक्षण चालू ठेवावे.

### हास्य विनोद

आमरण जागृत अशी रसरंजनी, विनोदप्रिय मनोवृत्ती त्यांना लाभली होती. त्यांचे एक सहकारी सुधाकांत रॉयचौधुरी हे टक्कलवान होते. (कवि त्यांना 'बाल्डविन' म्हणत.) त्यांना एकदा म्हणाले, " अरे सुधा, मेघमुक्त चंद्रम्यासारखं माथं शोभू लागलंय तुझं!" सुधाकांत म्हणाले, "माझ्या वडिलांनाही टक्कल होतं." कवी उत्तरले, " तरीच तू ते शिरोधार्य मानलंस!" सुधाबाबू हिंदी चांगले बोलत व मोठमोठ्या मारवाडी धनिकांकडून आश्रमासाठी देणग्या मिळविण्यात सिद्धहस्त असत. त्यामुळे कवी त्यांना विनोदाने 'सुधेंडिया' म्हणत. 'नावे' ठेवण्याचा छंद हाही रवींद्रनाथांचा एक विशेष होता. नवजात बालकांना नवनवीन नावे ते सुचवीतच, पण व्यक्तिवैशिष्ट्यानुसार टोपणनावे देण्यातही त्यांचा हातखंडा होता. त्यांचा वनमाळी हा नोकर पक्क्या वाणाचा. त्याला ते नीलमणी म्हणत. जडजंबाळ भाषेत बोलून ते त्याला गांगरवून टाकीत. 'रे भृत्य, तुझ्या या अतुल्य अशा अकर्मण्यतेमुळे अस्मादिक पुलकित झाले असावेत अशी का तुझी कल्पना आहे?' अशासारखा ते प्रश्न विचारीत. त्यांचा दुसरा नोकर महादेव. नावाप्रमाणेच भोळा होता. एकदा ते आरामखुर्चीतच झोपी गेले. रात्री खिडकीवाटे पौर्णिमेचा चंद्रप्रकाश डोळ्यावर आला. खोलीतच निजलेल्या महादेवाला

ते म्हणाले, " महादेवा, तेवढा चांदोवा झाकून टाक बावा." महादेव मुखस्तंभासारखा उभा राहिला, मग कवींनी खुलासा केला, " अरे, खिडकी बंद कर." एकदा एक उपटसुंभ कवी येऊन खनपटीस बसले. हेका एकच. आपले काव्यगायन ऐका. पिच्छाच सोडीनात. रवींद्रनाथ नाइलाजाने राजी झाले. ते गेल्यावर म्हणाले, " गान म्हणजे अगदी मेशीनगान ( मशीनगन ) हो !" अमुक एक गृहस्थ तुमच्या मासिकाचे सहसंपादक होते ना असा सवाल कुणीतरी करताच कवींनी जवाब दिला, " सह की दुःसह कोण जाणे, होते खरे ! " दक्षिण भारताच्या दौऱ्यावर असताना कुन्नूर स्टेशनवर त्यांच्या दर्शनासाठी विराट जनसमुदाय जमला होता. कवी अतिशय थकलेले होते. त्यांनी दर्शन दिले, पण सन्मानसमारंभाच्या सोपस्कारासाठी दीनबंधू अँड्र्यूजना पाठवले. काही वेळाने हारांची रास घेऊन दीनबंधू परतले नि म्हणाले, " गुरुदेव, पाहा तरी तुमच्यामुळे आज केवढ्या माळा माझ्या गळ्यात पडल्या ! "

" कुणा कुमारीने तर माळ घातली नाही ना." चिरकुमार अँड्र्यूजना कवींनी हसत हसत विचारले.

### वीतशोक रवींद्रनाथ

' पुष्कळ वर्षे जगण्यात विशेष ते काय ? काळ कंठण्याची शिक्षाच भोगावयाची की नाही ? ' असे एकदा ते उद्गारले होते. ८० वर्षांच्या आयुष्यात अनेकांचे मरण त्यांनी डोळा पाहिले. ज्येष्ठांचे पाहिले, तसेच ज्येष्ठांच्या आधी जाणाऱ्या कनिष्ठांचेही पाहिले. पुत्र, कन्या, जावई, पुतणे, नातवंडे, अशा अनेकांच्या मृत्यूंच्या झळा नि कळा त्यांनी सोसल्या. वयाच्या १४ व्या वर्षी मातृशोक ओढवला. पण या प्रथम शोकानुभवाची कृष्णच्छाया कायमची न ठरता हलक्या पावलांनी नाहीशी झाली. दुसरा आघात मात्र दारुण होता. कादंबरीबर्दिनींनी आत्महत्या केली, त्या वेळी ते २२ वर्षांचे होते. त्यांनीच जीवनस्मृतीत म्हटल्याप्रमाणे या खेपेस मृत्यूशी स्थायी परिचय घडला. वयाच्या ४१ व्या वर्षी पत्नीचा मृत्यू झाला. ' स्मरण ' या कवितासंग्रहात त्या वेळचा त्यांचा मूक शोक श्लोकरूपाने प्रकट झाला. त्यांचा धाकटा आणि तल्लख बुद्धीचा पुत्र शमींद्र मोंघीर येथे सुटीत गेला असता कॉलऱ्याच्या साथीस बळी पडला. तो घाव त्यांच्या जिव्हारी खोल बसला. 'वरकरणी धीरगंभीर पण नेत्री नीर वाहे घळघळा' अशी त्यांची करुण स्थिती त्या वेळी झालेली होती. पण हा पुत्रशोक काळजाच्या अंतस्थ कप्प्यात कुठे तरी बंदिस्त होता, याच्या खुणा २५ वर्षांनंतरच्या पत्रातही आढळतात. प्रियजनांच्या चिरविरहाचे धक्केचपेटे त्यांनी शांत समाहित मनानेच सोसले. त्यामुळे हबकून जाऊन शोकशाळेत किंवा वनवासवाडीत जाऊन राहण्याचा आक्रस्ताळेपणा त्यांनी कधी दाखवला नाही. त्यांच्या मीरा या मुलीचा एकुलता एक पुत्र नीतींद्र हुशार होता. रवींद्रांनी त्याला मुद्रणविद्येच्या उच्च अभ्यासासाठी जर्मनीस पाठवला

होता. तिथेच त्याला अचानक मृत्यू आला. त्या वेळी व नंतर वर्षभराने त्याचे सामान-सुमान मायारी आले, तेव्हाही त्यांनी मरणविषयक विचार मांडले आहेत.

" कितीक दिवस मनात येत आहे की, या कर्मसंकुल जीवनाच्या एका कोपऱ्यात जराशी जागा करून तिथे मृत्यूचा दरबार, मरणाचं कोडं यावर शांत मनानं विचार करावा. केवढा क्षोभ, केवढा क्रोध, केवढा अन्याय केवळ जीवनाचा मरणसापेक्ष विचार न केल्याने जगात घडत असतो–छंद इथे भंग पावतो, कविता मुकी बनते."

त्यांचा परमसखा अँड्रयूज नि पुत्रप्राय पुतण्या सुरेंद्रनाथ हे एकाच वर्षी मरण पावले. वृद्ध कवींनी मृत्यूच्या अबोध राज्यात त्यांना भेटण्याची तयारी चालविली. स्थितप्रज्ञ चित्त–वृत्तीने ते सांत्वनास येणाऱ्या मंडळींना नेहमीच जीवनमरणाचे चक्र उलगडून दाखवत असत. वीतशोक रवींद्रनाथ हे त्यांचे रूपही अनेकांनी पाहिले आहे.

## शेषेर कविता

अशा या महापुरुषाला किडनीच्या विकाराने अखेरीस घेरले. ३० जुलै १९४१ रोजी ऑपरेशन ठरले होते. रुग्णशय्येवरूनच त्यांनी राणी चंदाना 'शेषेर कविता' लिहून घ्यायला सांगितली. शांतीच्या अक्षय अधिकाराची प्रार्थना करणारी, 'दिसो लागे मृत्यू परि न भिववू तो मज शके' हेच वेगळ्या शब्दांत सांगणारी ती कविता खरोखरच अखेरची ठरली. ७ ऑगस्ट रोजी त्यांना परमसख्याने–मृत्यूने गाठले. जन्मग्रामीच मृत्यू येणे ही आपल्या जुन्या संस्कृतीत भाग्याची गोष्ट मानीत. पण रवींद्रनाथांना कलकत्त्याच्या उन्मत्त कोलाहलापासून दूर शांतिनिकेतनच्या उदार धरित्रीच्या कुशीत विसावा घ्यायचा होता. अनेकांजवळ व्यक्त केलेली त्यांची ही इच्छा अपुरी राहिली. निदान दहनक्रियेसाठी देह शांतिनिकेतनला नेऊन पुढे त्या जागी सुरेखसे समाधिमंदिर बांधण्यात आले असते तर त्यांच्या इच्छेचा मान राखल्यासारखे झाले असते. पण अखेरची इच्छा अपुरी राहण्यातही या महामानवाचे माणूसपण जाणवते असे आपण म्हणायचे !

# " भाष्यकारांतें ( वाट ) पूसतु "



वि. मो. केळकर

म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनी ' अद्वैतामोद ' नावाचा ग्रंथ लिहून त्यामध्ये तेहतीस सिद्धान्तांत सर्व शांकर तत्त्वज्ञान साररूपाने कसे अंतर्भूत होते हे दाखविले आहे. श्री. केळकर यांनी अभ्यंकरांच्या ग्रंथातील प्रत्येक सिद्धान्त घेऊन त्याच्याशी साम्य असलेल्या ज्ञानदेवीतील ओव्या दाखविणारा ग्रंथ सिद्ध केला आहे. त्या ग्रंथाची ही प्रस्तावना चर्चेसाठी छापण्यात येत आहे.

—संपादक

तैसा व्यासाचा मागोवा घेंनु । भाष्यकारांतें ( वाट ) पूसतु
अयोग्य ही मी न पवतु । कें जाइन १८·१७०१ ( रा. ज्ञा. )

उद्धृत केलेल्या ओवीत निर्देशिलेले ' भाष्यकार ' म्हणजे कोण हा आजकाल मोठा विवाद्य प्रश्न होऊन बसला आहे, आणि त्याचा सर्वांना मान्य होईल असा निर्णय लागेल असे आता वाटत नाही. आम्ही ह्या प्रश्नाविषयीचे आमचे विचार ज्ञानदेवीच्या अभ्यासकांपुढे मांडीत आहोत.

शके १२१२ मध्ये ज्ञानदेवी प्रकट झाली. तेव्हापासून आजतागायत ज्ञानदेवीचे अध्ययन–अध्यापन, पठण–पाठण, चिंतन–मनन करणारे अगणित, साधक–सिद्ध, संत–महंत साक्षात्कारी पुरुष होऊन गेले. त्यांच्या मनात ' भाष्यकार ' म्हणजे कोण ही शंकाही कधी उद्भूत झालेली वाचनात किंवा ऐकिवात नाही. ते जणू काय अंधश्रद्ध, अविद्वान व अचिकित्सक होते ! आणि म्हणून ' भाष्यकार ' म्हणजे ' श्रीशंकराचार्य '

असे ते एकमुखाने मानीत होते! आजच्या युगातील प्रकाण्ड पंडित लोकमान्य टिळक हेही 'भाष्यकार' म्हणजे शंकराचार्यच होत असे मानीत होते ही गोष्ट अत्यंत लक्षणीय आहे. (पाहा : गीतारहस्य : पृष्ठ १८). पण त्यानंतर काही वर्षांमागे काही विद्वान पंडितांनी 'भाष्यकार' म्हणजे कोण हा प्रश्न किंवा ही शंका निर्माण केली आणि तिचा अद्यापि सर्वमान्य होईल असा निर्णय झालेला नाही.

ज्ञानदेवांनी 'भाष्यकार' असा मोघम शब्दप्रयोग केल्यामुळे 'भाष्यकार' म्हणजे कोण, ही शंका उत्पन्न होण्याला जागा झाली आहे, ही गोष्ट खरीच आहे. परंतु एका ग्रंथकारांनी तरी त्या मोघम शब्दप्रयोगावर स्वच्छ प्रकाश टाकून ते भाष्यकार म्हणजे कोण याचा नामनिर्देशपूर्वक खुलासा केला आहे; आणि ते ग्रंथकारही प्राचीन चौदाव्या शतकातील असून महानुभाव पंथातील आहेत. महाराष्ट्रसारस्वतकार म्हणतात, "चाल्हण पंडिताच्या नावावर त्याच्या नृसिंहशिष्याने रचिलेली एक श्रीमद्भगवद्गीता टीका आहे. हिला 'संकेतगीता' असे म्हणतात. या टीकेत लेखकाने आपल्या पूर्वीच्या गीताटीकांचा उल्लेख केला आहे. प्रायः महानुभाव टीकाकार आपल्या पंथातील टीकांशिवाय इतर मराठी टीकांचा उल्लेख करीत नाहीत. पण यात याने आपल्या पंथातील व पंथाबाहेरील अनेक टीकांचा उल्लेख केला आहे. इतक्या इतर गीताटीका असता ही नवी टीका का लिहिली, हे सांगण्याच्या मिषाने कवी म्हणतो :—

भूषण कवी भास्करासारिखे । निवृत्ति सोपान ज्ञानदेवो निके ।
तयांची सरी केंवी ठाके । दैवहत ॥
शंकरभाष्य **शंकरानुसारु । ज्ञानदेवो बोलिला अतिप्रसारु ।**
तया अद्वैती भारु । भणौनि लाठा अर्थु ॥

(पाहा : महाराष्ट्रसारस्वत: पृष्ठे : २३७–२३८).

येथे 'भाष्यकार' म्हणजे शंकराचार्यच असा स्वच्छ उल्लेख होत नाही काय? कै. ल. रा. पांगारकर यांनीही आपल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड दुसरा : एकनाथतुकारामाचा काळ' यामध्ये वरील गोष्टीचा निर्देश केला आहे. (पाहा : पृष्ठ : ७४५).

ज्ञानदेवीच्या काही प्रतींत 'भाष्यकार' या शब्दावर अनुस्वार आहे व काही प्रतींत तो नाही. अनुस्वाररहित पाठ स्वीकारला म्हणजे ते एकवचन होईल व मग कोणीतरी एकच भाष्यकार मानावा लागेल. अनुस्वारसहित पाठ स्वीकारला म्हणजे ते अनेकवचनी पद होईल आणि मग त्या पक्षी अनेक भाष्यकार मानणे भाग पडेल. येथे असाही एक विकल्प उत्पन्न होऊ शकेल की, 'भाष्यकार' या शब्दावरील अनुस्वार अनेकवचनार्थी नसून बहुमानार्थी आहे. या पक्षीही मग ते पद एकवचनीच

ठरेल. आणखीही दुसरा एक विकल्प असा की, ज्ञानदेवींत कित्येक वेळा शब्दावरील अनुस्वार उपेक्षणीय म्हणून मानावे लागतात; व तसा तो मानला म्हणजे येथेही ते पद एकवचनीच ठरेल. सारांश त्या शब्दावर अजिबात अनुस्वार नसला किंवा अनुस्वार असून तो बहुमानार्थी किंवा उपेक्षणीय मानला म्हणजे या तिन्ही पक्षी ते पद एकवचनीच ठरेल आणि मग भाष्यकारही एकच ठरेल. याच्या उलट म्हणजे त्या शब्दावर अनुस्वार मानला आणि तो बहुमानार्थी किंवा उपेक्षणीय मानला नाही म्हणजे ते अनेकवचनी पद ठरेल व त्या दृष्टीने मग अनेक भाष्यकारांचा विचार करावा लागेल.

येथे एक गोष्ट उघड आहे की, ज्ञानदेवांनी ज्या भाष्यकाराला किंवा भाष्यकारांना वाट पुसली असेल ते भाष्यकार त्यांच्यापूर्वी होऊन गेलेले असले पाहिजेत. सर्व भाष्यकार–आचार्यांचे काळ व त्यांचे तत्त्वज्ञान पुढीलप्रमाणे आहे :–

१ श्रीशंकराचार्य ( खि. ७८८–८२० ) केवलाद्वैतवाद
२ श्रीरामानुजाचार्य ( खि. १०१७–११३७ ) विशिष्टाद्वैतवाद.
३ श्रीमध्वाचार्य ( खि. ११९७–१२७५ ) द्वैतवाद
४ श्रीवल्लभाचार्य ( खि. १४७९–१५३२ ) शुद्धाद्वैतवाद
५ श्रीनिंबार्काचार्य ( खिस्ती शकाचे ११ वे शतक ) द्वैताद्वैत ( भेदा-भेद ) वाद.
६ श्रीज्ञानदेव ( खि. १२७५–१२९६ ) केवळ अद्वैत.

वर उद्धृत केलेले ज्ञानदेव व श्रीशंकराचार्यादी भाष्यकार–आचार्यांचे काळ विचारात घेतले म्हणजे असे दृग्गोचर होते की, वल्लभाचार्य ज्ञानदेवानंतर झालेले आहेत आणि मध्वाचार्य जवळजवळ समकालीनच आहेत. जे ज्ञानदेवानंतर झाले किंवा जे ज्ञानदेवांना समकालीन होते, त्यांना ज्ञानदेवांनी वाट पुसण्याचा किंवा अनुसरण्याचा प्रश्नच संभवत नाही. शिवाय त्यांची तत्त्वज्ञानेही भिन्न आहेत. श्रीशंकराचार्य, रामानुजाचार्य आणि निंबार्क हे तिघे ज्ञानदेवांपूर्वी होऊन गेलेले आहेत. म्हणून त्यांना ज्ञानदेवांनी वाट पुसण्याचा किंवा अनुसरण्याचा प्रश्न संभवनीय आहे. पण मुख्य गोष्ट ही आहे की, शंकराचार्यांच्या व्यतिरिक्त इतर दोघांही आचार्यांची तत्त्वज्ञाने ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानापेक्षा भिन्न आहेत. रामानुजाचार्यांचे विशिष्टाद्वैतवादी तत्त्वज्ञान आहे तर निंबार्कांचे द्वैताद्वैतवादी तत्त्वज्ञान आहे. शिवाय निंबार्क हे आपल्याकडील भागात प्रसिद्ध नसल्यामुळे त्यांचा विचार करण्याचे प्रयोजन नाही. तेव्हा भिन्न तत्त्वज्ञान असलेल्या त्या आचार्यांना भाष्यकारांना ज्ञानदेव कसे अनुसरतील किंवा वाट पुसतील ? शंकराचार्यांची व ज्ञानदेवांची गुरुपरंपरा भिन्न आहे या वस्तुस्थितीमुळे भिन्न गुरुपरंपरा असलेल्या शंकराचार्यांना ज्ञानदेव कशी वाट पुसतील ? असे ज्याप्रमाणे प्रतिपक्षाकडून विचारले जाते, अगदी त्याचप्रमाणे येथेही असे विचारता येईल की, भिन्न तत्त्वज्ञान असलेल्या

आचार्यांना भाष्यकारांना ज्ञानदेव कसे अनुसरतील किंवा वाट पुसतील? समान तत्त्वज्ञान असलेल्या भाष्यकारांनाच ते वाट पुसणार आणि शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान आणि ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान समानच आहे. शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान केवलाद्वैती असून ज्ञानदेवही केवळ अद्वैतच मानतात. म्हणून ते त्यांनाच काही झाले तरी वाट पुसणार हे उघडच आहे. आणि ज्ञानदेव केवळ अद्वैत मानीत नाहीत असे म्हणणे म्हणजे लोकमान्य टिळकांनी उपनिषदांबद्दल जसे गीतारहस्यात म्हटले आहे तसेच म्हणावे लागेल. लोकमान्य गीतारहस्यात म्हणतात, "एकंदर उपनिषदांचा बराच भाग कापून काढिल्याखेरीज किंवा जाणूनबुजून त्याकडे दुर्लक्ष केल्याखेरीज उपनिषच्छास्त्रांचे अद्वैताशिवाय दुसरे काही रहस्य आहे असे दाखविता येणे शक्य नाही." (पाहा : गीतारहस्य : पृष्ठ २३३). लोकमान्यांच्या या उपनिषद्विषयक अभिप्रायाप्रमाणेच ज्ञानदेवीचा बराच मोठा भाग कापून काढिला किंवा जाणूनबुजून त्याच्याकडे दुर्लक्ष केले तरच ज्ञानदेव ज्ञानदेवीत केवळ अद्वैत मानीत नाहीत, असे म्हणता येईल; एरवी नाही. पण तसे होणे किंवा करणे केव्हाही शक्य नाही. म्हणून ज्ञानदेव केवळ अद्वैत मानतात हे मानणेच प्राप्त आहे.

तत्त्वज्ञानभिन्नत्वामुळे ज्ञानदेव शंकराचार्यांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाही आचार्यांना किंवा भाष्यकारांना वाट पुसणे किंवा अनुसरणे संभवनीय नाही, हे वरील विवेचनावरून सिद्ध होते. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या आपल्या सुप्रसिद्ध आणि विद्वन्मान्य ग्रंथात श्रीमद्भगवद्गीतेवरील शांकरभाष्य, रामानुजभाष्य आणि ज्ञानदेवी यांचे एका प्रकरणात विस्तृत आणि तुलनात्मक विवेचन केले आहे. त्याचा निष्कर्षही वरील विधानाला सर्वस्वी पुष्टिदायकच आहे. त्या तुलनेचा निष्कर्ष असा आहे— डॉ. शं. दा. पेंडसे म्हणतात, "एकंदर २१८ स्थळांची तुलना केली त्यांत असे दिसले की, १४६ ठिकाणी शंकर व ज्ञानेशांनी तत्त्वज्ञानाच्या व अर्थाच्या दृष्टीने सदृश अशी टीका केली आहे. त्यांपैकी ४२ ठिकाणी शंकरांचेच शब्द ज्ञानेशांनी योजिले आहेत, १० ठिकाणी शंकर आणि ज्ञानेश यांचे दृष्टांतही सारखे आहेत व ५७ ठिकाणी शंकरांचा अर्थ घेऊन रामानुजांचा टाकला आहे. ६८ ठिकाणी शंकरांचा किंवा रामानुजांचाही अर्थ न घेता ज्ञानेशांनी स्वतंत्र अर्थ केले आहेत. ३८ ठिकाणी तर निर्गुण किंवा मायावादपर अर्थ शंकरांपेक्षाही पुढे जाऊन किंवा त्यांच्याही पेक्षा स्पष्टपणे केले आहेत. एका ठिकाणी शंकर व रामानुज दोघांच्याही अर्थांचा समुच्चय केला आहे व फक्त ५ ठिकाणी शंकरांना सोडून रामानुजांचा अर्थ स्वीकारला आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने शंकरांना विरोधी असे एकही स्थळ नाही. शंकरांना सोडून रामानुजांना अनुसरल्याची स्थळे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महत्त्वाची नाहीत. रामानुजांप्रमाणे जेथे अर्थ केला आहे अशा सहा स्थळांपैकी पाच स्थळे अशी आहेत की तेथील अर्थ ज्ञानेशांना स्वतंत्रपणेही सुचणे संभवनीय आहे......या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे "भाष्यकारातें

(वाट) पूसतु" यातील "भाष्यकार" शब्दाने ज्ञानेशांना एकत्र भाष्यकार अभिप्रेत आहेत व ते म्हणजे शंकराचार्यच होत असे या तुलनेवरून दिसेल व या वाक्याच्या अर्थाविषयी शंका नाहीशी होऊन वाद थांबतील अशी आशा आहे." या निष्कर्षावरून तत्त्वज्ञानभिन्नत्वामुळे ज्ञानदेव शंकराचार्यों-व्यतिरिक्त दुसऱ्या कोणाही आचार्यांना किंवा भाष्यकारांना वाट पुसणे किंवा अनुसरणे संभवनीय नाही असे जे आम्ही प्रारंभी विधान केले आहे ते निर्विवादपणे सिद्ध होते.

'भाष्यकार' म्हणजे शंकराचार्य नव्हेत आणि ज्ञानदेव त्यांना अनुसरत नाहीत असे ज्यांचे मत आहे, त्यांचा असा एक आक्षेप आहे की, शंकराचार्य आणि ज्ञानदेव यांच्या गुरुपरंपरा भिन्न आहेत. तेव्हा आपली परंपरा सोडून ज्ञानदेव भिन्न परंपरा असलेल्या शंकराचार्यांना कसे वाट पुसतील किंवा अनुसरतील ? ही गोष्ट खरीच आहे की, शंकराचार्य व ज्ञानदेव यांच्या गुरुपरंपरा भिन्न आहेत. आणि ही गोष्ट कोणीही नाकारीत नाही. शंकराचार्यांची गुरुपरंपरा येणेप्रमाणे आहे.

शिवं ज्ञानोपदेष्टारं विष्णुं धर्मोपदेशकम्।
विधिं वेदप्रवक्तारं गुरुमूर्तित्रयं भजे॥
वसिष्ठं ब्रह्मविच्छ्रेष्ठं शक्तिं योगविदां वरम्।
पराशरं पुराणज्ञं प्रणतोऽस्मि मुनित्रयम्॥
व्यासं वेदान्तसूत्राणां वक्तारं बादरायणम्।
श्रीशुकं सूत्रकारं च भजे वेदान्तदेशिकौ॥
श्रीमद्गौडपदाचार्यमद्वैतार्थप्रबोधकम्।
गोविंदभगवत्पादमद्वैताचार्यमाश्रये।
अद्वैतस्थापनाचार्यं शंकरं लोकसद्गुरुम्॥
प्रस्थानत्रयभाष्यादि ग्रंथकारं नमाम्यहम्॥

गोवर्धनमठ–गुरुपरंपरा
(पाहा : शंकराचार्य व त्यांचा संप्रदाय: म. रा. बोडस)

म्हणजे शिव–विष्णु–ब्रह्मा–वसिष्ठ–शक्ति–पराशर–व्यास–शुक–गौडपाद–गोविंदयति–व शंकराचार्य अशी आचार्यांची गुरुपरंपरा आहे. कै. ल. रा. पांगारकर यांनीही शंकराचार्यांची गुरुपरंपरा अशीच दिली आहे. (पाहा : मराठी वाङ्मयाचा इतिहास– खंड पहिला : ज्ञानेश्वर नामदेवांचा काल : पृष्ठ २७८)

ज्ञानदेवांची गुरुपरंपरा अशी आहे :– आदिनाथ – मच्छेंद्रनाथ – गोरखनाथ–गैनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञाननाथ ऊर्फ ज्ञानदेव–ज्ञानेश्वर.

या दोन्हीही गुरुपरंपरा निरनिराळ्या आहेत, ही गोष्ट उघडच आहे. परंतु एक गोष्ट अशी लक्षणीय आहे की, दोन्हीही गुरुपरंपरांचा उगम शिव म्हणजे आदिनाथ आणि आदिनाथ म्हणजे शिव यांपासूनच झालेला आहे. परंतु असे असले तरी ज्ञानदेवांचा संप्रदाय किंवा परंपरा नाथसंप्रदाय किंवा नाथपरंपरा म्हणूनच सुप्रसिद्ध आहे आणि शंकराचार्यांचा संप्रदाय किंवा परंपरा शांकरसंप्रदाय किंवा शांकरपरंपरा म्हणूनच सुप्रसिद्ध आहे.

आचार्य आणि ज्ञानदेव यांच्या गुरुपरंपरा जरी भिन्न असल्या, तरी त्या दोन्ही परंपरांचे साध्य किंवा तत्त्वज्ञान एकच आहे व ते अद्वैत तत्त्वज्ञानच होय. कै. ल. रा. पांगारकर म्हणतात, " वेदोपनिषदांनी प्रगट केलेला व शंकराचार्यांनी विशद रीतीने प्रतिपादिलेला अद्वैतसिद्धांत नाथसंप्रदायाने स्वीकारलेला असून योगमार्गाने त्याचा अनुभव घेण्यास शिकविले आहे. " ( पाहाः मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड पहिला : ज्ञानेश्वर नामदेवांचा काल : पृष्ठ ४८७ ). दोन्ही परंपरांचे साध्य एकच परंतु साधनमार्ग किंवा गुरुपरंपरा मात्र भिन्न. शांकरपरंपरेत ज्ञानावर भर तर नाथपरंपरेत योगावर भर. शांकरपरंपरेत ज्ञानमार्गाने अद्वैत तत्त्वज्ञानाचे साध्य गाठावयाचे तर नाथपरंपरेत ते योगमार्गाने गाठावयाचे एवढाच फरक आहे. या दृष्टीने म्हणजे शंकराचार्य आणि ज्ञानदेव यांचे अंतिम तत्त्वज्ञान जर एकच आहे, तर ज्ञानदेवांना तत्त्वज्ञानदृष्ट्या शंकराचार्यांना अनुसरण्यास प्रत्यवाय का असावा ? आणि त्यामुळे त्यांची गुरुपरंपरा कशी सुटते ? व ती सोडण्याचे प्रयोजनच काय ? ज्ञानदेवांनी ज्ञानदेवीत योगाइतकाच नव्हे, योगापेक्षाही ज्ञानावर अधिक भर दिलेला नाही काय ? त्यांना कर्मही ज्ञानयुक्त, भक्तीही ज्ञानयुक्त आणि योगही ज्ञानयुक्तच पाहिजे आहे, असे ज्ञानदेवीत दृग्गोचर होत नाही काय ? तेव्हा त्यांची गुरुपरंपरा त्यांना तत्त्वज्ञानदृष्ट्या आचार्यांचे अनुसरण करावयास आड येऊ नये आणि ती आड येत नाहीही. या विचारसरणीस आधार म्हणून दुसरीही उदाहरणे देता येतील.

आदिकवी मुकुंदराज यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे :—

आदिनाथ–हरनाथ–रघुनाथ–मुकुंदराज. येथेही आदिनाथापासूनच प्रारंभ आहे. आणि ही नाथपरंपरा म्हणूनच समजली जाते. पण असे असताही मुकुंदराज शंकराचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञानच अनुसरतात, हे त्यांच्या ' विवेकसिंधु ' आणि ' परमामृत ' या दोन्ही ग्रंथांवरून निःसंदिग्धपणे दृग्गोचर होते. त्यांची गुरुपरंपरा त्यांना शंकराचार्यांचे अनुसरण करण्यास आड येत नाही; व तसे केल्यामुळे ती सुटतही नाही. ते स्वतःच म्हणतात की, " शंकरोक्तीवरी । मी बोलिलों मऱ्हाठी वैखरी । म्हणौनि निर्धारावी चतुरीं । शास्त्रबुद्धी ॥ " ( पाहाः विवेकसिंधु–पूर्वार्ध : ७–१४७ ).

दुसरे उदाहरण एकनाथमहाराजांचे देता येईल. त्यांची गुरुपरंपरा अशी : श्रीदत्तात्रेय – जनार्दनस्वामी – एकनाथ. या परंपरेप्रमाणे बोलावयाचे म्हणजे एक-

नाथांचा दत्तसंप्रदाय आहे. परंतु तत्त्वज्ञानदृष्ट्या ते शंकराचार्य आणि ज्ञानदेव या दोघांनाही अनुसरतात. स्वतःची दत्तपरंपरा असून ज्ञानदेवांची नाथपरंपरा आणि आचार्यांची ज्ञानपरंपरा या दोन्हीही ते एकसमयावच्छेदेकरून अनुसरतात असे त्यांच्या ग्रंथावरुन स्वच्छ दिसते. "तत्त्वज्ञानक्षेत्रात श्रीएकनाथावर आद्य शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताची पूर्ण छाप पडलेली आहे, याचा पुरावा द्यावयाचा झाल्यास एकाच गोष्टीचा उल्लेख केला तरी पुरे. एकनाथांनी मूळ संस्कृत भागवतातील अकराव्या स्कंधावर जी प्रदीर्घ टीका लिहिली तीत त्यांनी ज्या थोर विभूतींना प्रथम वंदन केले आहे त्यांत आचार्यांपैकी एकटे शंकराचार्यच आहेत ही गोष्ट मोठी सूचक आहे. पहिल्याच अध्यायातील ११८ व्या ओवीत ते म्हणतात, "वंदू आचार्या शंकरु । जो प्रबोधविद्येचा सागरु । सारुनि कर्मठतेचा विचारु । प्रबोध दिनकरु प्रकाशिला ॥" रामानुज, वल्लभ, मध्व वगैरे आचार्यांनी स्वतःच्या दृष्टिकोणातून उपनिषत्तत्त्वांचा अर्थ लावला. या सर्व आचार्यांचे लिखाण नाथांच्या नजरेतून सुटले असेल हे संभवत नाही. पण शंकरांच्या तत्त्वज्ञानानेच त्यांच्या मनाची खरी पकड घेतली होती. त्यातून ज्ञानेश्वरांनीही याच तत्त्वज्ञानाची तेजस्वी तरफदारी आपल्या 'महाराष्ट्र' भाषेत केली. मग नाथांचे मन केवलाद्वैताकडे आकर्षिले गेले यात काहीच नवल नाही." (पाहा : एकनाथदर्शन खंड २ रा : पृष्ठ : ७८) 'एकनाथांना काही भाविक ज्ञानेश्वरांचा अवतारच समजतात. त्यातील तथ्य कै. पांगारकरांच्या शब्दांत एवढेच सांगता येईल की,' "ज्ञानेश्वरीचा दुसरा अवतार म्हणजे नाथभागवत होय. जे सिद्धान्त ज्ञानेश्वरीत संक्षेपाने सांगितले आहेत, ते गृहस्थाश्रमी नाथांनी भाविक उपासकांच्या मनावर आपल्या रसाळ सगुण प्रेमाने ओथंबलेल्या वाणीने भागवतात उलगडून विस्ताराने सांगितले आहेत." (पाहा : एकनाथदर्शन खंड २ रा : पृष्ठ ९१). या सर्व विवेचनाचा अर्थच असा की, अद्वैत तत्त्वज्ञानरूपी साध्य सर्वांचे एकच असल्यामुळे त्यांना म्हणजे एकनाथांना आचार्य किंवा ज्ञानदेव यांना अनुसरण्यास अडचण वाटली नाही, व त्यामुळे त्यांची गुरुपरंपरा सुटते असेही होत नाही.

तिसरे उदाहरण हंसराजस्वामींचे देता येईल. त्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे :—आदिनारायण-हंसब्रह्मा-वसिष्ठ-राम-रामदास-उद्धव-माधव-रुद्रनागनाथ-लक्ष्मणनारायण ऊर्फ हंसराज-रघुनाथशास्त्री गोडबोले. या परंपरेवरून हंसराजस्वामी हे रामदास-समर्थ संप्रदायातील किंवा परंपरेतील आहेत. परंतु ते शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान अक्षरशः अनुसरतात असे त्यांच्या ग्रंथांवरून कोणाच्याही लक्षात येईल. शंकराचार्यांच्या 'लघुवाक्यवृत्ति' (ओवी संख्या ५६००), 'सदाचार' (२०६४) या प्रकरण-ग्रंथांवर त्यांनी ओवीबद्ध टीका केली असून त्यात त्यांनी शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान संपूर्णतया प्रतिपादिले आहे. दुसरेही त्यांचे ग्रंथ आहेत : 'शिवगीतेवर' ओवीबद्ध टीका (६०००), 'चूडलाख्यान' अभंगबद्ध टीका (अभंगसंख्या २२००) हेही

अप्रतिम ग्रंथ असून त्यांत त्यांनी सर्वत्र शांकर तत्त्वज्ञान अनुसरले आहे. त्यांनी अमृतानुभवावरही समश्लोकी ओवीबद्ध टीका केली आहे ( संख्या १००० ). वरील सर्व लिहिण्याचा इत्यर्थ हा की, सर्व संप्रदायांचे अद्वैत तत्त्वज्ञानरूपी साध्य एकच असल्यामुळे त्यांनी शंकराचार्यांचे अनुसरण केले तरी त्यामुळे त्यांनी आपली गुरुपरंपरा सोडली असे होत नाही आणि त्यांना गुरुपरंपरा सोडावी लागते असेही नाही.

एका ज्ञानवृद्ध आणि वयोवृद्ध थोर सद्गृहस्थांनी आम्हाला अशी सूचना केली की, प्रस्तुतचा हा प्रबंध लिहिण्यापूर्वी आम्ही एकदा ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथांचा ' महार्थमंजरी ' हा ग्रंथ त्यांचीच त्या ग्रंथावर ' परिमल ' या नावाची जी टीका आहे, त्या टीकेसह वाचावा. अगत्याने केलेली ही सूचना स्वीकारार्हच होती. परंतु आमच्या मते येथेच एक पुष्कळांची मोठी गफलत झालेली आहे. ज्ञानदेव-संप्रदायातील ' गोरक्षा 'प्रमाणेच काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायातही एक ' गोरक्ष ' या नावाचे ग्रंथकार होऊन गेलेले आहेत. नामसादृश्यामुळे दोन्ही एकच आहेत असा पुष्कळांचा गैरसमज झालेला आहे. परंतु त्या दोन्ही भिन्न व्यक्ती आहेत. काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायातील गोरक्षांनाच ' महेश्वरानंद ' असे दुसरे नाव आहे, आणि त्यांचाच ' महार्थमंजरी ' हा ग्रंथ आहे. ज्ञानेश्वरसंप्रदायातील गोरक्षनाथांचा तो ग्रंथ नाही. ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथांची आणि इतर नाथ-योग्यांची म्हणून जी ग्रंथावली प्रसिद्ध झालेली आहे तीत प्रस्तुतच्या ग्रंथाचा नामनिर्देशही नाही. ( पाहा : Siddha-Siddhanta– Paddhati and other works of the Natha Yogis by Smt Kalyani Mallik ) ' महार्थमंजरी ' आणि त्यावरील त्यांचीच ' परिमल ' या नावाची टीका एवढा एकच ग्रंथ महेश्वरानंद-गोरक्षांचा आज उपलब्ध झालेला आहे. त्यांचे दुसरे ग्रंथ असले तरी ते मिळालेले नाहीत. अनुमानानेच त्यांचे दुसरे ग्रंथ असावेत असे मानावे लागते. ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथांचेच ग्रंथ–उदाहरणार्थ : गोरक्षगीता, सिद्धसिद्धान्तसंग्रह, सिद्धसिद्धान्त पद्धति हे ग्रंथ अपसमजुतीने त्यांच्या नावावर दिलेले आहेत. ( पाहा : श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर व श्रीज्ञानेश्वर वाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास : ले. वा. मा. खुपरेकरशास्त्री ) आणि वर म्हटल्याप्रमाणे शैवसंप्रदायातील गोरक्ष-महेश्वरानंदांचा ' महार्थमंजरी ' हा ग्रंथ ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथांचा म्हणून निर्देशिला आहे, परंतु त्यांच्या ग्रंथांची आणि त्यांच्या संप्रदायांचीही अशी अदलाबदल करणे पूर्णपणे चुकीचे आहे. पाहा –

' In Sanskrit literature we come across more than one Goraksha, e. g. ( i ) an early exponent of the Hathayoga system, ( ii ) one of the many Siddhas who are admitted to be still moving about in the Brahmanda, ( iii ) teacher of Svatmarama Svamin, the author of the Hathagoga Pradipika, who seems to quote two

verses from Abhinava Gupta's Anubhava Nivedana : "Antarlaksya" ( 187 ) and " Ardhodghatita " ( 189 ) and one from Goraksa " Varjayeddurjana prantam. " ( iv ) the author of the Amarangha Sasana, which deals with yoga as a way to final emancipation and contains a quotation from Smriti :— " Sabdabrahmani nisnatah parambrahmadhigacchati, " without stating that it is a quotation. But Goraksa, the author of the Maharthamnjari, is apparently different from all these. "

Goraksa, the author of the Mahartha Manjari and a commentary on it, was given the name " Mahesvarananda " by his teachers on account of his spiritual attainments ". " Mahartha Manjari with his own commentary, Parimala, is the only work of his that is available so far. About other works, we know from references only in the above-mentioned commentary. "

" This Goraksa ( the exponent of Hathayoga ) seems to be a very early authority and, therefore, different from Goraksa alias Mahesvarananda, the author of the Mahartha Manjari and other works. For a while the former is recognised to be the exponent of Hathayoga, Mahesvarananda was the exponent of Mantrayoga. " ( From, Abhinavagupta : An Historical and Philosophical study— by K. C. Pandey, pages 74, 273, 274 ).

यावरून हे निःसंदिग्धपणे सिद्ध होते की, ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथ आणि काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायातील गोरक्ष हे एक नसून त्या दोन भिन्न व्यक्ती आहेत आणि त्यांचे ग्रंथ व संप्रदायही वेगवेगळे आहेत. आणि याप्रमाणे महार्थमंजरीकार गोरक्ष ऊर्फ महेश्वरानंद हे ज्ञानदेव-संप्रदायातील गोरक्षनाथ नसून ते काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायातील आहेत असे एकदा सिद्ध झाल्यानंतर महार्थमंजरी ग्रंथातील तत्त्वज्ञानही शिवाद्वैत संप्रदायातील तत्त्वज्ञानाहून वेगळे नसणार व नाही हे सिद्धच आहे. आणि शांकर तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने एकंदर शिवाद्वैत संप्रदायातील तत्त्वज्ञानासंबंधी आमचा काय अभिप्राय आहे ते आम्ही पुढे लिहिणारच आहोत—( म्हणजे शांकर आणि शिवाद्वैत या दोन्ही तत्त्वज्ञानांमध्ये काही प्रक्रियाभेद वगळिता फारच सारखेपणा किंवा साम्य आहे हा अभिप्राय आम्ही पुढे व्यक्त करणारच आहोत ) त्यावरून मग हेही स्पष्टच होईल की, महार्थमंजरी ग्रंथातील तत्त्वज्ञानाच्या बाबतीतही अगदी तोच अभिप्राय बरोबर आहे असे म्हणता येते किंवा म्हणणे भाग पडते.

शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान केवलाद्वैती असून ज्ञानदेवही केवळ अद्वैतच मानतात. म्हणून ज्ञानदेव 'भाष्यकार' म्हणून शंकराचार्यांनाच अनुसरतात असे म्हणणे भाग पडते, हे वरील एकंदर विवेचनावरून दिसून येईल. परंतु हे मत ज्यांना मान्य करावयाचे नाही, ते आग्रहाने आणि अभिनिवेशाने असे प्रतिपादितात की, ज्ञानदेव केवळ अद्वैत मानीत असले तरी ते शंकराचार्यांनाच अनुसरतात असे नाही, तर ते काश्मिरी शिवाद्वैत परंपरेतील 'अभिनवगुप्त', 'रामकण्ठ' या गीताभाष्यकारांना अनुसरतात, कारण त्यांचेही अद्वैत तत्त्वज्ञानच आहे. पण ते येथे एक लक्षणीय गोष्ट विसरतात. ती ही की, शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचाच फार मोठा प्रभाव काश्मिरी शिवाद्वैत तत्त्वज्ञानावर पडलेला आहे. प्रथम एक गोष्ट सिद्ध आहे की, शंकराचार्य हे रामकण्ठ, अभिनवगुप्त या काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायातील गीताभाष्यकारांच्या अगोदर होऊन गेलेले आहेत. शंकराचार्यांचा काळ खिस्तशक ७८८–८२० हा आहे, तर अभिनवगुप्त व रामकण्ठ यांचा काळ अनुक्रमे खिस्तशक ९५०–९६० आणि ९५०–१००० हा आहे. (See, Abhinavagupta – An Historical and Philosophical Study, p. 9 and 158) दुसरे असे की शंकराचार्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रसार सर्व भरतखंडभर करून दिग्विजय संपादिला होता. त्या वेळी ते काश्मीरमध्येही गेले होते व तेथे त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन व प्रसार करून शेवटी काश्मिरातील शारदापीठावर अधिरोहण केले होते व त्यामुळे त्यांस 'जगद्गुरु' ही पदवी प्राप्त झाली. तिसरी गोष्ट अशी की, काश्मीरमध्ये शंकराचार्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाच्या केलेल्या प्रसारामुळे आणि काश्मिरी शिवाद्वैत तत्त्वज्ञान त्यांच्यानंतर निर्माण झालेले असल्यामुळे शंकराचार्यांचीच शब्दप्रणाली त्या तत्त्वज्ञानात योजिलेली आहे. उदाहरणार्थ, अद्वैत, माया, प्रकृति, अज्ञान, प्रतिबिंब, आभास, विवर्त, भ्रांति वगैरेसारखे शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानात असलेले महत्त्वाचे शब्दप्रयोग काश्मिरी शिवाद्वैत तत्त्वज्ञानात उपयोजिलेले आढळून येतात. अर्थात त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या निर्मितीपूर्वीच तेथे झालेल्या शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचाच तो प्रभाव किंवा परिणाम नव्हे काय? शिवाय शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान आणि काश्मिरी शिवाद्वैत तत्त्वज्ञान यांमध्ये खूपच सारखेपणा आहे असे दृग्गोचर होते. "शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान आणि काश्मिरी शिवाद्वैत ही बहुतेक सारखीच आहेत, हे पं. मुकुंदरामशास्त्री, डॉ. भांडारकर व प्रो. मिराशी या विद्वानांचे मत बरोबर आहे." असे डॉ. शं. दा. पेंडसे यांनी आपल्या 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या ग्रन्थात नमूद केलेलेच आहे. (पाहा : पृष्ठ ३५०) वरील विवेचनाला पुढील आधार देता येतील पाहा :

"These (Kashmir schools) are very sobre in their doctrines and practices and may be considered to have been influenced by the school of Shankar" (See : Dr. Bhandarkar "Vaisnavism, Shaivism and other sects, p. 222) "Such was the opportune time

when Shankaracarya visited Kashmir sometime in the second decade of the 9 th century :( Shankar Digvijaya, ch. xvi, 54–80 ) Let us state here very clearly that our statement about Shankaracorya's visit to Kashmir has no other authority than that of the Shankar Digviaya, referred to above. Let us, however, add that it does not appear to be altogether baseless : firstly because it is supported by a local tradition which is still current in Kashmir, and secondly, because the influence of Shankara's Tantric philosophy on the Trika is so great that the supposition of a personal touch of its founder writers with Shankar seems to be necessary to explain it at such an early time. If we compare the philosophical ideas of Shankara, as contained in his Daksinamurti Stotra and explained by his pupil Suresvaracarya in his commentary on the above Stotra, we find that Shankara's conception of the ultimate reality is the same as that of the Pratyabhijna. In fact he uses all the important technical expressions in the same sense in which they are used in the Pratyabhijna...... we, therefore, feel that, whatever be the amount of fiction with which Madhava may have coloured Shankara's visit to Kashmir, it is not without a grain of truth inasmuch as the said visit was a fact...... The visit of such a great person, particularly after uprooting Buddhism in the course of his Digvijaya ( if this be taken to be an historical fact ) was of no little importance to the philosophical system that was soon to come into existence. This visit purged the local faith of its Buddhistic element, strengthened the position of the new tantric creed, which was brought by the two immigrant families and had already begun to be accepted by the populace, and aroused their curiosity to know more about the new creed. " ( See : Abhinava-gupta : An Historical and Philosophical Study – By Prof. K. C. Pandey : Pages 151–153 ).

डॉ. शं. दा. पेंडसे गौरव-ग्रंथात प्रो. ग. त्र्यं. देशपांडे यांचा ' शांकर वेदान्त आणि शिवाद्वयदर्शन : काही साम्ये ' हा एक लेख आहे. त्यात ते म्हणतात, " शांकर वेदान्त आणि शिवाद्वयदर्शन यांमध्ये अशा प्रकारे मूल विचारांचा सारखेपणा आहे.

त्यांनी उपपत्ती लावताना वापरलेल्या प्रक्रियेमध्ये मात्र फरक आहे, व तो फरक पडावयास कारण आहे. शंकराचार्यांनी उपनिषदांतील प्रक्रिया विवेचनाकरिता घेतली, तर अभिनवगुप्तादिकांनी आगमातील प्रक्रिया विचाराकरिता घेतली. पण तेवढ्यामुळे त्यांच्या तत्त्वविचारात भिन्नता येत नाही. कारण प्रक्रिया वेदान्त्यांची असो किंवा शैवांची असो, ती कल्पितच असते." देशपांडे यांचा लेख लहानच आहे; पण प्रस्तुत विषयाच्या संदर्भात वाचनीय आहे.

वरील विवेचनावरून आणि त्याला दिलेल्या आधारवचनांवरून हे सिद्धच आहे की, शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा काश्मिरी शिवाद्वैत तत्त्वज्ञानावर फार मोठा परिणाम झाला आहे आणि त्यामुळे काही प्रक्रियाभेद वगळिता त्यांच्या मूळ विचारात किंवा तत्त्वज्ञानात फारच सारखेपणा किंवा साम्य आहे. म्हणून ज्ञानदेव शिवाद्वैत संप्रदायातील गीताभाष्यकारांना अनुसरतात असे म्हणणे म्हणजे पर्यायाने व तत्त्वतः ते शंकराचार्यांनाच अनुसरतात असे म्हणण्यासारखेच नाही काय ?

ज्ञानदेव-संप्रदायातील ' गोरक्ष ' आणि काश्मिरी शिवाद्वैत-संप्रदायातील ' गोरक्ष ' या दोन भिन्न व्यक्ती नसून ते एकच आहेत. या गैरसमजुतीने त्यांच्या संप्रदायांची आणि ग्रंथांची कशी अदलाबदल झाली आहे, यासंबंधी वर खुलासा केला. तसाच दुसऱ्या एका बाबतीतील अपसमज दूर करणे येथे आवश्यक आहे. काश्मिरी शिवाद्वैत संप्रदायात तीन गीताभाष्यकार होऊन गेलेले आहेत आणि त्यांची ती भाष्ये प्रकाशित झाली आहेत. रामकंठ, अभिनवगुप्त आणि आनंदवर्धन हे ते तीन गीताभाष्यकार होत. यांतील पहिले दोघे ज्ञानदेवपूर्व असून तिसरे ज्ञानदेवोत्तर झालेले आहेत. जे ज्ञानदेवोत्तर झालेले आहेत त्यांना ज्ञानदेवांनी वाट पुसण्याचा किंवा अनुसरण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. परंतु जे ज्ञानदेवपूर्व झालेले आहेत, त्यांच्या बाबतीत मात्र तो प्रश्न संभवनीय आहे, यात शंका नाही. पण हे गीताभाष्यकार स्वच्छ शैवसंप्रदायातील असताना ते नाथसंप्रदायातील ज्ञानदेवांना ' आपले, घरचे, निकटवर्ती आप्तस्वकीय ' म्हणजे आपल्या नाथसंप्रदायातील कसे होतात हे समजत नाही. कारण ' या आपल्या घरच्या निकटवर्ती आप्तस्वकीयांना सोडून गीतेवर व्याख्यान करताना ज्ञानेश हे अन्य भाष्यकारांना संदेहप्रसंगी वाट पुसावयास कशाला जातील ? ' ( पाहा : श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर : ले. बाळाचार्य माधवाचार्य खुपरेकर : पृष्ठ १०० ) या प्रश्नांकित वाक्यावरून ज्ञानदेवांना हे शैवसंप्रदायातील गीताभाष्यकार आपल्या नाथसंप्रदायातीलच वाटतात, असे स्वच्छ बोधित होते. पण मग हे कसे ? शैवसंप्रदायच नाथसंप्रदाय किंवा नाथसंप्रदायच शैवसंप्रदाय कसा ? हे संप्रदाय दोन की एक ? यासंबंधी येथे स्वच्छ खुलासा करणे अवश्य वाटते.

' क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तिचां कर्णकुहरीं । तेणें कैं श्रीत्रिपुरारी । सांघितलें जें ॥ '

१८-१७३०, ' अनादिगुरुशंकरा। पासोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संवसारा। जाला आमतें' १८-१७३७, ' तें माहेशान्वयसंभूतें। श्रीनिवृत्तिनाथसुतें। केलें ज्ञानदेवें गीते। देशीकार लेणें ' १८-१७८४. या गुरुपरंपरा सांगणाऱ्या तीन ओव्यांत ' श्रीत्रिपुरारी, ' ' अनादिगुरुशंकरा ' आणि ' माहेश ' असे तीन शब्दप्रयोग ज्ञानदेवांनी योजिले आहेत. तीनही नावे ' शिवाची ' च आहेत. आणि ' शिवा'लाच ' आदिनाथ ' असेही म्हणतात. त्या आदिनाथापासूनच आदिनाथ–मत्स्येंद्रनाथ–गोरक्षनाथ–गहिनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञाननाथ अशी ज्ञानदेवांची गुरुपरंपरा सुप्रसिद्ध आहे. तोच नाथसंप्रदाय होय. आणि तो नाथसंप्रदाय या नावानेच प्रसिद्ध असून तो शैवसंप्रदाय या नावाने केव्हाही आणि कोठेही प्रसिद्ध नव्हता व नाहीही.

त्याचप्रमाणे शैवसंप्रदायाची गुरुपरंपरा अशी आहे : शिव–वसुगुप्त–सोमानंद–उत्पलाचार्य–लक्ष्मण-अभिनवगुप्त. उत्पलाचार्यांचाच दुसरा शिष्य रामकण्ठ आहे. ( See, J. C. Chatterji : Kashmir Saivism, page 306.) यांपैकी ' रामकण्ठ ' आणि ' अभिनवगुप्त ' यांची गीतेवर भाष्ये आहेत, हे वर म्हटलेच आहे. आता या गुरुपरंपरेचाही आदिपुरुष ' शिव ' च आहे, आणि ' शिव ' म्हणजे ' आदिनाथ ' म्हणून तीही नाथपरंपराच आहे असे कोणाला म्हणावयाचे असेल तर त्याने तसे म्हणावेही. परंतु ती नाथपरंपरा म्हणून केव्हाही आणि कोठेही प्रसिद्ध नव्हती व नाही. ती शैवपरंपरा किंवा तो शैवसंप्रदाय म्हणूनच प्रसिद्ध आहे.

पण मग हाच न्याय शांकरसांप्रदाय किंवा शांकरपरंपरेच्या बाबतीतही का लागू करू नये? त्यांच्याही परंपरेचा आदिपुरुष ' शिव 'च आहे. पूर्वी त्यांची गुरुपरंपरा सांगणारे जे श्लोक उद्‌धृत केले आहेत, त्यावरून हे दिसून येतेच. आणि ' शिव ' म्हणजे ' आदिनाथ ' म्हणून शांकर परंपरेलाही ' शिव ' या नावामुळे ' शैव-परंपरा ' आणि ' आदिनाथ ' या नावामुळे ' नाथपरंपरा ' असे का म्हणू नये ? आणि मग त्यामुळेच ज्ञानदेवांना तीही म्हणजे शांकर-परंपरा ' आपली घरची निकटवर्ती आप्तस्वकीय ' म्हणजेच आपल्या नाथसंप्रदायातील अशी का वाटू नये ? व मग त्यांनी तिला वाट पुसावयास का जाऊ नये ? परंतु तीही म्हणजे शांकर-परंपरा ' शैव-परंपरा ' किंवा ' नाथ-परंपरा ' म्हणून केव्हाही आणि कोठेही प्रसिद्ध नव्हती व नाहीही. ती शांकर किंवा आचार्य-परंपरा म्हणूनच सर्वत्र सुप्रसिद्ध आहे.

अशा परिस्थितीत ज्ञानदेव निश्चयाने कोणाला अनुसरतात ? किंवा वाट पुसतात आणि ते निर्णायकपणे व निःसंदिग्धपणे कसे ठरवावयाचे ? तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने पाहावे तर आचार्य-संप्रदाय, नाथ-संप्रदाय आणि शैव-संप्रदाय या तिन्हीही संप्रदायांचे तत्त्वज्ञान एकच आहे आणि ते अद्वैत तत्त्वज्ञानच होय. तेव्हा त्या दृष्टीनेही तो प्रश्न समाधान-कारक सुटत नाही. ते स्वतः नाथ-संप्रदायातीलच असल्यामुळे त्याला त्यांनी वाट

पुसण्याचा प्रश्नच संभवत नाही. मग शांकर-संप्रदाय किंवा शैव-संप्रदाय यांपैकी कोणाला त्यांनी वाट पुसली आहे ? त्यांनी दोघांनाही यथासंभव वाट पुसली असे म्हणणे हे तड-जोडीचे किंवा मध्यम मार्गाचे होईल, परंतु ते मोघम व सरवरीत होईल; निर्णायक किंवा निश्चयात्मक नव्हे. अशा परिस्थितीत आमच्या मते या प्रश्नाचा कायमचा आणि निर्णायक उलगडा व्हावयाचा तर तो एकाच मार्गाने होईल आणि तो मार्ग असा :—

डॉ. शं. दा. पेंडसे यांनी आपल्या 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या ग्रंथात ज्याप्रमाणे गीतेवरील शांकरभाष्य, रामानुजभाष्य आणि ज्ञानेश्वरी यांचा अध्यायवारीने व श्लोक-क्रमानुसार तुलनात्मक सविस्तर विचार केला आणि त्यांच्यामधील साम्य-वैषम्य दाखविले आणि शेवटी ज्ञानदेवांचे 'भाष्यकार' हे शंकराचार्यच होत, दुसरे कोणी नव्हेत, असा निर्णायक निष्कर्ष काढिला, त्याचप्रमाणे ज्यांना ज्ञानदेव हे शैव-संप्रदायातील गीताभाष्य-कारांनाच अनुसरतात असे वाटते आणि तसे ते आग्रहाने व अभिनिवेशाने प्रतिपादितात त्यांनी गीतेवरील शांकरभाष्य, रामकण्ठभाष्य, अभिनवगुप्तभाष्य आणि ज्ञानेश्वरी यांचा अध्यायक्रमानुसार आणि श्लोकक्रमानुसार तुलनात्मक सविस्तर विचार करून त्यांच्या-मधील साम्य-वैषम्य दाखविले पाहिजे आणि शेवटी ज्ञानदेवांचे 'भाष्यकार' शंकराचार्य नसून शैव संप्रदायातील रामकण्ठ व अभिनवगुप्त हेच भाष्यकार आहेत, असे निर्णायक रीतीने दाखविले पाहिजे. तरच ज्ञानदेवांचे 'भाष्यकार' कोण या प्रश्नाचा कायमचा व निःसंदिग्ध निर्णय होईल. नाहीतर इतर मार्गांनी तो होणार नाही असे आम्हास वाटते.

*

पुढील अंक

## 'वाङ्मय-समालोचन अंक : १९७०'

तसेच,

कै. ल. रा. पांगारकर

जन्मशताब्दीनिमित्त

पांगारकरांच्या कार्याचे विवेचन करणारे

दत्तो वामन पोतदार

व न. र. फाटक यांचे लेख

या अंकात प्रसिद्ध होतील.

*











# कै. वि. ल. भावे–इतिहासविषयक कार्य

## भावे जन्मशताब्दी महोत्सवातील व्याख्यान



दि. वि. काळे

१. ' महाराष्ट्र-सारस्वत 'कार भावे आणि ' महाराष्ट्र-कवि ' चे संपादक भावे हे निःसंशय संशोधक होते हे आवर्जून सांगितले पाहिजे असे नाही. त्यांच्या वाङ्मयविषयक संशोधनाची पुष्कळच माहिती असली तरी त्यांचे इतिहासविषयक संशोधनही तितकेच गौरवास्पद आहे.

२. भाव्यांच्या सारस्वत-संशोधनामध्ये उपलब्ध झालेले १८१८ पूर्वीचे ऐतिहासिक कागदपत्र छापण्यासाठी त्यांनी ' मराठी दफ्तर ' ही स्वतंत्र संस्था स्थापन ( १९१७ ) करताना ऐतिहासिक कागदपत्रांचा असा निराळा वर्ग मुद्दाम कल्पिलेला आहे. ते म्हणतात ( रुमाल १ प्रास्ताविक ) " ऐतिहासिक कागदपत्र म्हणजे राजकीय उलाढालीसंबंधीचा, लढायांचा, तहनाम्यांचा वगैरे ज्यात मजकूर आहे असे कागदपत्र, असा अर्थ समजावयाचा. सामाजिक, साहित्यसंबंधी, तसेच काव्य, कला, ज्योतिष, वैद्यक वगैरे मजकुराचा यात प्राधान्येकरून समावेश करावयाचा नाही. " हा दंडक पाळून थोडक्यात त्यांच्या इतिहासविषयक प्रकाशनांचे परिगणन करून त्यांचे परिमाण, प्रतिपाद्य आणि स्वदेशहितकारी स्वरूप याबद्दल आपल्याला परिचय करून घ्यावयाचा आहे.

३. महाविद्यालयात शिकत असतानाच महाराष्ट्रातील आद्य मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थापना ( १८९३ ) करणाराची देशभक्ती आणि मातृभाषेचा स्वाभिमान निराळा वर्णावयास नको. भाव्यांचे ग्रंथकर्तृत्व उफाळून आले तो काल (१८९९-१९२६) राजकीय दृष्ट्या खळबळीचा आणि इतिहास-दृष्ट्या साने, खरे, पारसनीस, राजवाडे या मुनिचतुष्टयाच्या चिरंतन महत्त्वाच्या मौलिक संशोधनाचा होता. यांपैकी राजवाड्यांसारखा प्रचंड प्रतिभेचा द्रष्टा वगळला तर मराठ्यांच्या इतिहासाच्या क्षेत्रात कै. विनायक लक्ष्मण भावे आणि कै. दत्तोपंत आपटे हे दोनच शास्त्रज्ञ किंवा गणिती लाभले आणि त्या प्रमाणात त्यांच्या संशोधनाचा वाण, पद्धती आणि परिपाक या

दृष्टीने इतरांपेक्षा काहीसा निराळा निघाला असे प्रतिपादन करता येते. दोघेही राजवाड्यांची साधनपद्धती ( सोअर्स मेथड ) शिरसावंद्य मानणारे असूनही त्यासाठी अडून न बसता शक्य तेव्हा, शक्य तेथे ग्रंथनिर्मिती ( इतिहासरचना ) करण्यास केवळ अनुकूलच नव्हे तर समर्थही होते याचे प्रत्यंतर मिळते. भावे यांच्या व्यक्तित्वातील हा विलोभनीय विशेष त्यांच्याशी चिरपरिचित असलेल्या म. म. पोतदारांनी " **पदवी** भौतिक-शास्त्राची ( BSc प्राणि-शास्त्र, वनस्पति-शास्त्र ), **नाद** पाखरे उडविण्याचा, **धंदा** मीठ विकण्याचा, आणि **संशोधन** प्राचीन मराठी काव्याचे, असा फक्कड मेळ भावे चरित्रात बसला होता " या शब्दात वर्णन केले आहे. अशा रीतीने पैशाचे व बुद्धीचे असे दोन्ही बळ असणारे थोडेच असतात. पण त्यातून विलक्षण जिद्द आणि वर्षांच्या दशकावारी टिकणारी चिकाटी असल्याशिवाय शून्यातून शास्त्रीय दर्जाचा ग्रंथराज – स्वतःच्या 'आयुष्यात वाढत्या विस्ताराच्या अनेक आवृत्त्यांत– प्रकाशित होत नसतो.

४. भाव्यांच्या स्वच्छंदी जीवनात मराठी काव्याशी आणि मोडीशी दृढ परिचय झाल्यामुळे निर्भेळ मराठीचा अभिमान, पेशवाई नष्ट होण्यापूर्वीच्या (१८१८ पूर्वीच्या) साहित्याचाच परामर्श घेण्याची खबरदारी, इसवी सन तारखांपेक्षा शकमिती वापरण्याचा आग्रह, सर्वसाधारणपणे इंग्रजी आणि इंग्रजादी परकी इतिहासकार यांच्याबद्दल संशय, स्वकीयांच्या इतिहासविषयक अनास्थेबद्दल घृणा आणि स्वकीय साधनांवर भिस्त ठेवून स्वकीय इतिहासाची रचना करण्यावर दृढ विश्वास, इत्यादी राजवाडेपंथीयांमध्ये दिसून येणारे कठोर विशेष त्यांच्या प्रत्येक लिखाणात आणि प्रतिपादनात दिसून येतात. त्यांनी नेपोलिअनचे चरित्र ज्या लोकहिताच्या दृष्टीने लिहिले त्याच बुद्धीने प्रेरित होऊन **शिवाजीमहाराजांचे चरित्र** लिहिण्याचेही त्यांच्या मनात असले पाहिजे, अशा स्वरूपाचे काही संदर्भ माहितगारांच्या बोलण्यात येतात. सरदेसाई व यदुनाथ सरकार यांच्याशी त्यांचे काही बोलणे होत असावे असे वाटते, आणि त्यांनी शिवाजीमहाराजांच्या चरित्रातील एकदोन प्रकरणे आणि त्यांच्या चरित्रातील एकदोन सहायक घटना यांबद्दल आवर्जून निबंध लिहिलेले आढळतात, त्यावरूनही तसें दिसते. आणि त्यांचा नेपोलिअनचे मोठे व सुंदर चरित्र एका दिवसात एक प्रकरण व एका वर्षात संपूर्ण चरित्र या वेगाने लिहिण्याचा झपाटा पाहिला म्हणजे त्यांना ते मुळीच अशक्य नव्हते, असे वाटते; परंतु १९१८ मध्ये धंद्यातील धनलोभ सोडून मोकळे होऊनही त्यांना ' सारस्वता ' खेरीज अन्य गोष्टींकडे लक्ष देण्याचा विचार सोडून द्यावा लागलेला असावा. १९१५ ते १९२२ च्या दरम्यान त्यांचा हा शिवाजी व मराठ्यांचा इतिहास यांतील संचार चालू होता. पण पुढे तो नाद त्यांना आवरून घ्यावा लागला असे दिसते.

५. उपलब्ध सूच्यादी साधनांवरून पंडित ढेरे यांच्या परिगणनेप्रमाणे कै. भावे

यांची ( आवृत्त्या वगळून ) पुस्तके ६, संपादने ५, ' महाराष्ट्र-कवि ' मासिकाचे खंड ४, त्यातून वा स्वतंत्र ' महाराष्ट्र काव्यग्रंथ ' १९ आणि नियतकालिकांतून व ' वारसा ' ग्रंथातून असे आजतागायत प्रकाशित लेख १७ + ५ = २२ अशा प्रकाशनाच्या ५६ नोंदी मिळतात. त्यातली पुस्तके ३, संपादने ४ आणि लेख ६ अशा १३ नोंदी ' इतिहास ' विषयक भावे यांच्या स्वतःच्या विभागणीप्रमाणे आहेत. ही विभागणी फक्त विशिष्ट सोयीसाठीच आहे. राजवाडे किंवा स्वतः भावे देखील आपले बाकीचे काम इतिहासविषयक अगर संशोधनात्मक नाही असे प्रतिपादणार नाहीत. त्यांचे अप्रकाशित ' पाखराचा परिचय ' हे पुस्तक देखील त्या प्रतिष्ठेला पात्रच मानतील. त्याचे ' फलज्योतिष ' हे धर्मजागृतीतून तीन अंकांतून केलेले पुनर्मुद्रण ( २९ पृष्ठे ) हे भाबड्या श्रद्धेचे द्योतक नसून त्यातही संशोधनाचा धागा अनुस्यूत आहे. फलज्योतिष-शास्त्र हे पूर्वीपासून भारतात माहीत होते असे या लेखात प्रतिपादिलेले आहे आणि त्या-साठी या शास्त्राचा इतिहास, त्याचे वर्णन आणि अनुषंगाने त्याचे तर्कदृष्ट्या समर्थन असा प्रपंच त्यात मांडलेला आहे.

## भाव्यांचे इतिहासविषयक प्रकाशन

( इतर तपशील ' वारसा ' मधील सूचीत पाहावा. )

| प्रकाशन साल | नाव व विषय | प्रकार |
|---|---|---|
| १९१५ | शिवाजीमहाराजांची वाघनखे व भवानी तलवार | निबंध |
| १९१७–१९३३ | चक्रवर्ति नेपोलिअन : तीन आवृत्त्या | चरित्र |
| १९१७–१९२८ | मराठी दफ्तर | |
| | १९१७ रुमाल १– भोसले बखर | बखर |
| | १९२२ रुमाल २-गोखले कैफियत | करीना |
| | छत्रपती दिनचर्या | शकावली |
| | भट पेशवे हकीकत | हकीकत |
| | कंपनी सरकार जाहीरनामा | जाहीरनामा |
| | १९२८ रुमाल ३- शिवकालीन व अली बहादरची पत्रे | पत्रे |
| १९१७ | श्रीशिवाजीमहाराजांचा होन | निबंध व दर्शन |
| | ( अज्ञानदासकृत अफजलखानाचा पोवाडा | पोवाडा ) |
| १९२१ | अफजलखानाचा वध अथवा श्रीशिवाजीमहाराजांचा पहिला पराक्रम | निबंध ( उत्सवमंडळ ) |
| १९२२ | शिवाजीची वंशकुळी | निबंध |
| १९२३ | पाहिरतेखानाची मोहीम | निबंध ( उत्सवमंडळ ) |

| | | |
|---|---|---|
| १३२३ | श्रीशिवाजीमहाराजांचे एक राजकारण | निबंध |
| १९७१ ( १९१९ व १९२४ ) | मराठ्यांच्या इतिहासाची दोन शतके | निबंध |
| १९७१ ( १९१९ ) | मराठी राज्याच्या नाशाची कारणे | निबंध |

६. प्रकाशनाच्या अनुक्रमाने कै. भाव्यांच्या इतिहासकार्याचा तक्ता[1] वरीलप्रमाणे तयार होतो. अर्थात तद्विषयक विचार, साधन संपादन आणि प्रत्यक्ष लेखन थोडे आगेमागे दोनचार वर्षांच्या फरकाने झाले असले पाहिजे हे उघड आहे. विशेषतः 'वारसा' मध्ये प्रकाशित झालेले दोन शेवटचे लेख तर ५० वर्षांपूर्वीचे हे उघड आहे. हे त्या त्या वेळी प्रकाशित झाले असते तर त्यांचा काल स्पष्ट झाला असता. थोडासा तर्कच चालवावयाचा तर 'मराठी राज्याच्या नाशाची कारणे' हा शेवटचा निबंध १९१८ त कै. न. चिं. केळकरांच्या 'मराठे व इंग्रज' हा एकाच वर्षात दोन आवृत्त्या छापावयाला लागलेल्या ग्रंथाचा म्हणजे 'मराठेशाहीचे शतसांवत्सरिक वाङ्मय-श्राद्धा'चा बोलबोला चालू असताचा असला पाहिजे. त्याच न्यायाने पाहता 'मराठ्यांच्या इतिहासाची दोन शतके' हा निबंध 'महाराष्ट्र सारस्वता' च्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या ( १९१९, १९२४ ) आवृत्तीला ऐतिहासिक पार्श्वभूमीदाखल जोडण्याच्या, निदान तत्संबंधी संकलित विचार मांडण्याच्या, काही योजनेतून आविर्भूत झालेला असावा असे अनुमान काढणे फारसे चुकू नये. तशा कल्पनेने प्रस्तुत तक्त्यात वर तर्किलेले सन १९७१ या सालाबरोबरच कंसात दाखविण्यात आले आहेत.

७. एकंदर मराठेशाहीचा साकल्याने परामर्श घेणाऱ्या या दोन नोंदींशिवाय राहिलेल्या अकरा नोंदींपैकी प्रत्यक्ष शिवाजीबद्दल निबंधवजा ६, मराठशाहीवरील संकीर्ण साधनांच्या स्वरूपाच्या ४ व युरोपच्या इतिहासातील महापुरुष नेपोलिअन याच्या नामांकित चरित्रग्रंथाच्या स्वरूपाची १ आहे. हे सारे इतिहासविषयक कार्य १९१५ ते १९२२ च्या दरम्यान झाले. तत्पूर्वी बहुतेक सारे संशोधन साहित्यविषयक झाले. युरोपातील पहिल्या महायुद्धाच्या भडक्यामुळे ( बहुधा ) युरोपातील महापुरुष नेपोलिअन याबद्दलच्या भाव्यांच्या आधीच्याच आवडीच्या अभ्यासाने जसे मित्राच्या आग्रहाखातर ग्रंथरूप घेतले, तसाच काहीसा प्रकार नेपोलिअनशी वारंवार तुलना केल्या गेलेल्या स्वकीय छत्रपती शिवाजीमहाराजांच्या चरित्राच्या ओढीमुळे तद्विषयक अभ्यासाबद्दल आस्था वाढण्यात झालेला असावा. नेपोलिअन-चरित्राची सामग्री विपुल होती. शिवाजीमहाराजांच्या चरित्राला साधनांचीच अडचण होती. म्हणून नेपोलिअनचे चरित्र एकजिनसी निर्माण झाले; पण भाषाप्रभु भाव्यांना शिवचरित्रावर प्रकरणशः निबंध रचून व कणशः साधनसामग्री जमवूनच इतर समानशील पद्यात्र्यांच्या

टीप १ : याशिवाय सहविचारात ( मे १९२४ ) 'एक ऐतिहासिक पत्र' प्रसिद्ध झालेले आढळते. इतरही अन्यत्र असण्याचा संभव आहे.

वारीत सामील व्हावे लागले. ही परिस्थिती अजून १९७०-७१ मध्येही बहुधा तशीच आहे हे जाणत्यांना माहीत आहे.

८. म्हणून शिवाजीमहाराजांबद्दलचे भाव्यांचे पहिले टिपण 'शिवाजीमहाराजांची वाघनखे व भवानी तलवार' हे सदर गोष्टी लंडनच्या ब्रिटिश म्युझिअममध्ये आहेत असा लोकभ्रम होता तो खोटा आहे, हे सप्रमाण सिद्ध करण्यासाठी लंडनच्या म्युझिअमच्या रेकॉर्डकीपरचे त्यांना आलेले २४ मार्च १९१५ चे पत्र जिज्ञासूंना माहीत करून देण्यासाठीच आहे. ब्रिटिश म्युझिअममध्ये तलवार नाहीच, आणि जे वाघनख आहे, त्यावरची माहितीची चिठो (लेबल) 'शिवाजीने वापरलेल्यासारखे वाघनख' अशीच आहे, हे त्या पत्रात स्पष्ट केलेले आहे.

९. शिवाजीच्या वाघनखाप्रमाणे राज्याभिषेकसमयी शिवाजीने चालू केलेल्या शिवराई होनाबद्दल तशीच शहानिशा करण्याचा उद्योग महाराष्ट्रीयांना जिव्हाळ्याचा वाटतो. १९१७ साली शिवाजीचा म्हणून त्यांना वाटणारा होन त्यांनी भा. इ. सं. मंडळात पुढे मांडला होता. परंतु तो शिवाजीचा खरा होन नव्हता. विजयनगरच्या प्रथेपैकी 'देवराय' वा 'देवराजा' याचा होता. तसे प्रमाणासह पुढे चौदा वर्षांनंतर श्री. दि. वि. काळे यांनी १९३१ साली उत्कृष्ट छायाचित्रे दाखवून मंडळाच्या एकोणिसाव्या संमेलनात प्रतिपादिले व खरा होनही दाखविला. संशोधनाच्या क्षेत्रात अशा गोष्टी घडतातच; परंतु या संबंधातील भाव्यांची भूमिका मुळातच आग्रहाची नव्हती, प्रांजल संशोधकाची होती, हे आवर्जून ध्यानात घेतले पाहिजे. विशेषतः इतर तशाच शास्त्रोक्त वास्तव विधानांबरोबरच 'विजयनगरचा सदाशिवराय याने पाडलेला होन अगदी असाच होता' या प्रांजल विधानाने त्यांनी तो होन सदाशिवरायाचाच होता हे सिद्ध ठरण्याचा मार्ग मोकळा ठेवला होता, हे इतर कोणाच्या अत्याग्रहाच्या तुलनेने कौतुकास्पद ठरवावे लागेल.

१०. अफजलखानाचा वध (१९२१) व शाहिस्तेखानाची मोहीम (१९२३) हे त्यांचे दोन शिवचरित्रातील दोन प्रकरणेच सजविणारे निबंध पुण्याच्या भारत स्वयंसेवक मंडळामार्फत साजऱ्या होणाऱ्या शिवाजी उत्सवात वाचले गेले व त्याच मंडळाने स्वतंत्र पुस्तिकारुपाने छापले. त्याच सुमारास त्यांनी अज्ञानदासाचा अफजल पोवाडा संपादित केला असावा. त्या वेळच्या शिवचरित्रसंशोधनाच्या म्हणजे ५० वर्षांपूर्वीच्या साहजिक पडलेल्या मर्यादांमुळे त्यात काही वैगुण्ये दिसतात. पण त्याही काळात त्यांची नेहमीची चौफेर वस्तुनिष्ठ चौकस दृष्टी प्रत्ययास येते. महाराजांनी लढविलेल्या पाचपेचांची छाननी करून महाराजांचे हातात अफजल प्रसंगात वाघनख नसावे, असा त्यांनी काढलेला निष्कर्ष आणि शाहिस्तेखानावरील लाल महालातील हल्ल्यासाठी महाराज लग्नाच्या वरातीबरोबर शिरले हे ग्रँट डफने काफीखानावर विसंबून केलेले

विधान, चैत्रात लग्ने होत नाहीत म्हणून, साफ खोटे आहे, असा काढलेला निष्कर्ष त्यांच्या सूक्ष्म बुद्धीची खात्री पटवून देणारा वाटतो.

११. अफजल प्रसंगावरील एका आल्यतेखोर ब्रिटिश विद्वानाचे एरवी क्षुद्र नगण्य असलेले विधान या निमित्ताने भाव्यांनी उद्धृत केले आहे. ते तसे उपेक्षणीयच असले तरी करमणूक करणारे आहे, आणि भाव्यांची त्यावरील प्रतिक्रिया त्यांनी नोंदून ठेवलेली असल्यामुळे तेवढ्यामुळे पाहण्यासारखे आहे. डॉ. सेन यांच्या सभासदी बखरीच्या इंग्रजी भाषांतरावर ब्रिटिश रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जुलै १९२१ च्या जर्नलमध्ये वेव्हरिज यांनी अभिप्राय दिला आहे ! त्यात ते म्हणतात — " शिवाजीची आवडती देवी भवानी – म्हणजे ठगांची देवता... ती म्हणे खुनाच्या आदल्या दिवशी स्वप्नात आली आणि पाठीशी राहण्याचे तिने वचन दिले. यदुनाथ सरकार देखील शिवाजीची बाजू घेऊन अफजलाने प्रथम मारा केला व शिवाजी आत्मरक्षणार्थ लढला असे म्हणतात – पण हे खोटे. फक्त दोघेच होते, तेव्हा पुरावा कुठे आहे ? " अफजल हल्ला करील हे असंभाव्य ठरविताना ते पुढे लिहितात, " He was an elderly man and so feeble that he had to move about in a litter. There is no reason to suppose that Afzal was accompanied by 12000 cavalry. " हे इतिहासावर अभिप्राय द्यायला सज्ज झालेले तथकथित तज्ज्ञ ! भावे यावर म्हणतात, " महाराष्ट्राच्या मुलांना वाचण्याकरिता महाराष्ट्रीयांनीच अंग मोडून इतिहास लिहिला पाहिजे." यातील प्रत्येक शब्द भाव्यांच्या मनातील इतिहासाच्या प्रमुख कार्यप्रयोजनावर पुरेसा प्रकाश पाडतो असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

१२. 'श्रीशिवाजीमहाराजांचे एक राजकारण' या लेखांत शिवाजीमहाराजांनी आरंभीच ( १६४७ ) पुरंदर किल्ला चलाखी करून स्वराज्याचे लगामी लावला ते कारस्थान जेथल्या तेथे विविध कागदपत्रांचे आधार देऊन विस्ताराने मांडले आहे. ही हकीकत पन्हाळ्याचा वेढा ( १६६० ) व उंबर खिंडीतली मोंगलांची कोंडी (१६६१) येथपर्यंत आणून पुढे " षाहिस्तेखान हा वरून यापूर्वी कसा आला व पुण्याला येऊन बसल्यावर पुढे त्याचा घास शिवाजीने कसा केला, हा प्रकार पुढे एखादे वेळी आपण जरा सावकाशीने पाहू " असे शेवटी आश्वासन दिले आहे. याचा अर्थ त्या वेळी तेच विचार व तोच विषय भाव्यांच्या मनात घोळत होता, यात शंका नाही.

१३. 'शिवाजीची वंशकुळी' हाही शिवचरित्रातील एक चर्चाग्रस्त विषय होता. त्याबद्दलच्या चित्रमयजगतातील जुलै १९२२ च्या लेखात त्यांनी साधकबाधक विचार करून निर्णय केला आहे की, मत्सरग्रस्तांनी, शत्रूंनी किंवा उत्साही चहात्यांनी ( शिसोदे रजपूत इ. ) सुचविलेल्या कल्पना चारगट किंवा अतिरंजित आहेत. शेवटी दोन ओळींचा त्यांचा परिच्छेद असा — " सिद्धान्त — श्रीशिवाजी महाराज भोसले हे अस्सल क्षत्रिय होते, व सर्व महाराष्ट्र त्यांस तसेच मानी; व आजही मानतो. " असा

वस्तुनिष्ठ निर्लेप दृष्टिकोण संशोधनात किती मोलाचा असतो, हे सुज्ञांस सांगणे नलगे.

१४. भाव्यांनी 'मराठी दफ्तर' या साधनग्रंथमालेतील फक्त पहिले दोन रुमाल संपादित केले. त्यातील पहिल्यामध्ये फक्त एक भोसल्यांची (छत्रपती शिवाजीचा वंश) बखर आहे व दुसऱ्यामध्ये गोखले कैफियत, भट पेशवे घराणे यांची संकलित हकीकत, छत्रपती प्रतापसिंह यांची श. १७३९ (इ. १८१८) तील दिनचर्या टिप्पणी आणि चार पृष्ठांचा कंपनी सरकारचा मराठी राज्य खालसा झाल्यावेळचा नमुनेदार जाहीरनामा, अशी काहीशी संमिश्र दर्जाची सामग्री आहे. या स्फुट सामग्रीवर टीपा वगैरे देऊन विशेष संपादनाचा प्रयत्न भाव्यांनी साहजिकच केलेला नाही. परंतु प्रास्ताविकाच्या वगैरे अनुषंगाने त्यांचे संशोधनविषयक काही विचार त्यांच्या विशिष्ट पद्धतीने प्रकट झालेले आढळतात.

१५. कागदपत्रांचे संशोधन एकट्याच्या बळावर होते. परंतु ते छापण्याला संस्थेचे बळ लागते. म्हणून त्यांनी स्नेह्यांच्या सहकार्याने 'मराठी दफ्तर संस्था' स्थापन केली. दरसाल ५०० पृष्ठे छापण्याचा संकल्प केला. लागोपाठ तीन वर्षे प्रकाशन थांबले किंवा एकंदर पाच वर्षे खळ पडला, तर संस्था बुडाली असे समजावे असे प्रथमच ठरवले. कागदपत्र जसेच्या तसे 'बेरीज, वजावाकी, दुरुस्ती न करता छापायचे' ठरवले. आणि पहिल्या रुमालाला तीन आणि दुसऱ्याला दोन परीक्षकांची 'छापील प्रत अस्सल बरहुकूम असल्याचे दाखला किंवा सविस्तर साक्षीपत्रे जोडली.' यात २ प्रसिद्ध वकील, १ सब्रजिस्ट्रार, १ ग्रंथकार आणि १ संपादक यांनी त्यांचा शब्द मानून तेवढा वेळ व परिश्रम इतिहासाला दिला, ही गोष्ट आजच्या सुशिक्षितांना मार्गदर्शक वाटावी.

१६. याच उद्योगातील साधनग्रंथांच्या प्रस्तावना आणि टीपा या बाबतीतील त्यांची घोषणा राजवाड्यांच्या खंडांच्या प्रचंड प्रस्तावना आणि असंख्य टीपा यांवर सरळ सरळ नाराजी व्यक्त करणाऱ्या समजल्या पाहिजेत. आपल्या ग्रंथांच्या प्रस्तावनेचा विस्तार ग्रंथाच्या एकपंचविशांशापेक्षा जास्त ठेवावयाचा नाही आणि टीपा पृष्ठाला एक ओळ या प्रमाणातच मर्यादित ठेवावयाच्या, असा निर्धार त्यांनी 'मराठी दफ्तर' संस्थेची माहिती देताना व्यक्त केलेला आहे. मात्र पुढच्या रुमालात त्यांनीच तो मोडला आहे आणि पाच वर्षांनंतरच्या दुसऱ्या रुमालाची प्रस्तावना गणिताने सहा पृष्ठे व्हावी ती भली मोठी सत्तावीस पृष्ठांची झाली आहे! परंतु त्याला भाव्यांचे समर्थन "पाच वर्षांत संस्थेचे प्रकाशन न झाल्यामुळे 'मराठी दफ्तर' ही संस्था बुडाली, असे झाले," आणि म्हणून पूर्वीचे नियम बाद झाले असेच असले पाहिजे. कारण त्या प्रास्ताविकात "आपल्या पूर्वजांचे पराक्रम ऐकण्याची हौस महाराष्ट्राला थोडीफार आहे;पण त्यासाठी काही द्रव्य खर्चावे व पदराला चट्टा लावून घ्यावा,ही इच्छा महाराष्ट्राची दिसत नाही," अशी राजवाड्यांनी केलेल्या स्वरूपाची तक्रार मांडली आहे.

राजवाड्यांना अन्य संदर्भात ' माझे मित्र ' असेच ते संबोधताना दिसतात. यामुळे त्यांच्याबद्दल आदरबुद्धी असूनही इतर आधुनिकांत रूढ झालेली राजवाड्यांबद्दलची गुरुवर्य भावना त्यांच्यामध्ये असल्याचे भासत नाही. कै. भाव्यांच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाला हे साजेसेच आहे. आपल्या पहिल्या महाराष्ट्र-सारस्वताच्या संशोधनाच्या माहितीमुळे राजवाडे ' काव्यग्रंथाच्या संशोधनाकडे वळले ' हे त्यांनी अन्य ठिकाणी राजवाड्यांच्या एतद्विषयक उद्योगाचे एक प्रेरक कारण म्हणून सांगितले आहे, हे जाणत्यांच्या नजरेतून सुटलेले नसेल ('तुकारामबुवांचा अस्सल गाथा,' प्रस्तावना पृष्ठ १६ ). राजवाड्यांच्या व इतरांच्या मताने वाङ्मयार्थ संशोधन हे इतिहासकार्यच होय. महाराष्ट्रात तरी वाङ्मय आणि इतिहास हे जोडीनेच नियतकालिकात (' काव्येतिहाससंग्रह ' १८७८ ) आणि संस्थाक्षेत्रात ( भा. इ. सं. मंडळ १९१० ) अवतरले. त्या दृष्टीने पाहता ' तुकारामबुवांचा अस्सल गाथा ' ( १९१९ ) हाही त्यात वापरलेल्या त्यांच्या इतर वाङ्मयीन प्रकाशनाप्रमाणेच काटेकोर वस्तुनिष्ठपद्धतीमुळे इतिहासकार्यातच जमा धरला पाहिजे. विशेषतः जनतेची श्रद्धा आणि तुकोबांचे संताळे यांबद्दल संशय मनात प्रबळ असल्याचे स्वच्छ कथन करून देखील ( प्रस्तावना पृष्ठ २०–२२ ) १० मुद्रितप्रतींची परीक्षा, संहितानिश्चिती, लिपिशुद्धीबद्दल व समकालीन लेखनसरणीबद्दल समर्पक विवेचनोत्तर तद्विषयक यथार्थतेसाठी घेतलेली काळजी, इत्यादी संशोधकी अलिप्ततेची चिन्हे नजरेत भरल्याशिवाय राहात नाहीत.

१७. भाव्यांचे सर्वच कार्य सकस आणि समृद्ध आहे. त्यांनी ' महाराष्ट्र सारस्वता'ची केलेली असामान्य सेवा पाहिली असता महाराष्ट्रेतिहासाचे मुनिचतुष्टय म्हणून गौरविलेल्या साने, पारसनीस, खरे, राजवाडे यांच्या पंचायतनात बसण्याची त्यांची पात्रता निःसंशय आहे यात शंका नाही. राजवाड्यांच्या प्रचंड प्रतिभेचा एकमेव अपवाद वगळता, राजवाड्यांच्या उत्तुंग सिद्धान्तनाची इतरांच्याही आवाक्याबाहेरची बाब वगळता, भाव्यांना ह्या उच्चस्थानाचा मान देण्याला कोणताही प्रत्यवाय आहे असे म्हणता येणार नाही.

१८. पण या संशोधनकार्याशिवाय आणखीही एक महत्त्वाच्या इतिहासकार्यामुळे कित्येक वर्षे भाव्यांचे अग्रस्थान महाराष्ट्रीय ग्रंथकारांमध्ये आणि मराठीच्या वाचकवर्गामध्ये बरेचसे मान्य केले गेलें. ' चक्रवर्ति नेपोलिअन 'बद्दल अमाप साधनग्रंथ व सिद्धग्रंथ उपलब्ध आहेत. यामुळे ह्या चरित्रलेखनाची बाब ही रूढ अर्थाने संशोधनाची नसली तथापि भाव्यांचा नेपोलिअन हा अन्य कोणत्याही पुस्तकाचे भाषांतर वा रूपांतर नसून तो भाव्यांच्या संस्कारित अंतर्दृष्टीने, स्वकीयांच्या उद्धाराची एकमेव दृष्टी स्थिर ठेवून पुनरुज्जीवित केलेला विश्वप्रतीकात्मक महापुरुष आहे. ' केवळ मजकुराच्या मगदुरामुळे पुस्तक लोकांनी वाचले पाहिजे ' अशी प्रतिज्ञा करून लेखनाला प्रवृत्त झालेल्या भाव्यांनी प्रयत्न केला तो " साधारणपणे बहुश्रुत ब्राह्मणवस्तीच्या खेड्यात

मंडळींना व मुलांना करमणूक व्हावी, हातातले काम हलके वाटावे, म्हणून ही गोष्ट सांगण्याचा." पण सत्याचा मुळी देखील अपलाप न करता. भारत गौरव ग्रंथमालेची पुष्पे म्हणून त्रिखंड दुसरी आवृत्ती काढताना भाव्यांनी आपल्या चरित्रनायकाबद्दल आपले म्हणणे अधिक विस्ताराने वाचकांसाठी नोंदविले आहे :— 'मनुष्याच्या कायेमधील परमेश्वराचा' हा नेपोलिअनचा अवतार त्याच्या अचाट कर्तृत्वाप्रमाणेच अचाट गुणदोषांनी भरलेला आहे. शिवाजीमहाराजांशी तुलना करून नेपोलिअनची दानत निकृष्ट होती हे त्यांनी दाखविले आहे. परंतु विश्वबंधुत्वाच्या कल्पनेने पाहिले असता त्याची राजपुरुष, योद्धा, नेता, विधिज्ञ, प्रशासक, राष्ट्रधुरीण म्हणून प्रचंड भव्य अशी जी मानसमूर्ती प्रगट होते तिचे आवाहन स्वीकारा असे भाव्यांचे प्रतिपादन आहे. नेपोलिअनच्या मयंतीच्या शतसंवत्सरीच्या प्रसंगी (१९२१) ही आवृत्ती काढलेली असल्यामुळे मध्यंतरीच्या १०० वर्षांचा फ्रान्सचा इतिहास आणि मराठ्यांचे जवळ जवळ त्याच वेळी गेलेल्या स्वराज्यानंतरच्या शंभर वर्षांचा इतिहास यांची तुलना करून आपल्या नाकर्तेपणाबद्दल खंत व्यक्त करण्याची ही संधी भाव्यांनी घेतली आहे. मराठ्यांचे राज्य बाजीरावाने घालविले अशा प्रवादाला उत्तरादाखल म्हणून एक बाजीराव नादान निघाला तर इतर प्रधान, खुद्द छत्रपती यांनी तरी राज्य राखण्याचे कोणते प्रयत्न केले, असा प्रतिप्रश्न उपस्थित केला आहे. शासनाची गोष्ट सोडा, इतर व्यापार, कारागिरी, वाङ्मय, काव्य इत्यादी स्वराज्याची इतर अंगे तरी समृद्ध करायला कोणी पुढे सरसावले आहेत काय ? नुसते कोणाच्या नावाने खडे फोडीत बसण्यात काय अर्थ आहे ? गेल्या १०० वर्षांत व्यक्तीचे प्राधान्य लयाला गेले आहे. राष्ट्रीय दृष्टी ठेवून प्रत्येकाने आपली जबाबदारी ओळखून आपआपले कर्तव्य पार पाडले पाहिजे, असा आपल्या चरित्रापासून घेण्यासारखा बोध म्हणून त्यांनी कळकळीने पुढे ठेविला आहे.

१९. भाव्यांच्या इतिहासकार्यांचा व संशोधनाचा व्याप त्यांच्या प्रत्यक्ष प्रकाशनांच्यापेक्षा बराच मोठा आहे. हे वर जो त्रोटक धावता आढावा घेतला आहे, त्यावरून कोणाच्याही ध्यानात येण्यासारखे आहे. प्रत्यक्ष संशोधनकार्यावेगळे, त्याचे कोंदण म्हणून, त्यांची शुद्ध मराठी भाषा, वर्णनशैली, प्रतिपादनपद्धती, स्पष्टवक्तेपणा, विनोदसंस्कारित मिष्किलपणा इत्यादी अनेक गोष्टी त्यांच्या ग्रंथरचनेच्या प्रगल्भपणाचे साथीदार म्हणून नजरेसमोर आणल्या पाहिजेत. तसे तपशिलाने करण्याला अवसर नाही. म्हणून फक्त एकच बाब येथे नमूद करून ठेवतो ती त्यांच्या नेपोलिअनचरित्राच्या फलश्रुतीची.

२०. एका बाजूला 'शिवाजीमहाराजांच्या निधनानंतर औरंगजेबाने महाराष्ट्र बंड करून गड किल्ले घेतले' असे जाज्वल्य अभिमानाने बोलणारे भावे (सद्विचार मे १९२४) 'पशूंना आणि दगडांना देव मानणारे भाविक भिक्षुक' अशी भाविक

खुळचटांची त्याच लेखणीने संभावना करतात. आणि तरीही या भाविक तंत्रांचा मोठ्या योजकतेने त्यांनी आपल्या नेपोलिअन चरित्राची परिणामकारिता वाढविण्यासाठी उपयोग केलेला पाहून कौतुक वाटते. अभ्यासकांना सभासदविरचित श्रीशिवछत्रपतींचे चरित्र परिचित आहे. त्याला शेवटी सात ओळींची रूढ भाउकतेची फलश्रुती जोडलेली पाहून कोणालाही हसू आल्याशिवाय राहणार नाही. फलश्रुती म्हणते, "चरित्र पुण्यश्लोक राजियाचे जे घरी लिहून ठेवतील त्यांच्या भाग्यास पारावार नाही. जे वाचतील त्यांस मोठे पुण्य जोडेल." येथपर्यंत फार तर ठीक. पण पुढे म्हणते, "निपुत्रिकांस पुत्र होईल. दरिद्री लक्ष्मीवंत होतील...... यशस्वी असतील ते दिग्विजयी होतील. येणेप्रमाणे सर्व मनोरथ पूर्ण होतील. बरे समजणे." भाव्यांनी आपल्या प्रथमावृत्तीला तब्बल दोन पानांची ६० ओळीची फलश्रुती तशा मथळा छापून दिली आहे ! व ती तशीच पुढच्या अवतारात कायम ठेविली आहे. भाव्यांच्या प्रत्ययकारी शैलीतील प्रस्तुत समारोप अथपासून इतीपर्यंत वाचून मनन करण्यासारख्या आहे. विशेषतः त्यातील कृत्रिम गंभीरपणाच्या वातावरणातील विडंबनाच्या खळखळाटाबरोबरच आपल्या देशातील अभागी, दरिद्री आणि नालायक जंतूंच्या क्षुद्रपणावर विदारक प्रकाश पाडणारी ध्वनित टीका वाचून उदास न होणारा वाचक विरळा. सर्वच प्रस्तावना उतरून घेणे येथे अशक्यच. तथापि हे संकीर्ण अवतरण पाहा : "चरित्राच्या वाचनाने अचेतनांस चेतना येईल... वेदान्त्यांचा वेदान्त आणि वारकऱ्यांच्या माळा, की, ज्यांनी आपल्या या देशास आज अनेक शतके घेरून टाकले आहे, त्यांचा जोर कमी पडेल... मन अपमानापेक्षा मारणास लवकर तयार होईल... नीचांना मान देण्यास मनाला खंती वाटेल, आणि त्यांचे दर्शनही कष्टप्रद वाटेल... आपल्या लोकांविषयी प्रीती उत्पन्न होईल, व आपल्या देशाविषयी हळहळ वाटेल." विद्वान स्वदेशबांधवांच्या मराठी पुस्तकाच्या वाचनपराङ्मुखतेवरील त्याच पुस्तकाच्या प्रस्तावनेतील मिष्किल कोरडा झणझणल्याशिवाय राहणार नाही. "या पुस्तकाला काही वाचक भेटतील... ज्यांना इंग्रजी विद्येचे ज्ञान नाही अशांना यात काही सापडेल. आणि असेही काही न सापडले तरी, आपले मराठीत येवढा मोठा चरित्रग्रंथ लिहिण्याचे धाडस मी केले... याचे त्यांना कौतुकच वाटेल. आणि याची प्रत विकत घेण्याचा कोणास आग्रह केला नाही, तर बहुतेक सर्व लोक या पुस्तकास 'बरे आहे' असेच म्हणतील."

२१. अनेक दृष्टींनी पट्टीचा आणि चतुरस्र म्हणता येईल अशा या संशोधकाचे विस्मरण अभ्यासकांना होणेच शक्य नाही. ५० वर्षे होऊन गेली तरी देखील निदान 'महाराष्ट्र सारस्वता'च्या स्वरूपात त्याचे दर्शन आजपर्यंत अपरिहार्य राहिले आहे. जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या विविध कार्यांचा आढावा कृतज्ञ महाराष्ट्र घेत आहे, ही गोष्ट महाराष्ट्राला केव्हाही उपकारकच ठरेल.

*

# युध्द थांबले संपले नाही

युद्धकाळात रक्त कमी सांडावे म्हणून शांततेच्या काळात अधिक घाम गाळणे आवश्यक आहे. आपल्या बहादूर जवानांनी युद्धकाळात अलौकिक पराक्रम गाजवून आपल्या रक्ताने नवा इतिहास लिहिला आहे. शांततेच्या काळात जास्तीत जास्त घाम गाळून देश अधिक समर्थ, समृध्द व बलवान बनविण्यासाठी आपण सारे कटिबद्ध होऊ या.

या प्रजासत्ताक दिनाची

## आमची प्रतिज्ञा

- जवानांसाठी रक्तदान करू व मृत आणि अपंग जवानांच्या कुटुंबियांना मदत करू.
- संरक्षण निधीला देणग्या देऊ.
- महाराष्ट्राकडून अल्पबचतीत नेहमीच्या उद्दिष्टापेक्षा आणखी किमान २५ कोटी रुपये गुंतविण्याचे लक्ष्य आम्ही अल्पकाळात पूर्ण करू.
- शेतातील आणि कारखान्यातील उत्पादन सारखे वाढते ठेवू.
- भाववाढ होऊ देणार नाही.
- वंश, धर्म, जात वा भाषा याचा विचार मनात न आणता भारतीयांची एकता वृध्दिंगत करू.
- सर्व बाबतीत स्वयंपूर्ण होण्याचा जिद्दीने प्रयत्न करू. दुसऱ्या कुणाच्याही मदतीवर अवलंबून राहणार नाही.
- संरक्षण आघाडीवरील सर्व प्रयत्न जोमाने चालू ठेवू.
- गरिबी नष्ट करून देश समृध्द व बलशाली करण्यासाठी सर्वंकष प्रयत्न करू.
- आम्ही आमचे काम निष्ठेने, चिकाटीने आणि वेगाने करू.



प्रसिध्दी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई

# भाषाशास्त्राची वाटचाल

❧

म. अ. मेहेन्दळे

## ( १ )

भाषाशास्त्राचा इतिहास एका दृष्टीने फार जुना आणि दुसऱ्या दृष्टीने बराच अलीकडला म्हणजे सुमारे दोनशे वर्षांतला आहे. तो फार प्राचीन म्हणण्याचे कारण असे की, ह्या शास्त्राचा उदय भारतात फार पूर्वीच इसवी सनापूर्वी सात-आठशे वर्षे झाला आणि हजार-बाराशे वर्षे चालू राहिला. ह्या शास्त्राची सुरुवात भारतात वैदिक वाङ्मय नीट टिकविणाच्या आणि त्याच्या अर्थाचा विचार करण्याच्या दृष्टीने झाली. म्हणून शिक्षा (किंवा प्रातिशाख्ये), निरुक्त, व्याकरण ह्या शास्त्रांना वेदांगे म्हणून संबोधण्यात येते. कालांतराने विद्वानांचे लक्ष वैदिक भाषेबरोबरच त्या काळी सुशिक्षितांची बोलण्यातली जी शिष्ट भाषा होती, तिच्याकडे वळले आणि त्या भाषेतल्या ध्वनींचा, शब्दांचा विश्लेषणात्मक अभ्यास होऊ लागला. संस्कृत भाषेत वापरण्यात येणारी रूपे पुष्कळशी त्यांच्या घटकांच्या दृष्टीने पाहता पारदर्शक असल्यामुळे त्या भाषेच्या शब्दांचा अभ्यास होण्यास फार मदत झाली. भाषेतील शक्य तितक्या शब्दांचे घटक शोधावेत आणि त्यापासून निरनिराळी रूपे क्रमशः कशी बनतात ती प्रक्रिया स्पष्ट करावी ह्या बुद्धीने जो अभ्यास सुरू झाला त्याची परिणती पाणिनीच्या अष्टाध्यायीत झाली. साहजिकच ह्या ग्रंथात संस्कृतच्या उच्चारांचा विचार नाही, वाक्यरचनेचाही फारसा नाही. शब्दानुशासन मात्र त्यात फार उत्तम असून ते ज्या सूत्र पद्धतीने मांडण्यात आले आहे त्याचा विचार केला की अचंबा वाटल्यावाचून राहात नाही. भाषेचे कुठल्याही प्रकारचे विश्लेषण होण्यापूर्वीच्या अवस्थेत ती ' अव्याकृता वाक् ' असल्याचे म्हणत. तिचे विश्लेषण होऊन तिचे निरनिराळ्या स्तरावर घटक दाखवण्यात येऊ लागले की ती व्याकृत होऊ लागते, तिचे व्याकरण सुरू होते. उदाहरणार्थ ऋग्वेदातील 'अग्निमीळे-पुरोहितम्' ह्या संहितारूप वाक्यांशाचे प्रथम अग्निम्, ईळे आणि पुरोहितम् असे तीन

पदांत पृथक्करण करणे शक्य झाले. त्यानंतर पुरोहितम् ह्या सामासिक रूपाचे पुरः आणि हितम् असे दोन भाग त्यामध्ये अवग्रह ठेवून दाखवता आले. पदपाठ म्हणताना अग्निम् आणि ईळे ह्या दोन पदांत जेवढा वेळ घ्यायचा त्यापेक्षा किंचित कमी अवग्रहाने सुट्या केलेल्या पदाच्या दोन विभागांत दाखविला जात असावा. ह्या पदांचेही पुढे अग्नि हे नाम आणि म् हा प्रत्यय, ईड् हा धातु आणि ए हा प्रत्यय असे घटक दाखविले गेले. हित ह्या धातुसाधित विशेषणात धा हा धातू आणि त हा प्रत्यय असल्याचे ओळखण्यात आले. ह्यापेक्षा जास्त विश्लेषण करता येईल असे वाटले नाही. म्हणजे अग्नि आणि पुरः ह्यामध्येही एखादा धातु आणि प्रत्यय आहे असे सांगितले नाही. भाषेतील सर्वच नामे क्रियापदापासून झाली असल्याचे निरुक्तशास्त्राने मानून त्याने अग्नि शब्दाचेही विश्लेषण करण्याचा प्रयत्न केला. परंतु ह्या प्रक्रियेत गृहीत धरावी लागणारी ध्वनिपरिवर्तने त्यासारखी इतर उदाहरणे देऊन सिद्ध करता येण्यासारखी नसल्यामुळे ह्या प्रक्रिया वैयाकरणांना मान्य झाल्या नाहीत.

व्याकरणशास्त्राला मान्य असणाऱ्या प्रक्रियेच्या साहाय्याने भाषेतील जितक्या शब्दांची रचना स्पष्ट करून दाखवणे शक्य होते ते केल्यावर त्यानंतरच्या काळात झालेले वार्तिककार कात्यायन आणि महाभाष्यकार पतंजली या दोघांनी पाणिनीच्या सूत्रांच्या इष्टानिष्टतेविषयी चर्चा केली आणि पाणिनीनंतरच्या काळात संस्कृतात जे फेरबदल घडून आले त्यांची दखल घेतली. बोलभाषेतील शब्दांचे अनुशासन करण्याचे कार्य त्यांच्यानंतर लोप पावले. ह्याला अनेक कारणे असू शकतील. एक मुख्य कारण असे असू शकेल की, दिवसानुदिवस संस्कृतचा उपयोग दैनंदिन जीवनाची भाषा म्हणून कमी होत चालला. तिची जागा वाढत्या प्रमाणात प्रथम प्राकृत व नंतर तद्भव भाषांनी घेतली. संस्कृत ही एक ग्रांथिक भाषा, शास्त्रीय चर्चेची भाषा म्हणून तिचा उपयोग शिल्लक राहिला. त्यामुळे एखाद्या बोलभाषेत जसे कालांतराने काही फेरबदल अपरिहार्यपणे घडून येतात तसे ते तिच्यात झाले नाहीत, आणि ते झाले नाहीत म्हणून त्यांची दखल घेण्याचे प्रयोजनही उरले नाही. दुसरे असे की संस्कृत ही बोलभाषा म्हणून-म्हणजे आईवडिलांच्या आणि इतर मुलांच्या तोंडचे ऐकून मुलाने शिकावयाची भाषा ह्या दृष्टीने लोप पावत असली तरी देवभाषा म्हणून मोठी मान्यता पावली होती. ती वेदांची भाषा होती, धार्मिक आचार-विचारांची भाषा होती, शास्त्रीय अध्ययन-अध्यापनाची, चर्चेची भाषा होती. त्यामुळे अशा मातबर भाषेपुढे रोजच्या व्यवहाराच्या ज्या भाषा होत्या, ज्या भाषा लहान मुले आजच्या आपल्या मराठी भाषेसारख्या सहजपणे शिकत होती, त्या भाषांच्याकडे शास्त्रीय दृष्टीने पाहण्याच्या बाबतीत दुर्लक्ष झाले. त्यामुळे संस्कृतसारखेच त्यांच्या ध्वनींचे, शब्दांचे शास्त्रीय वर्णन व्हायला हवे होते ते झाले नाही. ह्या काळात जे व्याकरणकार्य झाले त्याची दिशा निराळी होती. अर्थबोध होण्याच्या दृष्टीने वाक्य व शब्द ह्यांचे संबंध काय, शब्द व अर्थ यांचे संबंध

काय, शब्दशक्ती किती मानाव्यात, एक ( अभिधा ), दोन ( अभिधा व लक्षणा ), की तीन ( अभिधा, लक्षणा व व्यंजना ) अशा विषयांचा ऊहापोह करण्यात किंवा मुनित्रयांच्या ग्रंथांची चिकित्सा करण्यात व्याकरणशास्त्र गुंतून राहिले. बोलभाषेकडे भाषा म्हणून पाहण्याचे अवधान सुटले. घराण्यात एखादा फार मोठा कर्ता पुरुष होऊन गेल्यावर त्या घराण्यातल्या नंतरच्या लोकांकडे दुर्लक्ष व्हावे तसे काहीसे घडले. जे आपल्या देशात घडले तेच इतरत्रही घडले. असे म्हणतात की ग्रीस देशात प्राचीन ग्रीकच्या एका प्रकांड पंडिताला कुणी अर्वाचीन ग्रीकविषयी विचारले असता त्याने असल्या तुच्छ भाषेचा अभ्यास करणे योग्य नसल्याचे सांगितले. त्यासाठी त्याने जे कारण दिले त्याचे आपल्याकडील संदर्भात रूपांतर करून द्यायचे म्हटले तर असे म्हणता येईल : एका मराठी भाषिक संस्कृत वैयाकरणाला कोणी मराठीविषयी प्रश्न विचारला असता तो म्हणाला, " संस्कृतात जसे ' गृहं गच्छामि ' ह्या वाक्यात ( किंवा ' गृहाय गच्छामि ' ह्या वाक्यात ) गत्यर्थक क्रियापदाचा उपयोग द्वितीयान्त नामाशी ( किंवा चतुर्थ्यन्त नामाशी ) करतात त्याप्रमाणे न करता ' मी घरी जातो ' असा सप्तम्यन्त नामाशी उपयोग करणाऱ्या भाषेचा विचार करण्यास मला मुळीच सवड नाही. "

( २ )

भारतात जेव्हा ध्वनिशास्त्र व शब्दशास्त्र प्रगतावस्थेत होती तेव्हा पाश्चात्य राष्ट्रे त्या विषयात त्या मानाने मागासलेली होती. परंतु इंग्रजांचा ह्या देशाशी संबंध आला, त्यांना आणि युरोपातील शास्त्रज्ञांना संस्कृत भाषेची, त्या भाषेच्या व्याकरणशास्त्राची माहिती झाली तेव्हा वरील चित्र एकदम पालटले. त्या शास्त्रज्ञांनी ग्रीक व लॅटिन भाषांचा आणि साहित्याचा उत्तम अभ्यास केलेला होताच. संस्कृत भाषेचे आणि त्या भाषेतील शब्दांच्या विश्लेषणपद्धतीचे ज्ञान त्यांना होताच त्यांना त्यांच्या हातात एक प्रभावी दिवा मिळाल्यासारखे वाटले. ह्या दिव्याच्या प्रकाशात त्यांना त्यांच्या ग्रीक व लॅटिन भाषा अधिक स्पष्ट दिसू लागल्या. इतकेच नव्हे तर ह्या तीन व इतर काही भाषा यांच्यातले शब्द आणि ते सिद्ध करण्याच्या प्रक्रिया ह्यांच्यात इतके विलक्षण साम्य आढळून आले की, ह्या साम्याचा अर्थ जर स्पष्ट करायचा झाला तर त्यासाठी ह्या सर्व भाषा संबंधित असल्या पाहिजेत आणि मुळात त्या सर्व एकच भाषा असल्या पाहिजेत असे गृहीत धरल्याखेरीज गत्यंतर नाही हे त्यांनी जाणले. ह्या अनुमानाचा अर्थ असा की कुठेतरी, केव्हातरी एका सलग भूभागात आजच्या मराठीसारखी बोलली जाणारी ही मूळभाषा कालपरत्वे आणि देशपरत्वे भिन्न भिन्न रूपे पावली हा होय. भाषाशास्त्रविषयक हा एक मौलिक सिद्धान्त कलकत्ता हायकोर्टचे जज्ज असलेले सर विल्यम जोन्स यांनी १७८६ साली एशिॲटिक सोसायटीच्या सभेत अध्यक्षीय भाषण देताना मांडला. भाषाशास्त्राच्या एका प्रमुख अंगाचा – तौलनिक आणि

ऐतिहासिक भाषाशास्त्राचा ( Comparative and Historical Linguistics ) — जन्म त्या क्षणी झाला. भाषाशास्त्रविषयक लेखनात जितके पाणिनींचे नाव येणे अपरिहार्य झाले आहे, काहीसे तितकेच सर विल्यम जोन्स यांचे नाव येणेही अपरिहार्य झाले आहे.

सर्वांच्या परिचयाच्या झालेल्या ह्या सिद्धांताचे महत्त्व कशात आहे हे थोडक्यात पाहू. संस्कृत व इतर काही भाषांत आढळून येणारे सारखे शब्द सर विल्यम जोन्सच्या लक्षात येण्याच्या आधी काही खिस्ती मिशनऱ्यांच्या लक्षात आले होते. उदाहरणार्थ, संस्कृत सर्प व इटॅलियन सेर्पे ( serpe ), किंवा संस्कृत दानम् व लॅटिन दोनुम् ( do:num ) असे समान अर्थांचे सारखे शब्द त्यांनी लोकांच्या नजरेस आणले होते. दोन भिन्न भाषांत अशी काही तुरळक साम्यस्थळे आढळल्यास माणसाला थोडे आश्चर्य वाटेल, थोडी गंमत वाटेल, ह्या पलीकडे काही होणार नाही आणि झालेही नाही. दोन भाषांत योगायोगाने थोडे सारखे शब्द आढळत नाहीत असे नाही, त्यांचा खुलासाही कोणी विचारत नाही. मराठीत ' नीट ' आणि इंग्रजीत neat असे योगायोगाने सारखे असलेले शब्द आहेत. हिंदीत दहा ह्या अर्थी दस शब्द आहे. त्यासारखाच हॉटेण्टॉट भाषेत दिसि ( disi ) हा शब्द आहे. परंतु सर विल्यम जोन्सनी जी साम्यस्थळे पाहिली ती अशी वरवरची आणि तुरळक नव्हती. ती मूलगामी आणि बहुसंख्य होती. त्यामुळे ही गोष्ट नुसती गंमत वाटून संपण्यासारखी नव्हती. अवेस्ता आणि संस्कृत ह्या दोन भाषांमधे आढळणारी साम्यस्थळे तुरळक नसून अनेक आहेत. नुसते समान शब्दच अनेक आहेत असे नव्हे तर ध्वनिविषयक समीकरणे ( phonetic correspodences ), जसे संस्कृत स = अवेस्ता ह, वारंवार दृग्गोचर होणारी ( recurring ) आहेत ( सं. सोम = अ. हओम; सं. सप्त = अ. हप्त इत्यादी ). ह्या खेरीज ह्या दोन्ही भाषांतील रूपे साधण्याची प्रक्रिया पण समान आहे. संस्कृतमधले पतति हे रूप घेतले तर ते पत् + अ + ति ह्या तीन घटकांपासून साधता येते असे म्हणता येते. तसेच अवेस्तात देखील नेमके तेच घटक त्याच क्रमाने एकत्र येऊन पत( इ )ति असे रूप बनत असल्याचे आढळते. संस्कृतमधे प्रथमपुरुषी रूप भर् + अ + मि-भरमि असे न होता जसे भरामि होते, नेमके तसेच अवेस्तातही प्रथमपुरुषी बरमि च्या ऐवजी बरामि असे रूप आढळते. ही व्याकरणविषयक साम्यस्थळे वरवरची नाहीत, ती फार खोल रुजलेली आहेत. ह्या केवळ योगायोगाच्या ( chance ) गोष्टी आहेत असे म्हणून भागण्यासारखे नाही. त्यांचा काहीतरी समाधानकारक खुलासा करणे भाग आहे. तो करण्यासाठी सर विल्यम यांनी असा तर्क केला की, अशा परस्परांशी सदृश असणाऱ्या भाषा मुळात कोणतीतरी एकच भाषा असल्या पाहिजेत आणि म्हणून त्यांच्यात ही अशी विलक्षण साम्ये आढळतात. सर जोन्सच्या ह्या विधानाला प्रत्यक्ष पुरावा नाही. म्हणजे त्यांना जर कुणी म्हटले असते की ह्या

मूळभाषेचा कुठेतरी जतन करून ठेवलेला नमुना दाखवा तर तो त्यांना आला नसता कारण संस्कृत, ग्रीक ह्यांपैकीच एखादी भाषा मूळभाषा असल्याचे त्यांनी मानले नव्हते. भाषाशास्त्राच्या इतिहासात एक वेळ अशी होती की जेव्हा संस्कृतपासून किंवा ग्रीकपासून इतर भाषांची उत्पत्ती मानण्याकडे कल असे. पण हे मत फार काळ टिकले नाही. सर विल्यम यांच्या विधानाला प्रत्यक्ष पुरावा नसला तरी ते विश्वासार्ह मानण्यात येते ह्याला दोन कारणे आहेत : ( १ ) एकतर ते विधान ज्या साम्यस्थळांवर आधारलेले आहे ती सर्व नीट परीक्षा करून घेतलेली आहेत, फसवी नाहीत; ( २ ) आणि दुसरे असे की, त्यांनी केलेल्या अनुमानाखेरीज इतर कोणत्याही प्रकारे ह्या भाषांतील साम्यस्थळांचा समाधानकारक खुलासा होऊ शकत नाही. त्यामुळे सर विल्यम यांचा तर्क हा एक शास्त्रीय तर्क ठरतो.

सर विल्यम जोन्सनी वरील तर्कांचा उच्चार केल्यानंतर युरोपात—विशेषतः जर्मनी व फ्रान्समध्ये—तौलनिक व ऐतिहासिक भाषाशास्त्रास सुरुवात होऊन हळूहळू त्याला धार येऊ लागली. ह्या प्रकारच्या अभ्यासात एकापेक्षा जास्त भाषा तुलनेसाठी एकत्र अभ्यासिल्या जात असल्यामुळे त्याला "तौलनिक" आणि त्या भाषांच्या मुळाशी जी एक भाषा असल्याची कल्पना करण्यात येते त्या भाषेपासून ह्या सर्व भाषांचा विकास कसा झाला ह्याचा इतिहास सांगण्यात येत असल्यामुळे 'ऐतिहासिक' अशी विशेषणे भाषाशास्त्राच्या ह्या अंगाला मिळाली. प्रथम युरोप व आशियाच्या काही भागात बोलल्या जाणाऱ्या आणि बोलल्या गेलेल्या भाषांचे साधर्म्य व्यवस्थितपणे मांडून दाखवण्यात आले आणि त्या भाषा एका कुळातल्या असल्याचे ठरविण्यात आले. ह्या भाषिक कुळाला 'इंडो-युरोपियन' हे नाव देण्यात आले आणि त्या सर्व भाषांची जननी म्हणून जी एक भाषा मानण्यात आली तिलाही 'इंडो-युरोपियन' हेच नाव मिळाले. अशा एका भाषेच्या अस्तित्वाची कल्पना केल्यानंतर जोवर तिचा काल आणि देश निश्चित करता येत नाही तोवर तिचे पाय जमिनीवर टेकत नाहीत तिला एक प्रकारची "सत्यता" ( Reality ) येत नाही. इण्डो-युरोपियन भाषेचा काळ इसवी सनापूर्वी सुमारे तीन हजार वर्षे मानण्यात येतो. तिच्या मूळच्या स्थानाविषयी, म्हणजे ही कल्पित भाषा बोलणारा लोकसमूह कुठे राहात असावा ह्याविषयी निरनिराळी मते आहेत. काही वर्षांपूर्वी प्रा. थीमे ( Thieme ) यांनी ते स्थान मध्य युरोपात जिथे पूर्व जर्मनी आणि पश्चिम पोलंड एकत्र येतात, ज्या भूभागातून व्हिस्टयूला (Vistula) ओडर ( Oder ) आणि एल्बे ( Elbe ) ह्या नद्या वाहतात तिथे असल्याचे प्रतिपादिले आहे. ह्या मताच्या पुष्ट्यर्थ त्यांनी जे अनेक मुद्दे मांडले आहेत ते सर्व विस्ताराने सांगणे कठीण आहे. पण त्यातला एक मुद्दा जो अतिशय महत्त्वाचा आहे तो सांगणे इष्ट वाटते. मध्य युरोपातल्या ज्या नद्यांची नावे वर दिली आहेत त्यात लाल रंगाचा एक प्रकारचा मासा सापडतो. त्याला इंग्रजीत Salmon म्हणतात. परंतु दुसऱ्या काही

भाषातून जो शब्द आढळतो त्यावरून तो मूळ *लक्स (laks)[1] असा असावा असा तर्क करता येतो. संस्कृत भाषेत फार मोठी संख्या दर्शविणारा जो लक्ष शब्द आहे तो ह्या लक्स पासून आला आहे असे प्रा. थीमे यांचे मत आहे. हे मासे फार मोठ्या संख्येने एकत्र दृष्टीस पडत असल्यामुळे 'लक्ष' ह्या रूपाने संस्कृतात टिकून राहिलेल्या ह्या शब्दाला हा नवा अर्थ मिळाला. तसेच संस्कृतात लाल रंग ह्याला जो 'लाक्षा' शब्द आहे,त्याचेही मूळ प्रा. थीमे यांच्या मते हा रंगाने लाल असलेला लक्स मासाच.

अशा प्रकारे एखाद्या भाषिक कुळाच्या मुळाशी असलेल्या भाषेची कल्पना केल्यावर त्या भाषेचा जो शब्दसंग्रह सिद्ध करण्यात येतो त्यावरून ती भाषा बोलणाऱ्यांची संस्कृती कशा प्रकारची असू शकेल ह्याविषयी काही अनुमाने करता येतात. ह्या पद्धतीला संस्कृतीच्या भाषिक अवशेषांचा अभ्यास ( Linguistic Paleontology ) म्हणतात. प्राचीन संस्कृतीचे यावच्छक्य समग्र दर्शन घडवण्याच्या दृष्टीने पुरावशेष, वाङ्मय, लोकश्रुती ह्याबरोबरच भाषिक अवशेषांचा अभ्यासही समाविष्ट करणे योग्य ठरते. परंतु असे करताना भाषा आणि वंश यांचा गोंधळ होऊ न देण्याची काळजी घेणे हितावह आहे. एकभाषिक लोकसमूह म्हटला की तो हमखास एकाच वंशाच्या लोकांचा समूह असला पाहिजे असे मानण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे प्राचीन इंडो-युरोपियन भाषा बोलणाऱ्या लोकांची कल्पना करणे जरी आवश्यक ठरले तरी ती भाषा बोलणारे लोक एका वंशाचे होते असे मानण्याची गरज नाही. भिन्न वंशाचे लोकही एक भाषा बोलू शकतात. मराठी भाषिकांची मुले जर लहानपणापासून एखाद्या आफ्रिकन भाषा बोलणाऱ्या लोकांत वाढली तर आफ्रिकन मुलांइतकीच ही मराठी मुले ती भाषा उत्तम बोलू लागतील. वंशभेद भाषा शिकण्यात आडकाठी आणू शकत नाहीत. एक भाषा बोलणारा समूह एका वंशाचा असेल किंवा नसेल.

इण्डो-युरोपियन भाषेचा जो शब्दसंग्रह पुनःस्थापन (reconstruction) पद्धतीने सिद्ध केला आहे त्यावरून ती भाषा बोलणाऱ्या लोकांची इसवी सनापूर्वी सुमारे तीन हजार वर्षे इतकी जुनी संस्कृती कशी असेल ह्याविषयी काही अनुमाने करणे शक्य आहे. त्या काळची कुटुंबपद्धती पितृप्रधान होती. धार्मिक कृत्यात प्रत्येक घरचा पिता ऋत्विज आणि यजमान ह्या दोन्ही भूमिका करी. धर्मकृत्ये करण्यासाठी ऋत्विजांचा स्वतंत्र वर्ग नव्हता. मूर्तिपूजा नसावी. मंदिरवाचक शब्द त्या भाषेत नाही. काही दैवी शक्ती ते मानीत होते. ह्या दैवी शक्ती स्वर्गात राहतात आणि त्यांचा पृथ्वीवरच्या मानवावर अंमल चालतो असे ते मानीत. ह्या दैवी शक्ती मानवाप्रमाणे मर्त्य नसून अमर अस-

१ भाषाशास्त्रीय लेखनात अनुमानित रूपांना तारकाचिन्ह लावून ते रूप कुठल्याही प्राचीन वा अर्वाचीन भाषेत उपलब्ध नाही, अनुमानित आहे हे सुचवण्याची पद्धत आहे.

त्याची त्यांची कल्पना होती. त्या भाषेत एकापासून दहापर्यंत स्वतंत्र अंक सिद्ध करता येत असल्यामुळे त्यांची मोजण्याची पद्धत दशमान होती.

पुनर्घटित भाषिक पुराव्यावरून संस्कृतिविषयक अशी अनुमाने काढताना काळजी फार घ्यावी लागते. एक गोष्ट कटाक्षाने लक्षात ठेवायला हवी ती ही की, ज्या शब्दांच्या आधारे मूळ भाषेतील शब्द पुनःस्थापित करण्यात आले असतील ते स्वतंत्र सुटे शब्द असावेत, सामासिक असू नयेत. सामासिक शब्दांवरून काढलेले निष्कर्ष कित्येकदा फार चुकीचे असू शकतात. उदाहरणार्थ, आपण अशी कल्पना करू की, गुजराती व हिंदी ह्या भाषांतील शब्दांच्या आधारे कोणी अभ्यासक तत्पूर्वकालीन भाषेचे पुनःस्थापन करण्याचा प्रयत्न करीत आहे. अशा वेळी गुजरातीतील आगकाडी ह्या अर्थी असलेला सामासिक शब्द दिवासळी आणि हिंदीतील त्याच अर्थाचा शब्द दियासलाई यांची तुलना करून हिंदी–गुजरातीच्या बुडाशी असलेल्या भाषेत दिवासलाई सारखा शब्द तो पुनःस्थापित करण्याची शक्यता आहे. आणि त्यावरून जर पुढे त्याने निष्कर्ष काढला की हजार-बाराशे वर्षांपूर्वी हिंदी-गुजरातीची मूळ असलेली भाषा बोलणाऱ्या ह्या लोकांना आज वापरात असलेली आगकाडी माहीत होती तर आगकाडीच्या शोधाचा जो इतिहास आपल्याला माहीत आहे त्यामुळे वरील निष्कर्ष किती हास्यास्पद ठरेल हे आपल्या लक्षात येईल. हा गोंधळ दिवासळी सारखे सामासिक शब्द घेतल्यामुळे झाला.

एक भाषा बोलणारे लोक जेव्हा स्थलांतर करून दुसऱ्या भूभागात जातात तेव्हा भिन्न भाषा बोलणाऱ्या भिन्न संस्कृतीच्या लोकांशी त्यांचा संबंध येतो. अशा वेळी एका भाषेतील शब्द दुसऱ्या भाषेत जाणे अपरिहार्य असते. ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या अभ्यासात हा विषय पण येतो आणि याचीही अनेक ठिकाणी चर्चा झाली आहे. एका भाषेचा दुसऱ्या भाषेच्या ध्वनीवर, व्याकरणावर आणि शब्दसंग्रहावर कितपत परिणाम होऊ शकतो हे खूप तपासले गेले आहे. साधारणपणे एका भाषेचा प्रभाव दुसऱ्या भाषेच्या कोठल्याही अंगावर पडण्याची शक्यता मानली गेली असली तरी मुख्यत्वे करून संस्कृतिविषयक शब्दच ( culture vocabulary ) एका भाषेतून दुसऱ्या भाषेत सहजपणे प्रवास करतात असे आढळून आले आहे. त्यामुळे संस्कृति-विषयक अभ्यासासाठी अशा शब्दांच्या बाबतीत घेतलेले निर्णय फार महत्त्वाचे ठरतात. संस्कृत भाषा बोलणारे लोक इथे येऊन स्थायिक झाल्यावर त्यांच्या भाषेतले पुष्कळसे शब्द एतद्देशियांच्या भाषेत गेले आणि एतद्देशीय भाषांतले शब्द संस्कृतात आले. ही दुसरी बाजू मानण्यास काही संस्कृतज्ञांना जरा अवघड वाटते, पण ही भाषिक देवाण-घेवाण अपरिहार्य असते. ह्यात वाईट वाटण्याचे काही कारण नाही. संस्कृत भाषेतला पूजा हा शब्द द्राविडी भाषांतून उसनवार घेतल्याचे मानण्यात येते. हा शब्द प्राचीन वैदिक वाङ्मयात कुठे आढळत नाही. संस्कृत पृच् धातूपासून तो साधता येईल अशी

एक व्युत्पत्ती सुचविली गेली आहे (Thieme), पण त्यात ओढाताण फार आहे. वैदिक आर्यांचा धर्म यज्ञप्रधान होता. स्वतंत्रपणे किंवा सोमयागासारख्या मोठ्या यागांतून पशुयागही होत असे. ह्याला खर्च आणि वेळ फराच लागे. कालांतराने हे यज्ञयाग मागे पडून नंतर प्रस्थापित झालेल्या हिंदुधर्मात मूर्तिपूजा रूढ झाली. ह्या पूजेचा प्रकार सुटसुटीत आणि यज्ञाच्या मानाने कमी खर्चाचा होता. हा पूजाविधी हिंदुधर्मात रूढ होण्यास द्राविडी संस्कृतीचा प्रभाव कारणीभूत झाला असावा आणि त्यांच्याकडून आर्यांनी हा पूजाप्रकार घेतला त्यांच्याकडून त्यांच्या भाषेतला पूजा हा शब्दही घेतला असे मानण्यास येते. चुम्ब् हा शब्दही संस्कृतने असाच उसना घेतलेला आहे. हा शब्ददेखील वैदिक वाङ्मयात आढळत नाही. त्या काळी प्रेम, ममत्व दर्शविण्यासाठी ओठांनी चुम्बन घेण्याची पद्धत नसून मस्तक हुंगण्याची पद्धत रूढ होती असे घ्रा किंवा अवघ्रा हे धातू उपयोगात आणले गेले आहेत त्यावरून दिसते. चुम्बनाची नवी पद्धत आर्यांनी इथल्या रहिवाश्यांकडून घेतली असल्यास तद्वाचक शब्दही त्यांनी त्यांच्याकडून घेतला असावा असे दिसते. भाषाशास्त्राच्या आधारे अशी आपल्या जीवनाशी निगडित असलेली अनुमाने काढण्याची शक्यता असते.

भाषा ही एक सामाजिक परंपरा (social convention) असल्यामुळे भाषेचा आणि मानवी स्वभावाचा काही संबंध असू शकेल का ह्याविषयी भाषाशास्त्राच्या वाटचालीत क्वचित विचार झालेला आढळतो. एखाद्या भाषेची रचना, तिचा शब्दकोश ह्यामुळे ती भाषा बोलणाऱ्या मानवसमूहाचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोण बनतो अशी एक कल्पना आहे. एखाद्या भाषेतील विशिष्ट प्रवृत्तीवरून ती भाषा बोलणाऱ्यांच्या स्वभावाविषयी कल्पना करण्याचा मोह होणे शक्य आहे. ह्यासाठी आपल्या मराठीतल्या एका प्रवृत्तीचे उदाहरण देता येईल. क्रिकेटचा खेळ भारतात सर्वत्र गेली कित्येक वर्षे खेळला जात आहे. गेल्या काही वर्षांत मराठीत ह्या खेळातल्या जवळ जवळ सर्व इंग्रजी शब्दांसाठी मराठी प्रतिशब्द–Batsman = फलंदाज, bowler = गोलंदाज, Run = धाव, l. b. w. = पायचीत, bowled = त्रिफळासरीस वापरले जात आहेत. मला वाटते फक्त खेळाचे नाव क्रिकेट तेवढे आम्ही बदलले नाही. हा प्रयोग जसा मराठीने केला आहे तसा माझ्या माहितीप्रमाणे भारतातल्या दुसऱ्या कोणत्याही भाषेने केलेला नाही. ह्यावरून कुणाला असा निष्कर्ष काढण्याचा मोह होण्याची शक्यता आहे की इतर भारतीयांपेक्षा महाराष्ट्रीय लवकर स्वावलंबी बनतात. अशा कल्पना नेहमी खऱ्या ठरतीलच असे मात्र नव्हे.

ऐतिहासिक आणि तौलनिक भाषाशास्त्राला एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस युरोपात सुरुवात झाली आणि तिथे त्याची फार झपाट्याने प्रगती झाली. ही अभ्यासाची पद्धत एकदा निश्चित झाल्यावर ती इंडो-युरोपियन भाषाकुलापुरती मर्यादित राहिली नाही. भारतातीलच दक्षिणेकडील द्राविडी भाषा, आशिया खंडातील इतर देशांच्या

भाषा, तसेच आफ्रिका, अमेरिका व ऑस्ट्रेलिया ह्या खंडांतील तद्देशीयांच्या भाषा आणि इतरत्रही बोलल्या जाणाऱ्या भाषा यांचा अभ्यास सुरू होऊन त्यांची शक्य तिथे भाषाकुले ठरविण्यात आली. तरीही हे काम संपलेले मात्र नाही. अजूनही पुष्कळ भाषांच्या रचनांचा अभ्यास आणि त्यांचे वर्गीकरण व्हायचे राहिले आहे.

ऐतिहासिक भाषाशास्त्राने जगात निरनिराळ्या ठिकाणी बोलल्या जाणाऱ्या भाषांचा निकटचा संबंध लक्षात घेऊन त्यांना एकभाषोद्भव मानले. त्यामुळे प्रागैतिहासिक काळी एकभाषिक मानवसमूहाने निरनिराळ्या काळी निरनिराळ्या देशात कसे स्थलांतर केले असेल ह्याविषयी काही कल्पना करता येणे शक्य झाले. ह्या घटना घडताना ह्या समूहाचे एकाच वेळी निरनिराळे गट बनून ते भिन्न भिन्न दिशांनी चालू लागले असे बहुधा झाले नसावे. हे भाषिक विभाजन क्रमाक्रमाने झाले असण्याची शक्यता जास्त आहे. उत्तर भारतातील भाषा ह्या संस्कृतोद्भव खऱ्या. पण ज्या लोकांत त्या पुढे पंजाबी, सिन्धी, गुजराती, मराठी इत्यादी रूपात परिणती पावल्या ते सर्व लोक एकाच वेळी परस्परांपासून विभक्त झाले असे गृहीत धरण्यास काही पुरावा नाही. मग ह्या समूहाचे विभाजन कसे झाले असावे ह्याविषयी काही अनुमान करण्यास तसेच त्या विभाजनाचा काल निश्चित करण्यास आधार मिळतो का हे पाहण्याकडे शास्त्रज्ञांचे लक्ष गेले. हे जर करता आले तर लोकसमूहांच्या ऐतिहासिक कालातील हालचालींविषयी आपणास जास्त निश्चित स्वरूपाची माहिती मिळू शकेल. संबंधित दोन भाषा एकमेकींपासून केव्हा निराळ्या झाल्या तो काल ठरविण्याची एक पद्धत अलीकडे सिद्ध करण्यात आली आहे. तिला भाषिक अवशेषांच्या आधारे सिद्ध होणारी कालमापन-पद्धती– lexicostatistics किंवा glottochronology – असे नाव देण्यात आले आहे. ह्या पद्धतीने अगदी काटेकोर कालनिश्चिती करता येते असे नाही. पण स्थूल-मानाने काही कल्पना करणे मात्र शक्य असते आणि अगदीच अंधारात चाचपडत बसण्यापेक्षा थोडासा प्रकाश मिळवता आला तरी तो चांगला असे ह्या पद्धतीच्या प्रवर्तकांचे समर्थन आहे.

ह्या पद्धतीच्या बुडाशी अशी एक गृहीत कल्पना आहे की, प्रत्येक भाषेचा जो मूलभूत शब्दकोश – basic vocabulary – असतो तो एका ठराविक प्रमाणातच बदलत असतो आणि हे प्रमाण जगातील सर्व भाषांत सारखेच असते. ज्या भाषांचा इतिहास अवगत आहे अशा काही भाषांच्या आधारे असे मानण्यात आले आहे की, मूलभूत शब्दकोश दर हजार वर्षाला शेकडा चौदा ह्या प्रमाणात बदलत असतो. ह्याचा अर्थ असा की, एक भाषा बोलणाऱ्या लोकांचे दोन गट झाल्यानंतर ह्या विभाजनाच्या सुरुवातीच्या काळात त्यांच्यात मूलभूत शब्दकोशातले जे शंभर शब्द समान असतील त्यांतले एक हजार वर्षांनंतर ८६ शब्द शिल्लक राहतील आणि उरलेले चौदा बदललेले असतील. आणि त्यापुढील हजार वर्षांत मूलभूत शब्द टिकण्याचे आणि बदलण्याचे

हे प्रमाण असेच चालू राहील. इथे एक गोष्ट लक्षात ठेवायला हवी की, ह्या दोन भाषांपैकी एका भाषेने जे जुने ८६ शब्द टिकवले असतील नेमके तेच ८६ शब्द दुसऱ्या भाषेने टिकवले असतील असे मात्र नव्हे. त्यामुळे आपण जर मराठी आणि गुजरातीतले ह्या मूलभूत शंभर शब्दांचे पर्याय तपासले तर आपणांस असे आढळून येईल की, त्या दोन भाषांत कान, नाक ह्यासारखे काही शब्द सारखे आहेत तर डोके–माथु, डोळा–आंख ह्यासारखे काही शब्द भिन्न आहेत. अशा शब्दांची आपण मोजदाद केली तर असे आढळते की, ह्या दोन भाषांत ६५ शब्द संस्कृतोद्भव आहेत आणि ३५ शब्द भिन्न आहेत. अशीच मोजदाद आपण मराठी आणि बंगाली ह्या दोन भाषांतील मूलभूत शंभर शब्दांच्या बाबतीत केली तर त्यात ५५ शब्द संस्कृतोद्भव आणि ४५ शब्द बदललेले आढळतात. कालमापन पद्धतीच्या प्रवर्तकांनी जे एक गणिती सूत्र निश्चित केले आहे ते मराठी–गुजराती आणि मराठी–बंगाली भाषांना लावले तर मराठी आणि गुजराती भाषा परस्परांपासून सुमारे १४०० वर्षांपूर्वी म्हणजे इसवीसनानंतर ६०० वर्षांनी आणि मराठी व बंगाली ह्या भाषा सुमारे २००० वर्षांपूर्वी म्हणजे इसवी सनाच्या सुरुवातीस एकमेकींपासून विभक्त झाल्या असे म्हणता येते.

ह्या कालमापनपद्धतीवर काही आक्षेप घेण्यात आले आहेत हे खरे. परंतु वर दिल्यासारखे काही ढोबळ निष्कर्ष जर ह्या पद्धतीच्या साहाय्याने काढता आले तर ते हवे आहेत. मराठी–गुजराती–बंगाली ह्या भाषा एका कुलातल्या आहेत एवढेच समजण्यापेक्षा ऐतिहासिक काळात एकमेकींपासून त्या कोणत्या क्रमाने–म्हणजे प्रथम बंगाली भाषिक समूह विभक्त झाला आणि नंतर सुमारे ६०० वर्षांनी मराठी–गुजराती भाषिक विभक्त झाला – हे जाणता आले तर ते हवेच आहे. ह्या दृष्टीने सर्व उत्तर भारतीय आणि द्राविडी भाषांचा अभ्यास होऊन ह्या देशात ह्या भाषा बोलणारे समूह कसे विभक्त होत गेले ह्या भाषिक हालचालींचा इतिहास दाखविणारे एक चित्र तयार व्हायला हवे आहे.

कोठल्याही भाषेत कालांतराने काही फेरबदल होतातच. कालांतराबरोबरच देशांतरही झाले तर हे फेरबदल जलद गतीने होण्याची शक्यता असते. भाषिक फेरबदलाची कारणे अनेक असू शकतील. उच्चारसौकर्य ( ease of pronunciation ) हे कारण काही उदाहरणांत शक्य आहे. इंग्रजी know ह्या शब्दाच्या सुरुवातीस येणाऱ्या kn ह्या संयुक्त व्यंजनाऐवजी आता एकेरी n व्यंजन असल्यासारखा उच्चार हा उच्चारसौकर्याचा द्योतक असू शकेल. देशान्तरामुळे दुसऱ्या भाषांशी संबंध आल्यावर त्या भाषांचा किंवा त्या भाषांवर होणारा परिणाम हे देखील बदल होण्याचे कारण असू शकते ( substratum ). भिन्न भाषिकांत जित व जेते ह्यांचे जे नाते असेल किंवा संस्कृतीच्या दृष्टीने जो उच्चनीच भाव असेल त्या प्रमाणात हा प्रभाव कमीजास्त असतो. इथल्या द्राविडी भाषांचा आर्य भाषांच्यावर, किंवा इंग्रजीचा भारतीय भाषांवर, किंवा

फ्रेंचचा इंग्रजीवर झालेला परिणाम ही चटकन डोळ्यांसमोर येणारी उदाहरणे आहेत. भाषेच्या इतिहासात काही बदल सादृश्यमूलकही ( Analogy ) असतात. मराठीत दोन ह्या शब्दाच्या शेवटी येणारा न हा तीन मधल्या न मुळे असावा. हिंदीत नुसतेच दो, गुजरातीत बे, आणि संस्कृतात द्व आहे. इंग्रजीतील four शब्दाच्या सुरुवातीला येणारा f हा त्या भाषेतल्या five च्या सुरुवातीस येणाऱ्या f मुळे असावा. तसेच संस्कृत भाषेत एकादश मधे येणारा आ हा त्यापुढील द्वादश मधल्या आ मुळे असावा. ह्या तीन भिन्न भाषांतील उदाहरणांवरून असे दिसते की, संख्यावाचक शब्दात सादृश्यमूलक बदल होतो तेव्हा पुढच्या शब्दाचा मागच्यावर परिणाम होतो. ह्या ठिकाणी अपेक्षा ( expectancy ) हे तत्त्व ह्या प्रकारच्या बदलाच्या बुडाशी असण्याची शक्यता आहे.

इतरही काही संबंधित शब्दांत असे सादृश्यमूलक बदल घडून आल्याचे दिसते. कुंभार ह्या मराठी शब्दातील भकार व्युत्पत्तिसाध्य ( etymological ) आहे, कारण संस्कृत कुम्भकार शब्दातही भकार आहे. परंतु मराठी चांभार शब्दातील भकार व्युत्पत्तिसाध्य नाही. संस्कृत चर्मकारात तो नाही, हिंदी-गुजराती चमारमधेही तो नाही. तो सादृश्यमूल ( कुंभाराशी सादृश्य ) आहे. उसनवार शब्दातही सादृश्यमूल बदल होऊ शकतात. इंजिनिअर ह्या शब्दाशी असलेल्या सादृश्यामुळे आपण क्रिकेटर म्हणत नाही, क्रिकेटिअर म्हणतो. भाषेच्या इतिहासात तिच्या व्याकरणात सादृश्यमूल बदल झालेले बरेचवेळा दिसून येतात. इंग्रजीत अनेकवचनी s प्रत्ययाचा, भूतकालवाचक ed प्रत्ययाचा, आणि संस्कृत-प्राकृत ह्या अवस्थेत परस्मैपदी प्रत्ययांचा वाढता उपयोग ही ह्याची उदाहरणे आहेत. भाषाशास्त्राच्या इतिहासात analogy ने बराच धुमाकूळ घातला आहे. वैद्यकीय शास्त्रात allergy चे तत्त्व सिद्ध झाल्यावर जसे डॉक्टराला रोगाचे कारण समजले नाही की allergy चा आश्रय घेण्याचा त्याला मोह होतो तसेच काहीसे भाषाशास्त्रीय संशोधनांत झाले आहे. एखाद्या भाषिक बदलाचे नीटसे समर्थन करता आले नाही की भाषाशास्त्री analogy चा आसरा घेताना दिसतात.

भाषेत होणाऱ्या फेरबदलांची ही व इतर काही कारणे साधारणपणे सांगण्यात येत असली तरी मुख्य एक गोष्ट ध्यानात घ्यायला हवी ती ही की हे फेरबदल होण्यास आवश्यक ती भूमी भाषेच्या रचनेत आणि आपण भाषा ज्या परिस्थितीत उपयोगात आणतो त्यांतच तयार असते. बोलणाऱ्याचा आशय ऐकणाऱ्याच्या ध्यानात येण्याच्या दृष्टीने काहीशी पुनरुक्ती किंवा एक प्रकारचे भरताड ( redundancy principle ) प्रत्येक भाषेत असते. उदाहरणार्थ, चांगला मुलगा असे म्हटल्यानंतर मुलीविषयी बोलताना चांगली मुलगी असेच म्हणावे लागण्याचे कारण नाही; चांगला मुलगी म्हटले तरी अभिप्रेत अर्थ व्यक्त होणे शक्य आहे. इंग्रजीत good boy आणि good girl असे विशेषणाच्या रूपात फरक न करता म्हणतातच की ! पण मराठी भाषेची रचना निराळी

असल्यामुळे आपल्याला चांगला मुलगी म्हटल्यास कसेसेच वाटते इतकेच. संस्कृतमध्ये द्वौ म्हटल्यानंतर हस्तौ म्हणण्याची वास्तविक जरुरी नाही, हस्तः किंवा हस्ताः म्हटल्यास चालावे, पण चालत मात्र नाही. मराठीत मात्र एक हात, दोन हात, चार हात असे हात ह्या शब्दाच्या रूपात फेर न करता म्हटले तरी चालते. जशी भाषेची रचना, तसे तिच्यात प्रयोग होत असतात. पण आशय कळविण्याच्या दृष्टीने हे सर्वत्र आवश्यक असतात असे नव्हे. अनावश्यक गोष्ट लुप्त झाली तरी त्यामुळे बिघडत नाही आणि म्हणूनच भाषेत बदल होऊ शकतात.

दुसरे असे की आपण ज्या संदर्भात बोलत असतो त्या संदर्भानुसार आपले बोलणे दुसऱ्याला कळत असते. त्यासाठी आपण उच्चारलेल्या वाक्याचा प्रत्येक ध्वनी ऐकणाऱ्याला ऐकू जाण्याची जरूर नसते. तशी जर असती तर भाषेत ज्या प्रमाणात फेरबदल घडून आल्याचे आढळते तसे ते झाले नसते. कांद्याच्या दुकानासमोर उभे राहून आपण बटाटे कसे दिले असे विचारण्याची शक्यता नाही. तेव्हा आपण विचारलेल्या प्रश्नातील कांदे हा शब्द दुकानदाराला स्पष्ट ऐकू आला नाही तरी चालते. किंबहुना आपण चुकून बटाटे हा शब्द उच्चारलाच तर दुकानदार किंचित हसेल, विसरभोळेपणाचा परकर घेतलेले आपण कुणी तरी प्रोफेसर असलो पाहिजे हे तो समजेल, आणि कांद्याचाच भाव आपल्याला सांगेल. भाषेत काही ध्वनिपरंपराही ठरलेल्या असतात. अमुक एका ध्वनीनंतर अमुक एकच ध्वनी येऊ शकतात. त्यामुळे काही ध्वनी ऐकल्याबरोबर त्या पुढचे ध्वनी कोणते असतील ह्याची आपल्याला ते ध्वनी उच्चारले जायच्या आधीच कल्पना आलेली असते. असे असल्यामुळे वाक्यातील प्रत्येक शब्द शेवटपर्यंत नीट उच्चारीत नेण्याची खबरदारी बोलणारा घेत नाही, आणि ऐकून घेण्याची ऐकणारा घेत नाही. 'काल संध्याकाळी मी घरी आलो' अशासारखे वाक्य मला बोलायचे झाल्यास संध्या हे ध्वनी उच्चारल्यानंतर काळी हे ध्वनी मी नीट न उच्चारले तरी चालण्यासारखे असते. त्या ठिकाणी दुसरे काही ध्वनी येण्याची शक्यता नाही. मी तेच ध्वनी उच्चारणार हे ऐकणाऱ्याने आधीच ओळखलेले असते आणि हे असे असते म्हणून भाषेत फेरबदल होऊ शकतात.

पण कोणी म्हणेल भाषेत फरक पडत जातो हेच मुळात कशावरून? ज्या भाषांची पूर्वरूपे मौखिक परंपरेने किंवा ती लिहून ठेवली असल्यामुळे आज उपलब्ध आहेत त्यांच्या बाबतीत हे सिद्ध करणे कठीण नाही. वैदिक वाङ्मय काळजीपूर्वक जतन करून ठेवले असल्यामुळे वैदिक संस्कृत भाषेत आणि पाणिनीच्या काळी जी संस्कृत भाषा बोलली जात होती तीत फरक होता हे व्याकरणकारांच्या सहज लक्षात येत होते. ज्ञानेश्वरकालीन मराठी आणि आजची आपली मराठी ह्या मराठीच्या दोन अवस्था पाहिल्या की कालांतराने भाषेत बदल होत जातो हे समजणे कठीण नाही. एखाद्या भाषेच्या दोन स्थानिक बोली तपासल्या आणि त्यात फरक आढळून आला तर तोही मूळच्या

एका भाषेत देशकालपरत्वे बदल घडून आल्याचे दाखवतो. त्यामुळे एखाद्या भाषेची पूर्वरूपे उपलब्ध नसली किंवा तिच्या बोली आढळत नसल्या तरी तिलाही पूर्वेतिहास हा असणारच आणि ती भाषा पूर्वकाली आजच्यापेक्षा भिन्न असणार असे विधान करायला हरकत नाही. भाषेत फेरबदल घडून येत आहेत हे इतरही आणखी काही पुराव्यावरून दाखवता येते. एखाद्या ग्रंथात जर असे विधान केलेले आढळले : 'चतुरक्षरो वै राजन्यः' तर त्या ग्रंथरचनेच्या काळी राजन्य शब्दाची लेखनात जरी तीन अक्षरे दिसत असली तरी कोणत्या तरी एका बोलीतल्या उच्चारात चार अक्षरे होती आणि तो शब्द राजनिय असा उच्चारला जात होता असे स्पष्ट होते. राजन्य शब्दाचा राजनिय असा उच्चार होणे हा जो भाषेत फरक पडला त्याला वरील विधान हे पुरावा होय. पतंजलीने महाभाष्य लिहिताना मञ्चक शब्द मञ्जक असा उच्चारू नये असे म्हटले तर त्याने तसा उच्चार एखाद्या बोलीत ऐकला असला पाहिजे हे उघड होते. हाही भाषेत झालेल्या बदलाचा पुरावाच म्हटला पाहिजे. आज जर कोणी असे लिहिले की, मराठीतील उद्या हा शब्द उंद्या असा उच्चारू नये किंवा कोल्हापूरचा उच्चार कोल्ल्हा-पूर असा करू नये आणि हे विधान आणखी काही वर्षांनी कोणी वाचल्यावर जर त्याने निष्कर्ष काढला की, वरील विधान करणाऱ्याच्या काळी लेखकाने तसा उच्चार क्वचित झालेला ऐकला असला पाहिजे तर तो निष्कर्ष चुकीचा ठरणार नाही. इंग्रजी किंवा फ्रेंच शब्दांचे जे स्पेलिंग असते त्यावरून भाषेतील शब्दांच्या उच्चारात किती फरक पडला आहे हे दिसून येते. रात्र ह्या अर्थी असलेल्या इंग्रजी शब्दात gh ने दर्शविलेला वर्ण स्पेलिंग-मध्ये आहे, पण उच्चारात नाही. परंतु पूर्वी केव्हा तरी त्या शब्दात त्याचा उच्चार होत असला पाहिजे म्हणूनच स्पेलिंगमध्ये तो टिकून राहिला आहे असे म्हटल्यास ते चुकीचे ठरणार नाही. सुदैवाने इंग्रजीशी संबंधित असलेल्या जर्मन भाषेत त्या अर्थाच-जो Nacht शब्द आहे त्याच्या उच्चारात ch ह्या स्पेलिंगने दर्शविलेल्या ध्वनीचा उच्चार ( ख़, उर्दू ख़राबप्रमाणे ) होतो आणि त्यामुळे इंग्रजीच्या बाबतीत तिच्या पूर्वावस्थेत gh चा उच्चार होत असल्याविषयी आपण जो तर्क केला त्याला पुरावा मिळतो. ह्याच वेळी संस्कृतातील नक्त हा शब्द आपल्याला आठवला तर त्यावरूनही इंग्रजीच्या बुडाशी जी भाषा होती तीत t च्या पूर्वी एक कंठ्य ध्वनी उच्चारला जात असला पाहिजे ह्याविषयी आपली खात्री पटते. night ह्या शब्दाचा आजचा उच्चार आणि स्पेलिंग ह्यात मेळ नाही ह्याचा अर्थ इतकाच की, उच्चारातील बदल आपण ताबडतोब लेखनात दाखवतो असे नाही. उच्चारातील बदलाच्या मानाने लेखनातील बदल हे सावकाश होत असतात. मराठीतील दसरा हा शब्द आपण तो दस्रा असल्या-सारखा उच्चारीत असलो तरी लिहीत मात्र तसा नाही. एखाद्या मराठी भाषिकाला तो तसा लिहून दाखवला तर मराठीत तसा शब्द नसल्याचे तो छातीठोकपणे सांगेल. त्याला संस्कृत येत असले तर अश्विनांचे ते एक विशेषण असल्याचे तो तुम्हाला सांगेल

पण दसरा जवळ आला असला तरी दसऱ्याची त्याला चुकूनही आठवण होणार नाही. स्पेलिंगच्या दृष्टीने विचार करता ' क्वचित लेखन ' ( occasional spelling ) म्हणून जो एक प्रकार असतो तोही उच्चारातील फरकासंबंधी पुरावा देत असतो. इंग्रजीतील puncture हा शब्द देवनागरीत लिहायचा झाल्यास आपण तो पंक्चर असा लिहू. पण रस्त्याच्या कडेला बसून सायकलीची किरकोळ दुरुस्ती करणाऱ्याने जर मागच्या भिंतीवर लिहिले असले ' इथे पंचर दुरुस्त करून मिळेल ' तर ह्या क्वचित आढळणाऱ्या लेखनामुळे puncture ह्या शब्दाचा उच्चार काहींच्या बोलीत निराळा होत असल्याचा पुरावा मिळेल. उच्चार निराळा नसता तर तो शब्द पंचर असा लिहिण्याचे कारण नव्हते. पुण्यात एक दोन ठिकाणी आणि क्वचित वर्तमानपत्रातील जाहिरातीत शाकाहारी ह्या ऐवजी खाखाहारी असे लिहिल्याचे आढळले. ह्याचाही अर्थ असा की काहींच्या बोलीत शाकाहारी शब्दाचा उच्चार खाखाहारी असा होत आहे. काही दिवसांनी हाच उच्चार जर सर्रास रूढ झाला तर आज आढळणारे क्वचित लेखन उद्या नित्य लेखन होईल, किंवा होणारही नाही. कारण उच्चारातील बदल लेखनात दाखविला जाईलच असे नाही. माझे एक बंधू बोलताना ' कालपासून'म्हणत असले तरी मला पत्र लिहिताना अजून 'काल पासोन' असेच जुन्या पद्धतीने लिहितात. तेव्हा उच्चारातील बदल लेखनात येईल असे नाही; पण लेखनात जर बदल आढळला तर तो मात्र उच्चारातील बदलाचा, कांही अपवाद सोडून, निदर्शक असतो.

वर शाकाहारी आणि खाखाहारी असे जे दोन उच्चार दिले त्यांपैकी पुढे कोणता टिकेल हे सांगणे म्हणजेच भाषेचे भविष्य सांगणे शक्य नसते. भाषेत होणारे बदल अनेक कारणांवर अवलंबून असल्याचे वर आपण पाहिलेच आहे. त्याखेरीज आपण एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी की, भाषेतील बदल मुद्दाम घडवून आणलेले नसतात. ते बोलणाऱ्यांच्या नकळत घडत असतात. ह्याला भाषाशुद्धीसारखे काही अपवाद असतात ते आपण घटकाभर सोडून देऊ. सहजगत्या होणाऱ्या श्वासोच्छ्वासाच्या क्रियेला प्रयत्नपूर्वक केलेला प्राणायाम किंवा दीर्घश्वसन हा जसा अपवाद तसाच सहज-गत्या बोलल्या जाणाऱ्या भाषेच्या बाबतीत मुद्दाम घडवून आणलेली भाषाशुद्धी हा पण एक अपवादच आहे. भाषेचे भविष्य वर्तविणे शक्य नसले तरी एखाद्या विशिष्ट भाषिक फेरफाराविषयी तो कोणत्या दिशेने जाईल हे एखादे वेळेस सांगणे शक्य आहे. इंग्रजीतील cow ह्या शब्दाचे अनेकवचनी रूप cows हे जाऊन kine पुन्हा येण्याची शक्यता फारच कमी. उलट foot चे feet हे रूप जाऊन foots कधी काळी येणे संभ-वनीय. माझ्या बोलीत पैसा, ससा ह्यांची अनेकवचनी रूपे पैसे, ससे अशी आहेत. 'त्याचे' ह्या शब्दात माझा च चा उच्चार ' त्याचा ' ह्या शब्दातील च सारखा आहे. चंद्र ह्या शब्दातील च सारखा नाही. पण माझ्या बायकोच्या बोलीत पैसा, ससा ह्यांची अनेक-वचनी रूपे पैशे, सशे अशी आहेत. तसेच त्याचे ह्या शब्दातील च चा उच्चार चंद्रातील

च सारखा आहे. ह्या उच्चारातील फरकांच्या भविष्याविषयी सांगायचे झाल्यास ससे, मासे, त्याचे हे माझ्या बोलीत आढळणारे उच्चार सशे, माशे, त्याचे (चेंडूसारखा च) असे होण्याची शक्यता जास्त; त्या मानाने सशे वगैरेंचे ससे होण्याची शक्यता कमी. जे लोक सशे म्हणतात ते लिहिताना ससे असेच लिहितात आणि तसाच लिहिलेला सर्वत्र पाहतात. परंतु जी भाषा आपण बोलभाषा म्हणून बोलायला शिकतो त्याविषयीच्या उच्चारपद्धती लहानपणीच बद्धमूल होत असल्यामुळे लेखनाचा परिणाम उच्चारावर होण्याची शक्यता फारच कमी असते.

भाषाशास्त्राच्या इतिहासाच्या ह्या प्रारंभिक काळात शास्त्रज्ञांचे लक्ष ध्वनि-परिवर्तनावर बराच काळ खिळले होते आणि त्याविषयीचे आकर्षण आजही कमी झालेले नाही. ह्याचे एक कारण असे की भाषेत जी ध्वनिपरिवर्तने घडून येतात त्यांचे नक्की स्वरूप किंवा प्रक्रिया कशी असते ह्याविषयी नीट विचार होण्यापूर्वीच ह्या ध्वनिपरिवर्त-नात एक विलक्षण नियमबद्धता ( regularity of phonetic changes ) असल्याचे आढळून आले आणि हा एक कुतूहलाचा विषय होऊन बसला. ही नियमबद्धता म्हणजे भाषेत जी काही ध्वनिपरिवर्तने घडून येतात ती कोणत्या तरी एका नियमानुसार सर्वत्र घडून येतात हे लक्षात येताच शास्त्रज्ञांनी एक सिद्धान्त रोखठोकपणे मांडला की, ध्वनिपरिवर्तनांच्या नियमांना अपवाद नाही ( phonetic laws know no exceptions ). परंतु नियमाला अपवाद असतोच ह्या सर्वसामान्य नियमाला वरील सिद्धांत अपवाद होऊ शकला नाही. ध्वनिपरिवर्तनाच्या नियमांनाही अपवाद असतात हे लक्षात आल्यावर त्या अपवादात काही सुसूत्रता आढळते का हे शास्त्रज्ञ तपासू लागले, आणि तशी सुसूत्रता पुष्कळ ठिकाणी आढळताच त्यांनी म्हटले की अपवादांनाही काही नियम आहे; प्रश्न आहे तो ते शोधून काढण्याचा. इंडोयुरोपियन भाषाकुलातील जर्मॅनिक उपकुलात ध्वनिपरिवर्तनविषयक जो एक नियम सापडला त्याला Grimm's Law म्हणू लागले. ह्या नियमाला जे ठळक अपवाद सापडले त्यांचे सुरेख आणि चटकन सर्व-मान्य होण्याजोगे स्पष्टीकरण व्हेर्नर ( Verner ) नावाच्या शास्त्रज्ञाने दिले. त्याला Verner's Law हे नाव मिळाले. ह्या शोधामुळे ध्वनिपरिवर्तनविषयक दृष्टिकोणाची बाजू बळकट झाली तरी phonetic laws know no exceptions ह्या आरोळीने जे वादंग निर्माण झाले ते कित्येक वर्षे टिकले. अगदी अलीकडे ब्लूमफील्ड ( Bloomfield ) ह्या भाषाशास्त्रज्ञाने वरील सिद्धान्ताचा खरा अर्थ नीट स्वच्छपणे आणि समर्पक उदा-हरणे देऊन स्पष्ट करण्याची मोठी कामगिरी केली आहे.

( ३ )

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस ज्या परिस्थितीत पाश्चात्य राष्ट्रांत भाषा-शास्त्रास सुरुवात झाली त्या परिस्थितीत ऐतिहासिक आणि तौलनिक अभ्यासपद्धती-

वर प्रथम काही वर्षे अभ्यासकांचे लक्ष केंद्रित होणे साहजिक होते. संस्कृत भाषेच्या ज्ञानामुळे तिच्यासह ग्रीक, लॅटिन इत्यादी भाषांचे एक भाषिक कुल स्थापन झाले आणि त्या भाषेच्या बुडाशी जी एक भाषा असल्याचे गृहीत धरले तिची पुनर्घटना करण्याकडे आणि तिच्यापासून ह्या कुलातील सर्व भाषांचा उद्गम व विकास कसा होत गेला हा इतिहास समजावून घेण्याकडे शास्त्रज्ञांचे सारे लक्ष लागले. एखाद्या प्रचलित भाषेचे तिच्या इतिहासाकडे लक्ष न देता ती जशी आहे तसे वर्णन करण्याकडे कुणी प्रवृत्त झाला नाही. भारतातही हीच परिस्थिती अनेक वर्षे कायम राहिली. भारत हे संस्कृतचे माहेरघर. शिवाय इथे संस्कृत ते अर्वाचीन उत्तर भारतीय भाषा ह्या फार लांबच्या इतिहासातले मधले दुवे प्राकृत व अपभ्रंश ह्या स्वरूपात जतन करून ठेवलेले. तेव्हा इथे मराठीचा अभ्यास म्हणजे सध्या जी मराठी बोलली जाते तिचा अभ्यास– तिचे ध्वनी कोणते, तिची शब्दरचना, वाक्यरचना कशी हा अभ्यास– होण्याऐवजी मराठीचा उद्गम व विकास ह्याविषयीच अभ्यासक बोलू लागले. ही परिस्थिती आपल्याकडे परवा परवापर्यंत टिकून होती. भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासासारखाच तिच्या प्रचलित स्वरूपाचा नुसता वर्णनात्मक अभ्यासही होऊ शकतो हे लक्षात घेऊन त्या दृष्टीने भाषेचा विचार पाश्चात्त्य राष्ट्रांत सुमारे पन्नास वर्षांपूर्वी सुरू झाला, आणि भारतात त्याचा प्रचार सुरू झाल्याला पंधरा–वीस वर्षेच झाली आहेत. पाणिनीने शब्दानुशासन लिहिताना संस्कृतच्या पूर्वेतिहासाकडे लक्ष दिले नाही हे उदाहरण डोळ्यांसमोर असूनही वर्णनात्मक व्याकरणाकडे दुर्लक्ष होण्याचे कारण जसे आपण देवांची गोष्ट निराळी, आपली निराळी असे म्हणतो तसेच संस्कृतची गोष्ट निराळी, मराठीची निराळी अशी काहीशी समजूत हे असावे. भाषाशास्त्राच्या वाटचालीचे वर्णन करताना सुरुवातीच्या कालखंडाला त्यानंतरच्या कालखंडाच्या मानाने इतकी जास्त पाने खर्ची पडावीत ह्याचे कारण आम्हांला हा दुसरा भाग फार नवीन आहे.

भाषा ही वस्तुतः ओघवती आहे. तिचा प्रवाह अखंड चालू असतो. तरीही ती अमुक एका वेळी स्थिर आहे अशी खोटी कल्पना करून तिच्या ह्या एककालिक स्थिर अवस्थेचे (तिच्या इतिहासाकडे पाठ फिरवून) व्याकरण लिहिण्याच्या पद्धतीला वर्णनात्मक भाषाशास्त्र (Descriptive Linguistics) किंवा भाषाविश्लेषण (Linguistic analysis) असे म्हणतात. ह्या पद्धतीचा उदयदेखील प्रथम युरोपात झाला आणि दुसऱ्या महायुद्धाच्या आगेमागे ती अमेरिकेत फार झपाट्याने वाढीस लागली. दुसऱ्या महायुद्धात अमेरिकन सैनिकांना निरनिराळ्या देशात पाठविण्यापूर्वी तिथल्या भाषांची त्यांना लवकरात लवकर तोंडओळख करून देण्यासाठी जी छोटी वर्णनात्मक व्याकरणे भाषाशास्त्रज्ञांच्या मदतीने तयार करण्यात आली त्या प्रयत्नात ह्या वर्णनात्मक व्याकरणपद्धतीचा चांगला उपयोग झाला. युद्धाच्या धामधुमीत इति-

हासाकडे लक्ष द्यायला कुणाला फुरसदच नव्हती. त्याखेरीज अमेरिकेत ह्या शास्त्राने मोठी मजल मारण्याचे कारण असे की, तिथल्या रेड इंडियन लोकांच्या ज्या विविध भाषा आहेत त्यांच्याकडेही शास्त्रज्ञांचे लक्ष गेले. ह्या रेड इंडियन लोकांचा तिथले मानववंशशास्त्रज्ञही अभ्यास करीत होते. त्यामुळे अमेरिकेत पुष्कळसे मानववंशशास्त्रज्ञ हे भाषाशास्त्रज्ञही झाले आणि भाषाशास्त्रज्ञ मानववंशशास्त्राचा अभ्यास करू लागले. भाषाशास्त्राच्या वाढीस ह्या दोन शास्त्रांच्या युतीचा फार मोठा फायदा झाला. भारतातही अनेक आदिवासी जमाती असताना असे दुहेरी शास्त्रज्ञ निर्माण झाले नाहीत हा एक चिंतेचा विषय आहे.

अमेरिकन इंडियन लोकांच्या भाषा ह्या इंडोयुरोपियन कुलातील भाषांपेक्षा अगदी निराळ्या. त्यांचा अभ्यास करताना त्यांची पूर्वस्वरूपे माहीत नसल्यामुळे त्यांच्या इतिहासात गुंतून पडण्याचे कारण नव्हते. त्यांच्या रचनेत नवे ध्वनी आढळून आले, शब्दांचे कितीतरी नवे नमुने पाहायला मिळाले, आणि ह्या सर्वांचा विचार करताना शास्त्रज्ञांच्या समोर निरनिराळे प्रश्न उभे राहू लागले. हे प्रश्न कसे सोडवावेत ह्याचा ऊहापोह होऊ लागला तेव्हा भाषेचे वर्णनात्मक विश्लेषण कसे करावे ह्या पद्धतीचे एक शास्त्र बनत चालले. भाषा बोलताना अनेक ध्वनी उच्चारले जातात. ह्यातले काही आपल्याला ' सारखे ' असल्याचे ऐकू येते, काही ' भिन्न ' असल्याचे वाटते. परंतु सारखे वाटणारे खरोखरच सारखे असतात का, आणि भिन्न वाटणाऱ्यांना खरोखरच भिन्न मानण्याची आवश्यकता आहे का, म्हणजे भाषेच्या दृष्टीने ते सर्व सारख्याच प्रमाणात कार्यक्षम आहेत की त्यातील काहींना एकत्र करून त्यांचा एक कार्यक्षम घटक ( phoneme ) मानणे शक्य आहे असा विचार होऊ लागला. उदाहरणार्थ, एखाद्या भाषेत शब्दाच्या सुरुवातीसच प हा वर्ण येत असला आणि स्वरमध्य अवस्थेतच ब हा वर्ण येत असला तर त्या भाषेसाठी हे दोन स्वतंत्र ध्वनी मानावेत की त्या दोघांचा मिळून एकच कार्यक्षम घटक मानावा हा विचार होणे योग्य होते. जेव्हा आपण आपल्याला परिचित असलेल्या भाषांच्या खेरीज इतर भाषा पाहू लागतो तेव्हा अशा सुरस आणि चमत्कारिक गोष्टी डोळ्यांसमोर येण्याची शक्यता असते, एरवी नाही. जी गोष्ट ध्वनींची, तीच शब्दस्वरूपाची. शब्दांचे प्रकृति–प्रत्ययात्मक विश्लेषण झाले तरी ह्या प्रकृतींची आणि प्रत्ययांची जी निरनिराळी रूपे प्रयोगात आढळतात त्या सर्वांना भिन्न मानण्याचे कारण नसते. उदाहरणार्थ, संस्कृत वाच् ह्या शब्दाच्या रूपात वाच्–वाक्–वाग् अशी तीन रूपे आढळत असली तरी त्या तीन निरनिराळ्या प्रकृती मानण्याचे कारण नाही; सप्तमी बहुवचनी सु व षु अशी ध्वनिदृष्ट्या दोन भिन्न रूपे आढळत असली तरी ते दोन स्वतंत्र प्रत्यय मानण्याची गरज नाही. मग हे सर्व कोणत्या तत्त्वावर ठरवायचे ह्या विषयीचे नवे प्रश्न नव्या भाषा तपासताना येऊ लागले आणि त्याविषयीचे नियम बनू लागले. ह्या नियमांच्या आधारे आता कोणत्याही

भाषेचा वर्णनात्मक अभ्यास करण्यास आणि तिचे नव्याने व्याकरण लिहिण्यास अभ्यासकांना एक साधन उपलब्ध झाले आहे.

काही काळपर्यंत तरी अमेरिकेतील आणि इतर देशांतील भाषाशास्त्रज्ञांचे सर्व लक्ष ह्या पद्धतीने आकर्षून घेतले आणि ह्या नव्या पद्धतीने केलेली अनेक ज्ञात-अज्ञात भाषांची वर्णने अभ्यासकांच्यापुढे आली. पीएच्. डी. पदवीसाठी एखादी भाषा निवडून तिचे अशा प्रकारचे वर्णनात्मक व्याकरण लिहावयाचे ही एक टूमच निघाली. ह्या वर्णनासाठी प्रथम ती भाषा ज्यांची मातृभाषा असेल अशांच्याकडे जाऊन त्या भाषेचे नमुने गोळा करण्यात येत. ' – कडे जाऊन ' ह्याला फार महत्त्व आहे. त्यासाठी अभ्यासकाला ती भाषा बोलणाऱ्यांच्या वस्तीत जावे लागते आणि तिथल्या नैसर्गिक वातावरणात ती भाषा कशी वावरते हे पाहण्यास मिळते. मानववंशशास्त्राच्या दृष्टीनेही अनायासे काही माहिती गोळा करता येते हा फायदा निराळाच. हे नमुने ज्यांच्याकडून घ्यायचे त्यांची निवड जरा काळजीपूर्वक करावी लागते. मला गुजराती येते म्हणून पुण्यात बसून माझ्याकडून त्या भाषेचे नमुने मिळवायचे नाहीत, आणि माझे बालपण गुजरातेत गेले म्हणून माझ्याकडून मराठीचेही नमुने घ्यायचे नाहीत. गुजरातीचे बोलभाषा म्हणून वर्णन करायचे असले तर तिच्या ग्रांथिक रचनेवरही अवलंबून राहायचे नाही. असे काही निर्बंध पाळून वर्ण्य भाषेचे सहज दैनंदिन बोलीत देणारे नमुने मिळवले की त्यांच्या आधारावर वर्णनात्मक पद्धतीच्या नियमानुसार त्या भाषेचे कार्यक्षम ध्वनी व त्यांचे प्रकार, त्या भाषेची रूपसिद्धी ही निश्चित करायची आणि एक छोटासा शब्दकोश आणि भाषेचे काही नमुने एवढे त्यात घालून प्रबंध तयार करावयाचा. अशा तऱ्हेची वर्णने तयार होत असतानाच ही पद्धती अधिकाधिक निर्दोष होऊ लागली. सर्वसामान्यपणे अशा वर्णनात भाषेत येणाऱ्या वाक्यांच्या रचनेविषयी विचार फारसा नसे. ध्वनिविचार व शब्दविचार हीच वर्णनाची प्रधान अंगे मानली गेली होती.

वर दिलेल्या पद्धतीने केलेल्या भाषेच्या वर्णनात काही उणिवा राहून जाणे शक्य होते. आपण केलेले वर्णन गोळा केलेल्या नमुन्यापुरते ठीक असेल. पण त्याला भाषेचे संपूर्ण वर्णन कसे म्हणता येईल ? हे नमुने म्हणजे समग्र भाषा नव्हे. कितीही काळजीपूर्वक ते गोळा केलेले असले तरी अभ्यासकाच्या दृष्टीतून भाषेचे काही नमुने, काही आविष्कार सुटणे शक्य आहे. तेव्हा भाषाशास्त्रज्ञांना हे नमुन्यावर आधारलेले आणि म्हणून अपूर्ण असू शकणारे व्याकरण भाषेचे संपूर्ण वर्णन करण्यास असमर्थ वाटू लागले. त्याचबरोबर भाषेचे ध्वनी व शब्द ह्याखेरीज – किंवा ह्यांचेच बनलेले – वाक्य हे जे अंग आहे त्याचा विचार करताना असे लक्षात आले की, भाषा बोलणारी व्यक्ती ठराविकच वाक्ये बोलते आणि ठराविकच वाक्ये ऐकते असे असत नाही. त्या व्यक्तीला ती भाषा येते ह्याचा अर्थच असा की, त्या भाषेच्या व्याकरणाच्या आधारे

ती व्यक्ती त्या भाषेतली अनेकविध वाक्ये बनवू शकते आणि ती भाषा बोलणाऱ्यांनी अशी वाक्ये बनवली तर त्यांचा अर्थ सहज समजू शकते. मूल देखील भाषा शिकते तेव्हा आई-वडिलांच्या तोंडून ऐकलेली वाक्ये तेवढीच समजण्याचे ज्ञान मिळवत नाही. पूर्वी कधीही न ऐकलेली वाक्ये ते नित्य नव्याने ऐकत जाते, त्यांचा अर्थ समजत असते, आणि स्वतः देखील पूर्वी न ऐकलेली, न बोललेली वाक्ये बोलत जाते आणि ती ऐकणारे त्यांचा अर्थ समजू शकतात. अशा वाक्यांतली बहुसंख्य वाक्ये आपण आयुष्यात एखाद्याच वेळेस बोलत असतो, ऐकत असतो आणि तरीही त्यांचा अर्थ समजण्यास आपणास त्रास होत नाही.

हे कसे होते ! हे कसे होते ते समजण्याचा ज्यांनी प्रयत्न केला त्यांनी प्रथम भाषेचे ज्ञान ( competence ) आणि तिचा उपयोग ( performance ) ह्यात फरक असल्याचे निदर्शनास आणून दिले. आजपर्यंत जो भाषाशास्त्रविषयक विचार झाला तो भाषेचा जो प्रत्यक्ष उपयोग होतो, प्रत्येक व्यक्तीच्या तोंडून ती जशी बोलली जाते त्या बाजूचा झाला. परंतु उपयोग म्हणजे ज्ञान नव्हे. तेव्हा भाषा बोलणारी व्यक्ती वाक्यविषयक जे चमत्कार करीत असल्याचे वर म्हटले आहे त्याचे मर्म समजून घ्यायचे असले तर भाषेचे 'ज्ञान' असणे म्हणजे काय हे समजून घ्यायला हवे. एखाद्या भाषेचे वर्णन करायचे झाल्यास ते ह्या ज्ञानाचे वर्णन करायला हवे, उपयोगाचे नव्हे असे वाटू लागले. ह्या नव्या दृष्टीने भाषाशास्त्रज्ञांनी भाषेच्या वर्णनाची जी पद्धत स्वीकारली ती अलीकडच्या काळात वाक्यप्रक्रियात्मक व्याकरण (transformational grammar) ह्या स्वरूपात पुढे आली आहे. ह्या व्याकरणाचे स्वरूप सामान्यपणे सांगायचे झाल्यास असे म्हणता येईल की, ज्याप्रमाणे शून्यापासून नवापर्यंत दहा संख्या आपल्याला दिल्या आणि त्यांच्या मांडणीने दुसऱ्या संख्या बनविण्याचे नियम समजावून दिले तर त्यापासून आपण जशा अक्षरशः अपरिमित संख्या बनवू शकतो, कोणी बनविल्या तर त्यांचा बिनचूक अर्थ सांगू शकतो, तसेच एखाद्या भाषेची मूलभूत वाक्ये आणि तिचा शब्दसंग्रह आपल्याला दिला आणि त्या मूलभूत वाक्यापासून दुसरी वाक्ये कशी करायची हे वाक्यपरिवर्तनाचे नियम सांगितले तर आपल्याला त्या भाषेतील अपरिमित वाक्ये बनविता येतात, कोणी बनविली तर समजता येतात.

ह्या नववैयाकरणांच्या मते एखाद्या भाषेचे वर्णन करायचे म्हणजे तिचे नमुने गोळा करून त्या आधारे ध्वनिविचार, शब्दविचार आणि केलाच तर थोडासा वाक्यविचार करायचा असे नसून त्या भाषेत वाक्यपरिवर्तनाच्या प्रक्रियेचे जे नियम आहेत ते शोधून काढायचे आणि ते व्यवस्थितपणे मांडायचे हे आहे. हे वाक्यप्रक्रियात्मक व्याकरण ध्वनीपासून वाक्याकडे जात नाही, वाक्यापासून ध्वनीकडे येते. मूलभूत वाक्य किंवा परिवर्तित वाक्य, किंवा आपल्याला परिचित असलेल्या शब्दात सांगायचे तर प्रकृतिवाक्य व विकृतिवाक्य, हे जेव्हा प्रत्यक्ष बोलले जाते तेव्हा ते ज्या स्वरूपात तोंडातून

बाहेर पडते ते सांगण्याच्या वेळी ध्वनींचा विचार करावा लागतोच. पण तो असा शेवटी, आधी नव्हे. आधी वाक्यपरिवर्तनाच्या प्रक्रियेचा विचार. ह्याविषयीचे जे नियम तेच खरे त्या भाषेचे वर्णन, ते नियम माहीत असणे म्हणजेच ती भाषा येणे होय. ह्या नियमांत जेव्हा बदल होतो तेव्हा भाषेत बदल झाला असे म्हणता येते. क्वचित प्रसंगी एखादे वाक्य कुणी चुकीचे बोलला तर तेवढ्याने लगेच वाक्यविषयक नियमात बदल होत नाही. पण त्याची ती ' चूक ' जर सर्वमान्य झाली, सर्वच लोक जर तसे बोलू लागले तर मग तो बदल एखाद्या वैयक्तिक आविष्कारापुरता मर्यादित राहात नाही. तो सर्वसामान्य होतो आणि मग वाक्यविषयक नियमांत बदल झाला असे आपल्याला म्हणता येते. एका वाक्यापासून दुसरी वाक्ये साधणाऱ्या ह्या प्रक्रियेस वाक्यवृत्ती असे म्हणता येईल.

मराठीचे असे वाक्यवृत्तिपर वर्णन करायचे झाल्यास " मी भात खातो " असे एखादे मूळवाक्य कल्पून त्यापासून " मी भात खात नाही" " मी भात खावू का ? " " मी भात खाईन " " मी भात खाल्ला " " मी मऊ भात खातो " इत्यादी अनेकविध वाक्ये कशी बनविता येतात त्याविषयीचे नियम सांगावे लागतील. ते नियम ज्याला येतात त्याला मराठी भाषा येते. त्याने मग पूर्वी कधीही न पाहिलेला, न ऐकलेला पदार्थ जरी पानात पाहिला तरी तो " मी X खातो " असे वाक्य सहज उच्चारू शकेल. " मी भात खातो " ह्याचे नकारात्मक वाक्य "मी भात खात नाही" ( म्हणजे मी कधीच भात खात नाही. आरोग्याच्या दृष्टीने मला तो मानवत नाही ), आणि " मी दार उघडतो " ह्याचे नकारात्मक वाक्य " मी दार उघडत नाही " ( म्हणजे एखाद्या विशिष्ट वेळेपुरते ते उघडत नाही ) ह्या दोन नकारात्मक वाक्यांत रचनेच्या दृष्टीने सादृश्य असले तरी अर्थाच्या दृष्टीने जो फेर आहे तो ह्या परिवर्तनात्मक प्रक्रियेला स्पष्ट करून दाखवता आला पाहिजे. ह्या पद्धतीत भाषेचा कुठलाच भाग विचाराबाहेर राहता कामाचा नाही, विचारात घेतलेला कुठलाच भाग संदिग्ध राहता कामाचा नाही. ह्या पद्धतीने भाषेचे खरेखुरे समग्र वर्णन ( total accountability ) व्हायला हवे.

भाषा ह्या अनेक असल्या तरी भाषेसंबंधीची काही तत्त्वे सामान्य ( linguistic universals ) असू शकतात. जसे, प्रत्येक भाषेत स्वर, व्यंजनासारखे ध्वनी असायलाच हवेत हे एक सर्व भाषांत आढळणारे सामान्य तत्त्व म्हणता येईल. तसेच प्रत्येक भाषेला वाक्यरचनेचे व्याकरण हे असायलाच हवे असेही एक सामान्य तत्त्व गृहीत धरता येते. वाक्यप्रक्रियात्मक व्याकरणाचा पुरस्कार करणाऱ्या भाषाशास्त्रज्ञांना असे वाटते की, जर प्रत्येक भाषेची ही वाक्यवृत्ती आपल्याला सांगता आली तर त्यांच्यापासून एका सर्वसामान्य " भाषेचे " प्रक्रियात्मक व्याकरण आपल्याला मांडता

येईल आणि मग प्रत्येक भाषेचे व्याकरण हे त्या 'भाषातत्त्वाचे–शब्दतत्त्वाचे– विशिष्ट रूप, त्याचाच एका विशिष्ट लोकसमूहात झालेला आविष्कार असे म्हणता येईल. मूल जेव्हा जन्माला येते तेव्हा ते हे भाषातत्त्व बरोबर घेऊनच येते. भाषेचे ज्ञान मिळविण्याची क्षमता त्याच्याजवळ असते. जन्मल्यानंतर आजूबाजूला बोलली जाणारी भाषा ऐकून ते त्या भाषेचे स्वरूप निश्चित करते. हे झाले म्हणजे आपण म्हणतो मुलाला भाषा येऊ लागली. मूल त्याला नकळत हे भाषेचे ज्ञान कसे मिळवते त्याची फोड करून सांगणे म्हणजेच एखाद्या भाषेचे प्रक्रियात्मक व्याकरण करणे होय. हा सर्व फार मोठा खटाटोप आहे. असे प्रक्रियात्मक व्याकरण एखाद्या भाषेचे कधीकाळी लिहून होईल की नाही ह्याचीही खात्री वाटत नाही. पण त्याची भाषाशास्त्रज्ञाला चिंता नाही. आपल्याला काय हवे आहे एवढे नीट कळले तरी पुष्कळ असे ते म्हणतात.

*

## नवे आजीव सभासद

साहित्य–पत्रिकेच्या नव्या स्वरूपामुळे परिषदेच्या आस्थेवाईक सभासदांची संख्या गेल्या काही महिन्यांत सतत वाढत आहे. त्यामुळे अशा काही आस्थेवाईक व्यक्तींना आजीव सभासद करून घेण्याचा प्रयत्न करण्यात आला. त्याला चांगलाच प्रतिसाद मिळत आहे. गेल्या दोन महिन्यातील नवे आजीव सभासद पुढीलप्रमाणे:

□ १. प्रा. य. दि. फडके, मुंबई □ २. सौ. शिरीष पै., मुंबई □ ३. श्री. पु. वि. बेहरे, पुणे □ ४. सौ. सुमन बेहरे, पुणे □ ५ प्रा. श. गो. कुलकर्णी, कोल्हापूर □ ६ श्री. शं. अ. भावे, पुणे □ ७ श्री. श्री. ग. माजगावकर, पुणे □ ८ श्री. प्रकाश दा. रानडे, पुणे □ ९ श्री. म. ल. आपटे, मद्रास □ १० श्री. बा. बा. बेरी, पुणे □ ११ श्री. बा. श्री. बेरी. पुणे □ १२ श्री. वसंत ना. गोगटे, पुणे □ १३ श्री. मा. गो. जोशी, पुणे □ १४ श्री. वसंत शांताराम देसाई, पुणे □ १५ श्री. रमाकान्त ग. मोदी, पुणे □ १६ श्री. पी. सावळाराम, ठाणे, □ १७ श्री. चि. शं. जोशी ठाणे □ १८ प्रा. पद्माकर सावरकर, नाशिक □ १९ श्री. ज. श्री. नागपूरकर, पुणे □ २० प्रा. सुरेश डोळके, नागपूर □ २१ श्री. निनाद विष्णु माटे, पुणे □ २२ प्रा. रवीन्द्र घवी, पणजी. □ २३ डॉ. प्रा. सौ. गार्गी भाटवडेकर, मुंबई.

# न पचलेले नाटक

रमेश वा. धोंगडे

श्री. तेंडुलकरांच्या 'शांतता! कोर्ट चालू आहे' या नाटकाचे परीक्षण करण्याचा या लेखाचा हेतू नाही. 'भ्रूणहत्ये'सारखा सनसनाटी पण जुना विषयच श्री. तेंडुलकरांनी यात हाताळला आहे. प्रस्तुत लेखाचे प्रयोजन या हाताळण्यातील 'नावीन्या'चा शोध घेणे इतकाच आहे. ते करताना श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या केसरीतील (रविवार, ५ डिसें. १९७१) या नाटकावरील लेखाचाही मागोवा घेतला आहे. या लेखात डॉ. श्रीराम लागू यांचा उल्लेख आला आहे तो त्यांनी या नाटकाला दिलेल्या प्रस्तावनेच्या (आवृत्ती दुसरी, १९७१) संदर्भात.

श्री. पाध्ये यांना मुख्यत्वे खुपले ते बेणारेचे 'लाचारीचे स्वगत'. वस्तुतः श्री. पाध्यांना हव्या असलेल्या 'डिफायन्स'ची बीजे बेणारेच्या स्वभावात आहेत. पहिल्याच अंकाच्या अगदी सुरुवातीला ती म्हणते, 'मी माझं काय करायचं ते हे कोण ठरवणार? माझं आयुष्य हे माझं आहे—नोकरीसाठी विकलेलं नाही मी ते कुणाला. माझी मर्जी ही माझी आहे—माझी इच्छा ही माझीच आहे. ती कुणी नाही मारू शकणार—कुणी नाही. माझं, माझ्या आयुष्याचं मी काय हवं ते करीन! मी ठरवीन माझं—' '... आपलं आयुष्य संपलं तर काय कुणी स्वतःचं द्यायला येणार आहे?... आयुष्य कुणासाठी नसतं. ते स्वतःसाठीच असतं. असलं पाहिजे...'

पण बेणारेची ही बंडखोर वृत्ती वरवरची आहे. ती एक सामान्य स्त्री आहे. नीति-अनिती, पाप-पुण्य या पारंपरिक कामनांचा फोलपणा तिला जाणवला आहे. पण जगाच्या बाजारातील त्यांची प्रतिष्ठा आणि त्यांचे क्रौर्य याचीही तिला कल्पना आहे. त्या निष्ठुर जगाशी लढण्याची, त्याला झटकून टाकण्याची निष्फळ खटपट ती करते

आहे. पहिल्या अंकातील तिचे वरील उद्‌गार आणि श्री. लागू म्हणतात ते ' वाह्यात-पणाकडे झुकत असलेले ' तिचे वागणे हे याच निष्फळ प्रयत्नाचे द्योतक आहेत.

' अभिरूप न्यायालया 'च्या रूपाने अकस्मातपणे ती या मुर्दाड जगाच्या पिंजऱ्यात सापडते. आपण सापडलो आहोत याची जाणीव होताच ती त्यातून बाहेर पडण्याचा प्रयत्नही करते. सामंतांच्या साक्षीच्या वेळी ती म्हणते : ' बस्स करा ! ... हे – सगळं मोडूनतोडून टाकीन — चक्काचूर होईल सगळा — ' पण दार बंद झाल्याने ती बाहेर पडू शकत नाही. ती आता पुरती पिंजऱ्यात सापडली आहे. आणि तिसऱ्या अंकात लुटुपुटीचा ठरवलेला आरोप खरा ठरला आहे. बेणारे मनातून ज्याला भीत होती ते घडलं आहे. तिचं गुपित उघडं झालं आहे. आणि काशीकरांच्या रूपाने— अभिरूप न्यायसभेतील जजाच्या रूपाने — व्यावहारिक जगाने तिला दिलेली शिक्षा काय असेल याचे दारुण चित्र तिच्यासमोर उभे केले आहे.

खेळ आणि वास्तव, लुटुपुटीची शिक्षा आणि या जगातील न्याय यांच्यातील सीमारेषा बेणारेच्या दृष्टीने पुसल्या गेल्या आहेत. ती खेळ विसरते — स्वतःचे भान हरपते आणि तिच्या पोटी असलेला जीव नष्ट करायला तयार असलेल्या निष्ठुर जगापुढे उभी राहते — गुन्हेगार म्हणून. बेणारेचे स्वगत हे या अर्थाने वेगळे आहे. ते या जगाशी बोलणे आहे. तिच्या दडपल्या गेलेल्या विचार व भावनांचा तो उद्रेक आहे. तिच्या हातून घडलेल्या गोष्टी आणि जगाची त्याकडे पाहण्याची अघोरी दृष्टी यांनी ती अवाक बनली आहे. याच संभ्रमात ती उद्वेगाने म्हणते आहे, ' मिलॉर्ड, जीवन ही एक महाभयंकर गोष्ट आहे. जीवनाला फाशी दिले पाहिजे ! ' जीवनाचं विष तिनं प्यायलं आहे पण त्याचा उपद्रव इतरांना होऊ दिला नाही. ' जगत होते मी तेच. पोळून निघत होते. पण आहे कुणाला माहीत, मी हे नाही ह्या कोवळ्या कोवळ्या जीवांना शिकवलं. हे विष मी पचवलं. त्याचा ओझरता भासही नाही त्यांना लागू दिला. ' ती दिङ्मूढ झाली आहे ते संस्कृतीच्या बुरख्याआड लपलेल्या ' अतृप्त, रानटी माणसां-च्या अवशेषां 'नी. त्यांची तिला भीती वाटते. कारण त्याच्याइतके सामर्थ्य तिच्यात नाही— मी एकाकी आहे. तिच्या नैसर्गिक प्रेमभावनेला याच क्रूर जगानं ' पाप ' ठरवलं होतं. तिनं मामावर प्रेम केलं तेव्हा ' अवघी चौदा वर्षांची होते रे मी. पाप काय असतं तेही नव्हतं ठाऊक मला. ' तिनं जगाविरुद्ध तेव्हा बंड पुकारलं होतं. पण काय उपयोग झाला त्याचा ? ' माझा पुरुष शेपूट घालून पळाला. ' पण ती खचली नाही. तिनं परत प्रेम केलं— जाणतेपणी. हेही प्रेम शुद्ध होतं— ती भक्ती होती. पुन्हा यातही अपयश. कारण ? कारण तिचा देव ' माणूस 'च होता. दोन्हेही पुरुष तिला ओरबाडून रक्त काढून भ्याडपणानं पळून गेले.

दोनही प्रेमात बेणारे फसली ते तिच्या शरीरामुळं. तिला शरीराचा राग येतो. पण लगेच तिला वाटतं, ' तू तरी ते नाकारून कुठं जाशील ? कृतघ्न नको होऊस. त्यानंच

जळत तुला एक अतिशय सुन्दर, खूप स्वर्गीय, तृप्त क्षण दिला होता.' तिला ते हवं आहे—तिच्या पोटातील कोवळ्या जिवासाठी !

बेणारेचं हे स्वगत परत मूळ निश्चयावरच थांबतं. फक्त फरक इतकाच की, ह्या निश्चयामागची उथळ बंडखोरी जाऊन त्याला कारुण्याची झालर येते. बेणारेचे स्वगत लाचारीचे नाही, ते करुण आहे. श्री. तेंडुलकरांनी वस्तुतः दोन मोह फार समजूतदार-पणानं टाळले आहेत. एक बेणारेला कृत्रिमरीत्या बंडखोर करण्याचा आणि दुसरा तिच्या कारुण्याला तत्त्वज्ञानाची बैठक देण्याचा. प्रत्यक्षात बंडखोरी न पेलणारी, 'अशी एखादी लढाई असते जिचा शेवट असतो फक्त पराभव' अशी क्वचित खिन्न ओळ गुणगुणणारी, कधी अवखळपणे नाचणारी, कधी प्रतिपक्षाला टोमणे मारणारी तर कधी ज्याची भीती वाटते, तीच गोष्ट घडू पाहात आहे असे दिसताच अश्रू गाळणारी बेणारे ही एक सामान्य स्त्री आहे. आणि ती सामान्यच राहते. खरं म्हणजे या नाटकात कारुण्य प्रकर्षानं जाणवतं ते तिच्या सामान्यत्वामुळेच. हे कारुण्य जाणवण्याचं नाटकाचं यश बेणारेला समजून घेतलं तर विसंवादी वाटू नये.

बेणारेला बंडखोर बनवून एक नवीनच नाटक निर्माण झालं असतं असं श्री. पाध्ये कबूल करतात. पण बेणारेला तसं बनवणं हे खरोखरीच अधिक परिणामकारक झालं असतं काय? शॉ किंवा इब्सेन यांची नाटके तत्कालीन समाजाला नवीन होती म्हणूनच ती गाजली. त्यांनी आव्हान दिलं ते तत्कालीन समाजाच्या सनातनीपणाला. पण प्रत्येक पिढीचे सनातनत्व वेगळे असते. इब्सेनच्या बंडखोर नायिका मराठीतही अवतरल्या. थोड्या फार गाजल्या. पण आता त्यांची बंडखोरी ही बंडखोरीच वाटत नाही. याचे उत्तम उदाहरण म्हणजे अत्र्यांचे 'जग काय म्हणेल?' आणि 'घराबाहेर.' आधुनिक मानवी जीवन इतके गुंतागुंतीचे झाले आहे आणि किमानपक्षी आधुनिक इंग्रजी नाटककार मानवी मनाचा खोलवर विचार करण्यात इतके पुढे गेले आहेत की, त्यापुढे जुन्या नाटकांतील बंडखोरी कृत्रिम वाटते आणि क्वचित बालिशही. गाल्स-वर्दीचा भांडवलशाही विरुद्धचा आक्रोश नाटकी वाटतो, पिटा वाटतो. याउलट 'डेथ ऑफ अ सेल्समन' सारखे मिलरचे याच विषयावरील 'न ओरडणारे' नाटक अधिक प्रभावी वाटते. बेणारेच्या बंडखोरीने श्री. तेंडुलकर १९३० ते १९६० च्या मराठी नाटककारांच्या पंक्तीत जाऊन बसले असते आणि मग ते नाटक पडलं असतं तर ते केवळ आजचा प्रेक्षक 'सनातनी वृत्तीचा' आहे म्हणून नव्हे तर श्री. तेंडुलकरही 'सनातनी बंडखोर' राहिले म्हणून !

बेणारेची अंदरकी बात फक्त पोंक्षे आणि रोकडे यांना ठाऊक आहे. काशीकरांना थोडी कुणकुण लागली आहे. अशा परिस्थितीत बेणारे अभिरूप न्यायसभेच्या कार्य-क्रमाला येते हे श्री. पाध्ये यांना पटत नाही. पण 'जागृति-सभे'च्या सर्वच सभासदांना बेणारेचे गुपित ठाऊक नाही. दुसरे असे की 'जागृति-सभा' आणि बेणारेची शाळा

यांचा अर्थाअर्थी काही संबंध नाही. जी बेणारे पोटात 'पाप' असता नोकरीवर जाण्यास — निदान तिला काढून टाकेपर्यंत तरी — भीत नाही. तिनं 'जागृति-सभे'ला का भ्यावं ? शिवाय अभिरूप न्यायसभेत तिच्यावरच आरोप ठेवतील आणि तोही भ्रूण-हत्येचा याची कोणालाच कल्पना नसते. मंडळाचं सभासदत्व झटकून टाकणाऱ्या बेणारेनं मग नोकरीचाही राजीनामा दिला असता, आणि बेणारेनं तो द्यावा असं काशीकर म्हणतात. तिनं तसं न वागणं हा 'अक्षम्य ताठा' आहे. पण काशीकरांच्या मनाची खरी किंमत काय हे प्रेक्षक वा वाचक चांगले जाणतातच.

प्रत्यक्ष 'भ्रूणहत्ये'चा आरोप ठेवल्यावरही बेणारे तो सहन का करते ? याला एक उत्तर असे की, तिची पहिली प्रतिक्रिया ही प्रामाणिक व स्वाभाविक आहे. नाटक-काराच्या शब्दात सांगायचे झाल्यास या आरोपाने ती 'सुन्न' होते. पण जेव्हा 'हा एक खेळ आहे' असे सारे म्हणतात तेव्हा तीही स्वतःला सावरते. तिची ही धडपडही स्वाभाविकच आहे. ज्या गोष्टी समाजाला सांगण्याचे भय वाटते ह्या लपविण्याची संधी कोणती सामान्य स्त्री सोडेल ? शिवाय यापूर्वीच्या प्रसंगातून आपले रहस्य लपविण्याचा तिने सतत प्रयत्न केला आहे. सुखात्म्यांशी बोलताना नवऱ्याचा विषय ती टाळते; सौ. काशीकरांच्या 'शाळा काय म्हणतेय तुझी ?' या प्रश्नाला सावधपणे 'काही नाही म्हणत' असे म्हणून निरुत्तर करते. प्रोफेसर दामल्यांचा विषय निघताच आपले तिकडे लक्षच नाही असे दाखवते; आणि पोंक्षयांनी काढलेला त्यांच्याशी लग्न करू इच्छिणाऱ्या मैत्रिणीचा विषयही ती चाणाक्षपणे टाळते.

पण बेणारेच्या नकळत हा खेळ तिचा जीव घेणारा ठरतो. इतक्या आकस्मित-पणे की 'माझ्यावर जाणूनबुजून काहीतरी डाव टाकलाय तुम्ही ! कट रचलाय !' तशी शंका येताच ती ओरडते. ती यातून निसटू पाहते— उघडपणे. पण आता फार उशीर झालेला असतो. ती पिंजऱ्यात अडकलेली असते. नाटकाचा दुसरा अंक हा असा प्रेक्षकालाच सुन्न करून संपतो. तिसरा अंक म्हणजे हे क्रूर जग पिसाटपणे बेणा-रेची पिसं उपटून तिला रक्तबंबाळ कसं करतं याचं प्रात्यक्षिक आहे. या नाटकाची भीषणता आहे ती या अकस्मात उफाळलेल्या क्रौर्यात आणि त्याचं कारुण्य आहे ते बेणारेच्या असहाय, एकाकी प्रतिकारात.

जाता जाता आणखी एक मुद्दा सुचतो. तो असा की 'भ्रूणहत्ये'च्या आरोपानं बेणारेनं का घाबरावं ? कारण प्रत्यक्षात ती तर तिच्या मुलाला जगवणार आहे.

श्री. पाध्ये यांच्या मते हे नाटक 'अंतर्यामी सनातनी असलेल्या समाजाला भावतं.' माझ्या मते तर हे नाटक श्री. पाध्ये म्हणतात त्याप्रमाणे 'शेव्हिअन' असतं तरच जास्त भावलं असतं. आणि आहे या रूपात ते मराठी प्रेक्षकांना भावलंच नाही असं श्री. लागू म्हणतात. 'मराठी प्रेक्षकांनी ते फेकून दिले'. त्याचे 'फक्त तीस एक

प्रयोग व्हावेत हे आमच्या करंटेपणाचे लक्षण आहे.' 'भारतीय नाट्यसंस्था 'ने जेव्हा त्याचा सन्मान केला तेव्हा कुठे मराठी प्रेक्षकाला जाग आली. श्री. पाध्ये म्हणतात तो लोकप्रियता या नाटकाला अशी उत्स्फूर्तपणे मिळालेली नाही; थप्पड बसल्यानंतर 'आम्हालाही समजते' असे दाखविणाऱ्या रसिकांची ती धडपड आहे.

विचाराच्या दृष्टीने श्री. पाध्ये यांच्या लेखाहून अगदी विरुद्ध पण शेवटी तोच प्रमाद करणारा श्री. पाटणकर यांचा लेख आहे (आलोचना, जाने.१९६९) श्री. पाध्ये यांची तक्रार बेणारे 'शेव्हिअन टाईप' नाही अशी तर श्री. पाटणकरांच्या मते बेणारे स्वतःला 'जोन ऑफ आर्क' समजते.

श्री. पाटणकरांनी बेणारेच्या स्वभावाचे केलेले विश्लेषण असे: ती मुख्य व्यक्तिरेखा आहे, पण ही जबाबदारी पेलणारे व्यक्तिमत्त्व तिला नाही. इतर पात्रांच्या खुजेपणाची जाणीव तिला आहे, इतकेच नव्हे तर स्वतःला ती इतरांपेक्षा निराळी समजते. ज्याला मी 'वरवरची बंडखोरी' म्हटले त्याला श्री. पाटणकर 'पोज' म्हणतात. श्री. पाटणकरांच्या मते या 'पोज'ने नाटककार 'बनला', उलट श्री. पाध्यांना तो पुरता 'बनला' नाही याची रुखरुख वाटते.

श्री. पाटणकर पुढे म्हणतात की, बेणारे 'स्वप्नरंजना'त रमते. पण हे स्वप्न शेखमहंमदी आहे. त्याला सामाजिक मूल्य नाही. गंमत अशी की, आर्थर मिलरच्या 'द डेथ ऑफ् अ सेल्समन' वर नेमकी हीच टीका काही टीकाकारांनी केली. आर्थर मिलरने ही टीका फेटाळताना म्हटले, 'The truly valueless man, a man without ideals is always perfectly at home anywhere.' त्याच्या नाटकातील मुख्य व्यक्तिरेखा अर्थातच अशी perfectly at home नाही. श्री. पाटणकर ज्याला उपहासाने 'पोज' म्हणतात ती बेणारेची बंडखोरी नेमके हेच दाखवते. नाटकातील मुख्य व्यक्तिरेखा 'असामान्य' असावी या हट्टापेक्षा जरा खालच्या पट्टीवरच त्या व्यक्तिरेखेला सामाजिक मूल्य असावे हा हट्ट आहे इतकेच.

पण श्री. पाटणकरांचा तसा उघडपणे हट्ट नाही. बेणारेच्या 'आत्मकेंद्रित स्वप्नाळूपणा' ला त्यांची हरकत नाही. येथपर्यंत त्याचा ऊहापोह करण्याचे कारण एकच. श्री. पाटणकर करतात ते बेणारेच्या स्वभावाचे विश्लेषण बरोबर नाही. ज्यामुळे श्री. पाध्यांना नाटकाचे यश 'विसंवादी' वाटते त्यामुळे श्री. पाटणकरांना बेणारेचे व्यक्तिमत्त्व खुजे वाटते.

बेणारेची आहे ती व्यक्तिरेखा ठेवून श्री. पाटणकरांच्या मते नाटक चांगले झाले असते. मात्र त्यासाठी श्री. तेंडुलकरांनी बेणारेची कीव करण्याचा मोह टाळायला हवा होता. तीही इतरांइतकीच क्रूर आहे असे सुचवायला हवे होते. या लेखेस तिला संधी मिळाली नाही इतकेच. श्री. पाटणकर म्हणतात त्याप्रमाणे नाटक लिहिले गेले असते तर

कदाचित ते चांगले झाले असते वा नसते. मुख्य मुद्दा असा की, आहे त्या स्वरूपात नाटकात आणखी काय उणीव आहे ? श्री. पाटणकरांच्या मते नाटककाराने दुसऱ्या अंकापासून बेणारेला ' निरपराध जीव ' ठरवले आहे, तिच्याविषयी सहानुभूती निर्माण केली आहे, तिची शेवटची कैफियत म्हणजे ' हिस्टेरिकल ' पद्धतीने मांडलेले सोपे विचार, — थोडक्यात तिला हौतात्म्य दिले आहे.

या संदर्भात बेणारेच्या स्वगताचा पुनर्विचार करू. एखाद्या हुतात्म्याला शोभतील असे विचार या स्वगतात नाहीत. खुद्द श्री. पाटणकरच बेणारे ' अपरिपक्व ' मनाची आहे असे म्हणतात त्यामुळे ते शक्यही नाही. बेणारेचे स्वगत थोडेसे ' हिस्टेरिकल ' आहे हे खरे, पण त्यामुळे काही बिघडत नाही. सामान्य माणसे अशा वेळी हिस्टेरिकल पद्धतीनेच वागतात व विचार करतात. बेणारे तर एक सामान्य स्त्री आहे. थोडीशी खटकते ती बेणारेची भाषा. ती खरोखरच खांडेकरी पद्धतीने बोलते. पण बेणारेचे स्वगत हे खऱ्या अर्थाने स्वगत नाही; ते तिच्या अंतर्मनातील कल्लोळाचा तेंडुलकरांनी केलेला आविष्कार आहे. त्यामुळे त्यांच्या शैलीचा आणि बेणारेच्या व्यक्तिरेखेचा संबंध जोडणे थोडेसे अन्यायाचे आहे. तरीपण बेणारे थोडी अधिक मुग्ध झाली असती तरी चालले असते.

परंतु केवळ यामुळे नाटक फसले आहे असे म्हणता येत नाही. श्री. पाटणकर म्हणतात त्याप्रमाणे किंवा श्री. पाध्ये म्हणतात त्याप्रमाणे नाटक लिहिले गेले असते तर काय झाले असते हा विचार अगदी वेगळा आहे. आहे त्या स्वरूपात दोघांनाही नाटक खटकले. बेणारेचे स्वगत ' लाचारी'चे असूनही नाटकाला लाभलेल्या यशात श्री. पाध्ये यांना दिसणारा ' विसंवाद ' आणि बेणारेच्या स्वगतामुळेच भुईसपाट होणारे नाटक त्या स्वगतामुळेच लोकप्रिय व्हावे यात श्री. पाटणकरांना दिसणारी ' Irony ' यांच्या मुळाशी एकच कारण आहे. त्याचा ऊहापोह मिलरच्या गाजलेल्या नाटकाचे विवेचन करताना डेनिस वेलंड यांनी टीकाकारांना उद्देशून लिहिलेल्या शब्दांतच करणे बरे :

" What is irritating about such criticism is its assured conviction that the mixture of social drama and tragedy is unintentional, and its implication that, if Miller had only been clear-minded enough to concentrate on one or the other, a better play would have resulted. Better or not, it would have been a totally different play, and for once the audiences who took the play that was offered to them seem wiser than genre-minded critics who wanted something else. " ( Arthur Miller, Chapter 4. )

*

# कै. ना. ह. आपटे यांची काही पत्रे

गेल्या नोव्हेंबर महिन्यात कादंबरीकर ना. ह. आपटे यांचे निधन झाले. त्यांनी सौ. सुशीलाबाई पानसे व श्री. रमेश पानसे यांना लिहिलेली ही काही पत्रे. प्रा. रमेश पानसे यांच्या सौजन्याने.—संपादक.

## १

भारत चित्रदर्शन
हिंदी मराठी चित्रपट
निर्माण करणारी संस्था

१९६/८८ सदाशिव, पुणे २
तारेचा पत्ता
Bochid, Poona 2

॥ श्री ॥ ता. ५ जाने. ४८

चि. सौ. सुशीलाताईस —

सप्रेम आशीर्वाद. सर्व क्षेम. तुमच्याकडून आल्यानंतर आज हे कुशलपत्र धाडण्यास सवड मिळाली.

मी वचन दिल्याप्रमाणे तुमच्याकडे आलो. परिचय पहिला पण तुम्ही मुलीप्रमाणे वागून आपलेपणा दाखवलात, याचे भारी समाधान वाटले. तुमच्या कुटुंबातील सर्वच मंडळींनी दाखविलेला लोभ माझ्या नेहमीच स्मरणात राहील. मी तुमच्याकडे काही तासच राहू शकलो. आणखी राहता आले असते तर छानच झाले असते. पण तशी सवडच नव्हती.

तुमचा स्वभाव व वागणे अगदी योग्य आढळले. पूर्व चालीप्रमाणे तुम्ही मर्यादा पाळलीत आणि आजच्या कालाप्रमाणे मनमोकळेपणाही दाखविलात. यावरून तुम्ही माझी पुस्तके निःसंशय वाचली असली पाहिजेत. चांगले ते जुने ठेवायचे आणि नवे चांगले घेण्यास भ्यायचे नाही. आजकालच्या संसारात तरुण स्त्रीपुरुषांनी याचेच ध्यान ठेवले पाहिजे.

एका प्रसंगाबद्दल तर मी तुम्हाला मनातून शाबासकी दिली. दादरला निघताना टांग्यात बसण्याचा प्रसंग. गजाननरावांना तुम्ही पुढे बसण्यास सुचवलेत. नंतर तुम्ही स्वतः कन्येप्रमाणे माझ्या शेजारी बसलात. हे धोरण फारच थोड्या मुलींनी ठेविले असते.

तुमच्याकडे येण्यात वडील मनुष्य या नात्याने तुम्ही हा माझा खरा योज ठेवलात, असे मी मानतो. तसे पाहिले तर ही बाब क्षुल्लक आहे. पण आर्यसंस्कृतीतील

ती एक महत्त्वाची रीत आहे. ती तुम्ही अचूक पाळलीत याबद्दल शाबासकी. अर्थात गजाननरावांनी त्या प्रकाराला तुमच्या हाताला हात लावला हे श्रेय त्यांना आहेच. पण धोरण सांभाळण्याचे काम तुम्हीच केलेत. असो.

आपले बोलणे असे थोडेच झाले. तरीपण झाले ते मनमोकळे झाले. रमेशशी तुमची वागणूक योग्य होती व तोही चांगला मुलगा आहे, ही खूणगाठ बांधून ठेवा. उपदेशाचा मारा सारखा केला नाही म्हणजे मुले चांगली वागतात. शितावरून भाताची परीक्षा आहे ही. पण ती चूक नाही.

रमेशने वीर व्हावे अशी तुमची इच्छा किंवा आकांक्षा असावी, असे वाटते. काहीच चूक नाही या वाटण्यात. मग त्याच्या कलमबहादरीविषयी तुम्हाला भलती आकांक्षा बाळगता येणार नाही. होऊ दे. त्याला वीर होऊ दे.

निर्भयता, औदार्य, स्त्रीजातीविषयी आदर, दुर्बलांच्या संरक्षणाला धावणे आणि प्रसंगाला न कचरणे या गोष्टी तो शिकेल, याची बीजे, त्याच्या मनात रुजतील असे तुम्ही बोलले पाहिजे व वागले पाहिजे. रमेश स्वतःला अपाय करून न घेईल एवढीच देखरेख त्याच्यावर असू द्या. बाकी त्याला पूर्ण स्वातंत्र्य द्या. तो वीर तयार होईल. अर्थात तुमच्या या आकांक्षेला माझा भरपूर आशीर्वाद आहे, हे सांगायला नकोच.

तुमच्या कुटुंबातील एकोपाही वाखाणण्यासारखा आहे. माझे भाऊजी मला भावाप्रमाणे वाटतात व जाऊबाई फारच चांगल्या आहेत, हे तुमचे उद्गार तुम्हा सर्वांनाच भूषणास्पद आहेत. त्याचप्रमाणे धार्मिक वातावरण. तेही निःसंशय चांगले आहे. मी स्वतः धार्मिक असे काही आचरीत नाही. पण माझ्या घरी ते आहे. वयाच्या मानाने मी आता पूजेअर्चेकडे वळावयास हवे. पण जे साधत नाही, त्याचे सोंग करायचे नाही असे मी ठरविले आहे. माझे जीवन बुद्धिजीवी आहे. देव मी मानतो. पण कर्मकांडाची आवश्यकता मला वाटत नाही. तरी पण सात्त्विक असे धार्मिक वातावरण कुटुंबात असावे, असे माझे निश्चित मत आहे.

यामुळे तुमच्याकडील दत्तजयंतीचा सोहळा—वडेजावीचा नसला तरी—योग्य वाटला. एक थोडीशी चूक माझ्याकडून घडली. त्या दोन दिवसांत माझी प्रकृती बरी नसल्यामुळे तुमच्या तेथील स्वादु भोजनाचा खरा आनंद मला भोगता आला नाही. ते दिवशी माझ्या पोटात सारखे दुखत होते. यामुळे निरुपाय झाला. तुम्हांला चमत्कारिक वाटू नये म्हणून हा खुलासा. असो.

मित्रवर्य हरिभाऊंस मी पत्र टाकणार आहेच. इथे भेटीचा योग आल्यास भेटेनही.

काही योगाने तुम्ही पुण्यास आल्यास व ते मला कळविल्यास भेट घेईन. माझ्या येथील मुलीची ओळख करून देईन.

पत्र बरेच लांबले. वरचेवर लिहिणे होणार नाही, म्हणून थोडेसे लिहिले. आवश्यकता वाटल्यास मधून मधून कुशलपत्र धाडून समाचार देत घेत जावा.

मुंबईस जाता येता येत चला असे तुमचे आमंत्रण आहेच. सवड झाल्यास मी प्रयत्न करीन. आधी कळवीन. शक्य तर रविवार गाठून येईन. केव्हा काय हे आज सांगणे कठीण तरी पण झालेला परिचय आणखी वाढविण्यात मजकडून कसूर होणार नाही.

आता आवरते घेतो.

चि. रमेशला आजोबांचा मंगल आशीर्वाद पोचवावा त्याचप्रमाणे विनोद--नलिनी.

श्री. बाळकृष्णपंत व गजाननराव आणि तुमच्या जाऊबाई या सर्वांना सप्रेम नमस्कार.

तुम्हा सर्वांना मनापासून आयुरारोग्य चिंतून पुरे.

क. हे. आ.

ना. ह. आपटे



# २

॥ श्री ॥

कोरेगाव
२९।११।५५

चि. सौ. सुशीला पानसे हीस--

सप्रेम आशीर्वाद. आम्ही सर्व क्षेम आहो. तुम्हा मातापुत्रांचे पत्र मिळाले. वाचून मनाला समाधान वाटले.

चि. रमेशला स्वतंत्र पत्र लिहिले आहे. त्यावरून पत्रोत्तर उशिरा जात असल्याचे कारण कळेलच.

आम्ही आहे त्यात क्षेम आहो. मला सहा मुली, एक मुलगा. परमेश्वरकृपेने साही मुलींचे विवाह झाले. त्यांना घरे चांगली मिळाली. त्या सर्वांना मुलेबाळेही झाली. आपआपल्या घरी त्या आनंदात आहेत. मुलगा मुकुन्द सध्या पुण्यास आहे. अर्थात कोरेगावी आम्ही दोघेच (पतिपत्नी) आहो.

माझी प्रकृती बरी आहेच. सौभाग्यवतीला संधिवाताचा थोडा त्रास आहे. घरात हिंडून फिरून असते. स्वैपाकपाणी पाहते. तसे सर्व ठीक आहे.

आता अवांतर-पुस्तकप्रकाशन लेखन वगैरे. या संबंधात नवीन व आनंददायक असे फारसे सांगता येत नाही. त्याची एक मोठी हकीगत माझ्या आयुष्यात घडली.



अनुक्रमणिका

त्यामुळे मी फार नुकसानीत आलो. वनवास व अज्ञातवास पत्करावा लागला. तुम्हा सर्वांशी असलेला संबंध यामुळे तुटला. आज नि. बु. पो. ने ग्रहणाख्यान नावाचे एक चोपडे पाठविले आहे. ते वाचावे. घरच्याच माणसाने गळा कापल्यावर काय करायचे ? गेली पाच सहा वर्षे या भोगात गेली. कर्ज कोर्ट भांडणे व धंद्याचे वाटोळे यातून डोके वर निघेना, पण आता काळ पालटला आहे. मुलगा हाताशी आला आहे. १९५६ पासून हातपाय हलवू लागेन. ईश्वरी इच्छेप्रमाणे जमेल ते करायचे. धैर्याने झगडणे आपल्या हातात असते. माझे पुराण एवढे पुरे.

तुझे पत्र वाचून मनाला खरेच बरे वाटले. चि. रमेशच्या मुंजीचे आमंत्रण मला पोचले होते. त्याची पोच मी दिली असावी. नक्की आठवत नाही. कारण त्यावेळी माझे ग्रहण सुरू झाले होते. असो.

चि. रमेशबद्दल तू, गौरवपर लिहिलेस याला महत्त्व आहे. आईने आपल्या मुलाविषयी इतके चांगले लिहिणे ही फारच कौतुकाची गोष्ट आहे. आणि या चांगल्या गोष्टीचे श्रेय तू माझ्या लिखाणास दिलेस, याचे मला समाधान वाटते. कारण, चांगले आईबाप त्यांची मुले चांगला व संसारही चांगला हे माझ्या लेखनाचे ध्येय आहे. ते पार पडलेले दिसले. आनंद वाटला. मी तुम्हा सर्वांना आयुरारोग्य इच्छितो आणि आशीर्वाद देतो. मुंबईकडे आलो तर अवश्य येऊन जाईन. तुझ्या यजमानांना सप्रेम नमस्कार.

ना. ह. आपटे



# ३

ना. ह. आपटे
कोरेगाव. जि. सातारा.

कोरेगाव
२९।११।५५
वेळ पहाटे ३॥ वाजता

।श्री।

चि. रमेश पानसे, यास —

सप्रेम आशीर्वाद. तुझे ता. १८।११।५५ चे पत्र मला काल संध्याकाळी मिळाले. मी परगावी असल्यामुळे हा उशीर झाला. आणि यात नवलाची व गंमतीची गोष्ट ही की, मी दिवाळीच्या निमित्ताने ता. १२ पासून १९ पर्यंत मुंबईलाच होतो. नंतर पुणे, सांगली, मिरज व कराड असा प्रवास होत राहिला. या दरम्यान तुझे पत्र कोरेगावहून मुंबईला व फिरून कोरेगावला आले. पडून राहिले. या धांदलीमुळे मी तुझ्या पत्राचे उत्तर तात्काळ देऊ शकलो नाही. एरव्ही ते उलट डाकेने मिळाले असते.

आणि समजा, ते तू दिवाळीत टाकले असते तर मला ते मुंबईला मिळाले असते. आणि मग मी जवळच असल्यामुळे ठाण्याला तुमच्याकडे चटकन् येऊनही गेलो असतो. पण योगायोग नव्हता. आता कामानिमित्ताने मुंबईकडे आल्यास मी तुझ्या पत्राचे स्मरण ठेवीन आणि ठाण्याला तुमच्याकडे येऊन तुम्हाला भेटून जाईन.

तुझे पत्र वाचून मला खरेच आनंद झाला. तुझ्या आईने तुझ्याबद्दल मोठ्या गौरवाने लिहिले आहे. तो मजकूर वाचल्यावर माझा एक नातू इतका चांगला मुलगा आहे, या गोष्टीची मला धन्यता वाटली. रमेश, मी तुला मनापासून आशीर्वाद देतो. तू असाच चांगला राहा. आणि ज्ञानाने, मनाने, धनाने मोठा होत राहा. देवाने तुला भरपूर आयुरारोग्य द्यावे.

तू चांगला व्यवस्थित मुलगा आहेस, हे मला आणखी एका गोष्टीने कळले. ते म्हणजे तुझे पत्र होय. ते मोठे सरळ व अगत्याचे आहे आणि महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुझे हस्ताक्षर सुवाच्य व वळणदार आहे. मजकूरही व्यवस्थित लिहिला आहेस. एक बारीकसा दोष शुद्धलेखनासंबंधी आहे. पण तो दक्षता घेतलीस म्हणजे जाईल. मराठीत पत्रे लिहिताना थोडे लक्ष ठेव म्हणजे झाले.

तुझे वय लक्षात घेता, तू फार चांगले पत्र लिहिले आहेस, असे मी पुन्हा सांगतो व तुला शाबासकी देतो.

आता तुझ्या पत्रातील इतर मजकुराबद्दल.

माझे वय ६७ ( सदुसष्ट ) आहे. म्हातारपण आलेच आहे. पण प्रकृतीची तक्रार अशी काही नाही. रोज ४–५ मैल फिरायला जाणे, थंड पाण्याचे स्नान वगैरे होऊ शकते. खाणेपिणे नेहमीचे. पथ्यापथ्य काही नाही. पण भोजनात नियमितपणा आहे. चहाचे व्यसन नाही. चाल पडली आहे म्हणून घ्यावा लागतो.

आता लेखन. माझा पोटाचा तो व्यवसाय आहे आणि लिहिण्याची हौसही आहे. यामुळे लेखन सुरू असतेच. मासिकादिकांत लेख, गोष्टी बहुशः वरचेवर येतात. गेल्या ५ वर्षांत स्वतंत्र पुस्तक असे मात्र झाले नाही. काही अडचणी निर्माण झाल्या आणि ती प्रगती थांबली. पण आता मी पुन्हा काही सुरू करणार आहे. मला एकच मुलगा आहे. आहे १८–१९ वर्षांचा. तो मॅट्रिक झाला आहे. सुस्वभावी, उद्योगी व निर्व्यसनी आहे. आरोग्य चांगले आहे. आपटेमंडळीचे ग्रंथप्रकाशनाचे कार्य व पुस्तकविक्री यापुढे तो करणारा आहे. मध्यंतरी तो ठाण्याला येऊन गेला. पण विस्मरणाने मी त्याला तुमच्याकडे जा म्हणून कळवू शकलो नाही. यापुढे सांगेन व तो येईलही. हा मुकुन्द-मामा तुला आवडेल व तुझी त्याची गट्टी जमेल असा मला विश्वास आहे. असो.

आता आणखी एक गोष्ट सांगून पुरे करतो.

रमेश, आपला भारत आता स्वतंत्र आहे. याचा अर्थ गुणी, विद्वान, उद्योगी, प्रामाणिक, निरोगी आणि धडपड्या माणसाला पुढे येण्यास व नाव गाजविण्यास खूप

खूप वाव आहे, बरे का. अगदी जवाहरलाल नेहरू इतके मोठे होणेही तुम्हा तरुण मुलांना अशक्य नाही. तेव्हा काही मोठे ध्येय पुढे ठेवून विद्याभ्यास कर. शहाणा हो. नाव गाजविण्याची हिम्मत धर. तुला यश मिळेल.

एवढे सांगून आणि तुला पुन्हा एकवार भरपूर आशीर्वाद देऊन पत्र संपवतो.

तुझा आजोबा

ना. ह. ऊर्फ नानासाहेब आपटे.

ता. क. तुझ्या आईला स्वतंत्र पत्र लिहिले आहे. आणि बरे का रमेश, एक महत्त्वाची गोष्ट ध्यानात ठेवावयाची. माझ्याकडून पत्रांच्या उत्तराची अपेक्षा सारखी करावयाची नाही. महत्त्वाच्या पत्रांची उत्तरे मी देतो. पण ऊठवसल्या आणि किरकोळ पत्रांना सविस्तर उत्तरे देत बसण्यास मला वेळ नाही. मला पत्रे धाडताना ही गोष्ट लक्षात ठेवावी.

सोबतचे पत्र आईला दे. ना. ह. आपटे

*

## साभार-स्वीकार

**भागवतोत्तम संत एकनाथ** — शं. दा. पेंडसे, नागपूर प्रकाशन, नागपूर; १५ रु. ☐ **राधेय कर्ण** — रा. शं. वाळिंबे, जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे ३०; १० रु. ☐ **मराठी संशोधन** ( लेखसंग्रह ) — संपादन म. वा. धोंड, मराठी संशोधन मंडळ, मुंबई १४; ५ रु. ☐ **विलाप** ( ख्रिस्ताच्या वधस्तंभारोहण प्रसंगीचे ) — संपादन वि. वा. प्रभुदेसाई, मराठी संशोधन मंडळ, मुंबई १४; ४ रु. ☐ **वल्लभभाई पटेल** ( चरित्र व काल )— त्र्यं. र. देवगिरीकर, भारत ग्रंथमाला, पुणे ३०; १६ रु. ☐ **गायनाचार्य पं. विष्णु दिगंबर** — बी. आर. देवधर, अ. भा. गांधर्व महाविद्यालय, मुंबई ४; ६ रु. ☐ **स्मृतिगंध** ( नेहरू संबंधीच्या आठवणी )— पु. शं. पतके, व्हीनस प्रकाशन, पुणे ३०; ४ रु. ☐ **ऑक्टोपस** ( कादंबरी )— श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन, मुंबई ४; १२ रु. ५० पैसे. ☐ **मी, मी, मी नटराज** ( कादंबरी )— ए. वि. जोशी, मौज प्रकाशन, मुंबई ४; ७ रु. ५० पैसे ☐ **अरे, संसार संसार** ( कादंबरी )— प्रभाकर पेंढारकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; ८ रु. ५० पैसे ☐ **किती दूर, पण किती जवळ** ( कादंबरी )— लेखक व प्रकाशक, अ. तु. वाळके, पुणे ३०; ४ रु. ☐ **राखी पाखरू** ( कथा )— चिं. त्र्यं. खानोलकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; ९ रु.



अनुक्रमणिका

# पुस्तक—परीक्षणे

## शिवपुत्र संभाजी*

* ले. सौ. कमल गोखले : प्र. ज्ञानविज्ञान विकास मंडळ, पुणे २, पृष्ठ ५५६, रु. २६

आमचे दुसरे छत्रपती संभाजी (कारकीर्द १६८०-१६८९) मोठे भाग्यशाली म्हटले पाहिजेत. श्री. वा. सी बेंद्रे यांनी (स. १९६० मध्ये) आणि आता सौ. कमल गोखले यांनी लिहिलेली (स. १९७१ मध्ये) अशी दोन मोठी चरित्रे संभाजी महाराजांच्या वाट्यास आली. दोन्ही चरित्रांत ह्या छत्रपतींचे चित्र अधिक सहानुभूतीने रूढ कल्पनांना धक्का देऊन काढलेले आढळते—हा उभय चरित्रांचा समान-धर्म आहे. नाही तरी बेंद्रे यांच्या साधनांचा उपयोग सौ. गोखले यांना करता आल्याने त्यांची अनुमाने फारशी भिन्न निघाली नाहीत. मात्र साधने व्यवस्थित मांडण्यात सौ. गोखले यांचे कौशल्य चटकन् नजरेत भरण्यासारखे आहे. साधनचिकित्सा, संबंधित अधिकाऱ्यांची नावे आणि ठिकाणे, संदर्भ—साहित्य, अपरिचित शब्दांचे अर्थ, नाम—सूची (व्यक्तिस्थल), तपशीलवार नकाशे...इत्यादी पुरविण्यात सौ. गोखले यांची अभ्यासू वृत्ती व्यक्त झाली आहे. संदर्भ—ग्रंथ आणि त्यांचे संक्षेप सांगणारी बेंद्रेपद्धत पत्करण्यात गोखलेबाईंची गुणग्राहकता स्पष्ट दिसते. ह्या पद्धतशीर अभ्यासात एक उणीव उभय ग्रंथांत आहे ती काल-पटाची. संभाजी छत्रपतींची कारकीर्द अवघी नऊ वर्षांची. आणि तमाम हयात पुरी बत्तीस वर्षांचीही नाही. ह्या जीवनाचा कालपट थोडक्यात मांडता आला असता आणि त्यावरून ह्या "उग्र प्रकृती" छत्रपतींच्या जीवनातली कित्येक वर्षांची निष्क्रियता सहज दिसली असती. संभाजी महाराजांनी राज्यारोहणानंतर पहिली चार वर्षे जशी गडबडीत घालविली, तशी पुढील चार वर्षे जवळ जवळ निष्क्रियतेत गेली असे कालपटावरून दिसते. कदाचित त्या हालचालीची, त्यांच्या कर्तबगारीची नोंद उपलब्ध साधनांत आढळत नसेल. कांहीही असले तरी चरित्राच्या आराखड्यातला हा विशेष उभय चरित्रकारांच्या विवेचेनात चमकल्यावाचून राहिला

नसता. संशोधनाचा भर, साधनांचा तपास, त्या दृष्टीने त्या रोखाने, करता आला असता...

## ग्रंथाचे स्वरूप

" शिवपुत्र संभाजी " हा जाडा ग्रंथ पद्धतशीर लिहिला आहे. आणि ही पद्धत सौ. गोखलेबाईंनी स्वतःच निवडलेली दिसते. " बाटाऱ्या " बाबत झालेले त्यांचे हाल पाहिल्यावर तर त्यांच्या चिकाटीचे कौतुक वाटते. याबाबतीत " आशीर्वाद " देणाऱ्या महामहोपाध्यायांशी सहमत होणे श्रेयस्कर. संभाजी चरित्राचा आरंभ स्वराज्याच्या वारशाने केल्यावर त्याच्या बालपणाचे चित्र आपणास पाहावयास मिळते. युवराज-पदाची कथा संपल्यानंतर वारसा हक्काच्या कलहातून राज्यपद कसे मिळविले हे समजते. आणि अतःपर राजकीय कर्तबगारीचा प्रारंभ होतो. शहाजादा अकबरासाठी एक प्रकरण, सिद्दी आणि इंग्रज यांसाठी दुसरे, पोर्तुगीजांसाठी तिसरे, अशा रीतीने निर-निराळ्या तत्कालीन स्पर्धकांबरोबर संभाजी राजांचे संबंध कसकसे आले, ते काला-नुक्रमे सांगितले आहेत. आदिलशाही आणि कुत्बशाही यांचा विचार वेगळ्या प्रकरणात केल्यावर मोगलांशी संघर्ष कसकसा होत राहिला तो प्रांतवारीने, जिल्हावार, प्रसंगी किल्ल्यांच्या अनुक्रमाने तपशीलवार साधार सांगितला आहे ( पृ. २१२-३१७ ). अशीच खातेवार राज्यकारभाराची माहिती ( पृ. ३४३-४२८ ) वेगळ्या प्रकरणात मांडली आहे. ही दोन्ही प्रकरणे म्हणजे ह्या चरित्रग्रंथाचा गाभा होय. सिंहावलोकन ( पृ. ४७८–९२ ) हे लेखिकेचे स्वतंत्र विवेचन. वास्तविक ग्रंथ येथे संपला असता वाचकांच्या सोईखातर बरेच साहित्य, ग्रंथोपयोगी ठरविले आणि ते पुरविले याबद्दल सौ. गोखले यांना धन्यवाद दिले पाहिजेत. आमची एवढीच विनंती की सूची छापताना वर्णक्रम नीट लावावा – त्यात चुका राहू देऊ नयेत.

या ग्रंथातील नकाशे विशेष काळजीपूर्वक काढले आहेत. रंगीत चित्रे आणि छायाचित्रे यांमुळे ग्रंथराजाला डौल प्राप्त झाला हे खरे. अस्तु.

## वादग्रस्त प्रश्न

संभाजी राजांच्या चरित्रातले वादग्रस्त प्रश्न ठराविक आहेत. ( १ ) तो दुराचारी होता की नाही ? ( २ ) त्याच्या व्यसनांमुळे राज्यावर काही परिणाम झाले की नाही ? ( ३ ) मोगलाकडे तो गेला, याची कारणमीमांसा आणि ( ४ ) त्याच्या कर्तबगारीचे मोजमाप.

बाकरे दानपत्राचा विचार सौ. गोखलेबाईंनी केला आणि संभाजीने केलेला नवस फेडला, त्याचे हे दानपत्र म्हटले ( पृ. ४३२ ). राज्याभिषेकापूर्वी सुमारे चार महिने हे दान संभाजीने दिले असल्याने ते प्रायश्चित्तपर दिसते. दहा हजार होन दरवर्षी

पुत्रपौत्रादी परंपरने देण्याचे वचन यात असल्याने नवमापेक्षा प्रायश्चित्ताचे स्वरूप याचे ठरते. आपण वामाचाराने (तांत्रिक रीतीचे) काही आचरण केले, (कलशाभिषेक इत्यादी) त्याचे फल लाभले. राज्यलाभाबरोबर पितृमृत्यू साधला. ही टोचणी संभाजीस असावी. शिवाय पितृद्रोह करून यवनसंपर्क झाला होता; दिलेरखानाकडे गेल्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावे असे त्याला वाटले असावे किंवा दक्षिणार्थी भटजींनी ते त्यास सुचविले असावे. " दुष्ट मंत्री. " त्यांचा " दुष्ट सल्ला." आणि सापत्नभाव यांचा उल्लेख दानपत्रात आहे. परंतु सोयराबाई अग्रमहिषी (पट्टराणी) ठरली त्याच वेळी संभाजी युवराज ठरला होता. जिजाबाई हयात होती. तोपर्यंत सापत्नभाव वळावला नसावा. मात्र संभाजीची मुंज शिवराज्याभिषेकानंतर आठ महिन्यांनी झाली ती का? किंवा वेदोक्त पद्धतीने त्याचे (ची) लग्न (ग्ने) झाले (ली) की नाही ते कळत नाही, परंतु युवराजपद नक्की झाले असल्याने आणि जिजाबाई वावरत होती तोपर्यंत सापत्न-भावाचे डोके वर निघणे अशक्य वाटते.

## कटांचे खरे कारण

दुष्ट मंत्र्यांचा दुष्ट सल्ला तरी संभाजीच्या वाट्यास का यावा याचे सबळ कारण सापडत नाही. त्यांनी दिलेला निर्णय संभाजीने फिरविला म्हणून ते दुष्ट ठरतील काय? किंबहुना संभाजी विरुद्ध कट, एकदा नव्हे, दोनदा नव्हे, तीनदा करण्यास ही " दुष्ट मंत्री मंडळी " तयार झाली तेव्हा यांच्या कटाला काही प्रबळ कारण असले पाहिजे. कट उघडकीस आल्यावर त्याबद्दलचे प्रायश्चित्त ठरलेले होते. त्याबद्दल सर्वांचीच खात्री होती. म्हणजे त्यांनी कटात भाग घेतला तो जाणून बुजून, स्वतःच्या अक्कल हुषारीने, राजीखुषीने, कुठल्याही प्रकारच्या नशेत नसता, घेतला, हे स्पष्ट आहे, तेव्हा एरवी मित्री, स्वार्थपरायण, पैशामागे लागलेली माणसे जिवावर उदार होऊन उगवत्या छत्रपतीस विरोध करतात, त्यांज विरुद्ध कट तीनदा रचितात, त्याचे काही तरी कारण निराळेच असले पाहिजे. हे मात्र सौ. गोखले यांनादेखील सापडले नाही.

संभाजी राजे व्यसनी, दुराचारी नव्हते, हे सिद्ध करण्याचा उभय चरित्रकारांनी पुष्कळ प्रयत्न केला. सौ. गोखले यांनी तर स्पष्टच म्हटले आहे की, संभाजीलाही दोन्ही (बाई–बाटली) व्यसने होती आणि तो त्यांच्या आधीन होता, यासंबंधी ऐतिहासिक दृष्टीने निर्णायक पुरावा मिळत नाही (पृ. ४८०). एवढयावरच त्यांचे समाधान नाही. नाटककार आणि कादंबरीकार यांजवर त्यांचा मोठा रोष आहे. ' कोणाही श्रेष्ठ व्यक्तीचे अगदी पोतेरे करून टाकणारी ' ही ललित लेखक मंडळी इतिहास लेखकां-पेक्षा आघाडी मारून आहेत (४८०–८१). थोरले बाजीराव पेशवे यांच्या मस्तानी प्रकरणाचाही उल्लेख करून सौ. गोखले म्हणतात संभाजीवरील व्यसनाधीनतेचा आरोप खोटा ठरतो (पृ. ४८१).

## विलक्षण युक्तिवाद

' संभाजी केवळ मुघलांना मिळाला म्हणूनच त्याला दोष देता येत नाही ' ( पृ. ४८६ ) हे सौ. गोखले यांचे विधान विचित्र वाटते. त्याहीपेक्षा विचित्र अशी त्यांची मीमांसा आहे. " रागावून आणि गृहकलहाला विटून, स्वतःच्या कर्तृत्वावर राज्य मिळविण्याच्या ईर्ष्येने संभाजी दिलेरखानाला मिळाला. " यातील कारणे अगदी विलक्षण आहेत. दिलेरखानाकडून राज्य मिळवायचे, ते स्वतःच्या कर्तबगारीवर कसे असेल ? शहाजी महाराजांनी कधी विजापूर, कधी निजामशाही तर कधी मुघल अशांची नोकरी पत्करलीच ना ? मग त्यांच्या नातवाने दिलेरखानाकडे जाण्यात गैर काय असे जणू सौ. गोखले विचारतात, तेव्हा बरे–वाईट पारखण्याबाबत त्यांची गफलत होत आहे, यात शंका नाही. खुद्द छत्रपती शिवाजी महाराजांनी " विजापूरकरांचे जहागिरदार " म्हणूनच आपल्या कर्तृत्वाला प्रारंभ केला होता, ह्या आधारावर संभाजीचे पलायन — दिलेरखानास जाऊन मिळणे रास्त ठरवायचे असेल तर वादच मिटला !

## शाक्तांचे निंद्य आचारण

शाक्तपंथीयांचा पगडा संभाजीवर बसला आणि तो " वामाचारी " बनला ही गोष्ट सर्वमान्य आहे. शृंगारपूर येथे महाराष्ट्रातले आद्यतांत्रिक ( गणेश भट जांभेकर ) आपली मठी स्थापून होते. केशवभट उपाध्याय हे त्यांचे सहाध्यायी ( ? ) होते. उभयतांनी मिळून शाक्तपंथाचा प्रचार चालविला* आणि संभाजीला आपल्या जाळ्यात गोवले. आर्थर अॅव्हॅलोन ( जॉन वुड्रॉफ ) यांच्या तंत्रग्रंथांच्या आधाराने सौ. गोखले यांनी शाक्तपंथाचे गोडवे गावे. त्या पंथातून " उच्च तत्त्वज्ञान आणि संस्कृत साहित्य " निर्माण झाले असे मानून त्यात काहीच निंद्य मानू नये, ही जाणीव अस्वस्थकारी आहे. विशेषतः पुण्यात बोकाळलेल्या शाक्तपंथीय दुराचाराचे लोकहितवादींनी आपल्या " शतपत्रांत " ( पत्र नं. ६, २३ एप्रिल १८४८ ) वर्णन केले आणि शाक्तमार्गातील निंद्य प्रकार चव्हाट्यावर मांडले. " पुण्यात फार लोकांनी हा मार्ग घेतला होता. तो पुढे कृष्णंभट गोखले यांनी खटपट करून मोडला, अशी टीप ह्या पत्राचे अखेरीस जोडली आहे, आणि त्या शाक्तपंथाला सौ. गोखले " सर्टिफिकेट " देतात, यामुळे वाईट वाटते. असो.

## राज्यलोभाचे परिणाम

राजे संभाजी शाक्त उपासक बनले. त्यांनी आपणास त्या पंथानुसार " कलशाभिषेक " करवून घेतला आणि आपण " स्वयंपूर्ण " झाल्याचे रीतसर जाहीर केले होते.

---

* जदुनाथ सरकार. हाऊस ऑफ शिवाजी ( ३ री आवृत्ति ), पृ. ३३१

हे खरे, मग त्यात " काही अर्थ दिसत नाही " ( पृ. ४३१ ) असे का म्हणावे ? ही सर्व खटपट निरर्थक कशी मानावी ? " प्रयोजनमनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते " या न्यायानुसार संभाजीराजांनी कलशाभिषेक विनाकारण करविला नाही. शाक्तपंथीयांचे आचार उगाच मौज म्हणून पत्करले नाहीत. ते हेतू साध्य झाले नाहीत, असे इतरांनी हवे तर म्हणावे. पण त्यांना बाविसाव्या वर्षी प्रथमापत्य भवानीबाई * आणि पुत्रप्राप्ती पंचविशी गाठण्याच्या वेळी झाली. राज्यप्राप्ती तर कलशाभिषेकानंतर दोन वर्षांत झाली. तेव्हा संभाजी राजे वामाचारावर ( शाक्तपंथावर ) अधिक निष्ठा ठेवू लागले, तर आश्चर्य वाटायला नको. आणि शाक्तपंथीयांचे आचरण सदाचारात बसणारे होते थोडेच ! संभाजी दुराचारी ठरला तो विनाकारण नव्हे. शाक्तपंथी आचार त्या वेळीही दुराचारातच जमा होते.

## दुराचाराचा तपशील

पण या दुराचारापेक्षा अधिक दोषास्पद असे संभाजीराजांचे आचरण दिसून आले, ते त्यांच्या राज्यलोभात. राज्यालोभामुळे वडिलांचा मृत्यू लवकर व्हावा अशी त्यांची इच्छा व्यक्त होऊ लागली– ही अधिक उद्वेगकारी बाब होय. दानपत्रात स्वतःकडे दाशरथी रामाची भूमिका घेऊन त्यांनी ती कुशलतेने सूचित केली आहे. सापत्न मातेच्या हट्टासाठी दाशरथी रामाने वनवास पत्करला खरा; पण त्यामुळे दशरथ स्वर्गवासी झाला, हेही खरे– अशा रीतीने स्वतःच्या खुद्द तीर्थरूपांचा मृत्यू लवकर व्हावा म्हणून शाक्त-प्रणीत उपाय करणारा पुत्र सदाचारी म्हणावा काय ? एवंच, ह्या बाबतीत सौ. गोखले यांनी लढविलेला युक्तिवाद न पटणारा आहे. त्यांनी तो करावा, याबद्दल थोडे आश्चर्य मात्र वाटते.

## विलक्षण साम्य

औरंगपुत्र अकबर हा संभाजीच्या आश्रयार्थ आला हा योगायोग मोठा विलक्षण होय. हे दोघे बडेबापके बेटे समवयस्क; चार महिन्यांनी संभाजी वडील. दोघांचे समानशील म्हणजे मातृविहीन वाढलेले. दोघेही, आपआपल्या वडिलांवर भिन्न कारणाने पण एकाच वयात ( एकविशीत ) रुष्ट; दोघांनीही आपआपल्या पिढीजाद शत्रूशी हात मिळवणी केली, संभाजीने जेम-तेम वर्षभर पण अकबराने " आमरण. " वास्तविक संभाजीकडून निघून इराणात गेल्यावर अकबराचा मराठी संपर्क संपुष्टात आला. संभाजी–अकबर युती भारतीय राजकारणाला हितावह ठरण्याजोगी होती–इतिहासाला कलाटणी देण्याइतपत मोठी होती. पण तिचा यथायोग्य परिपोष झाला नाही. आमच्या

---

* हिच्या जन्माची तारीख गोखलेबाईंनी ४–९–१६७८ अशी दिली आहे. ती २९–१–१६७९ असली पाहिजे.

छत्रपती संभाजीचे धोरण तोकडे पडले. सौ. गोखले यांनी " संभाजी आणि शहाजादा अकबर " ( पृ.९२-११८ ) हे प्रकरण पुष्कळ नवी माहिती मिळवून लिहिले आहे. म्हणून रियासतकार सरदेसाई आणि वेंद्रे अशांची मते खोडून काढण्यास त्या सरसावल्या. तरी देखील या प्रकरणीचे त्यांचे पुढील अनुमान पाहून जरा आश्चर्य वाटते. "त्याच्याशी ( अकबराशी ) वागताना महाराष्ट्राच्या राजाने कुठे नमते घेतले नाही की त्याच्यापुढे मान वाकविली नाही. त्याला कधीही अनावश्यक महत्त्व दिले नाही. मात्र शक्य असेल तेवढा त्याचा उपयोग करून घेतला" (पृ. ११८). खास मराठी म्हणतात त्या वृत्तीचे हे चित्र असले, तरी सौ. गोखले यांनी अन्यत्र व्यक्त केलेल्या मतांशी हे विसंगत दिसते. संभाजी मोगलाकडे गेला यात त्यांना गैर काही दिसले नाही. शहाजी तर अहमदनगर–विजापूर–दिल्ली येथील सत्ताधाऱ्यांकडे आलटूनपालटून नोकरीस होता -आणि शिवाजी तर विजापुरकरांचा सरदार म्हणून वावरत होता. म्हणून संभाजीला त्यांनी दोष दिला नाही. या वेळी शिवाजीने जयसिंहाशी वागताना " नमते " घेतले, त्याची आठवण का झाली नाही ? आणि मुख्य म्हणजे आलेल्या संधीचा लाभ संभाजीने घेतला नाही–त्याला घेता आला नसेल कदाचित–याबद्दल चर्चा करायची सोडून ' नमते घेतले नाही–मान तुकविली नाही-' असे नकारी कार्य का नोंदवावे लागावे ? माणसाची कर्तबगारी–छत्रपतीची मर्दुमकी–मोजण्याचे माप असे नकारात्मक ठेवावे काय ? ह्याचा विचार सौ. गोखले यांनी केला असता तर त्यांचे प्रतिपादन अधिक उठावदार आणि मौलिक ठरले असते.

### सनसनाटी खबर

राजाराम जहागिरीच्या आशेने मोगलांकडे निघाला असता संभाजीने त्याला अटकेत ठेवले, अशी ' सनसनाटी ' खबर ( अखबारांच्या आधारे ) गोखलेबाईंनी दिली आहे (पृ. ६२ ). अखबारातील ही बातमी अधिक कसोशीने तपासली पाहिजे. कारण राजारामाच्या बाबतीत असा प्रकार असंभवनीय वाटतो. निदान राजारामाभोव-तीचे सल्लागार त्याला असे करू देणारे नव्हते. पण अखबारात खबर आहे–तिची पूर्ण छाननी करणे आवश्यक. जाटांचाही एक राजाराम म्हणून पुरुष त्याच सुमारास मोगली राजकारणात येतो. किंवा इतर कुणी दुसराच राजाराम निर्दिष्ट असावा. खुद्द मासिरी–आलमगिरीत राजारामाचे नाव नीट केव्हाच उल्लेखिलेले नाही. संदर्भावरून तो निर्देश राजारामाचा–शिवपुत्र छत्रपती राजारामाचा–आहे असे ओळखता येते. म्हणून अशा बाजारगप्पांवर सहसा विसंबू नये हा श्रेयस्कर मार्ग.

### न उलगडलेले कोडे

संभाजी चरित्रातील एक घटना अद्यापही नीटपणे समजलेली नाही. तिजबद्दलची छाननी देखील कसोशीने झाली नाही. दिलेरखानाकडे जाताना संभाजीबरोबर येसूबाई

होती...वर्षभरात परत येताना " येसूबाईस पुरुषाचा पोषाख देऊन " संभाजी गुप्तपणे पळून विजापुरास गेला अशी माहिती रियासतकार (शककर्ता शिवाजी पृष्ठ २०२-२०५) देतात. पुढे 'उग्रप्रकृती संभाजी' (पृ. १०५-६) मध्ये—सांगितले आहे की येसूबाईला ता. २८-१-१६७९ रोजी कन्या (भवानीबाई) झाली. या वेळी येसूबाई शृंगारपुरास आहे. तेव्हा दिलेरखानाकडे जाताना संभाजीबरोबर ती नसली पाहिजे हे उघड आहे. आणि ती संभाजीबरोबर गेली नसता, संभाजी परतताना त्याच्याबरोबर (पुरुषवेषात) असणे शक्य नाही. परंतु श्री. वा. सी. बेंद्रे यांनी ती "चंपा" असलीच पाहिजे, असे म्हटले आहे. ('छत्रपती संभाजी चरित्र', पृ. ९०) हाही प्रकार " अगा जे घडलेची नाही " अशा तऱ्हेचा आहे. कारण चंपा-संभाजी विवाह छत्रपतींच्या घराण्यातला नसून नंदुरबारच्या देसायांच्या घरातला आहे, हे आता स्पष्ट आहे. ताराबाईकालीन कागदपत्रांतील माहितीप्रमाणे संभाजीची दुसरी पत्नी दुर्गाबाई होती हे समजते. आणि ती संभाजीबरोबर जाताना असावी. पण संभाजी परतताना त्याने " पुरुषवेष देऊन बरोबर आणलेली स्त्री " कोण हा प्रश्न अनिर्णित राहतो. याबद्दल काही खुलासा सौ. गोखले करतील अशी अपेक्षा होती. त्यांनी ही 'खबर' तेवढी नोंदली आहे (पृ. ६९). असो.

## संस्कृत ग्रंथांची रचना

संभाजीच्या संस्कृत ग्रंथकर्तृत्वाबद्दल थोडेसे स्पष्ट लिहिणे आवश्यक आहे. जुना शिरस्ता लक्षात घेता आमचे दुसरे छत्रपती संस्कृत पांडित्य गाजविण्याइतपत त्या भाषेत प्रवीण असतील असे वाटत नाही. त्यांचे बालपणचे एकंदर जीवन पाहता ह्या अभ्यासासाठी त्यांना सवडच मिळाली नसावी असे दिसते. तरी देखील 'बुधभूषण' काव्याचे जनकत्व संभाजीला चिटकवण्याचा अट्टाहास का व्हावा, समजत नाही. संस्कृत काव्याचे संकलन करण्यासदेखील जे स्वास्थ्य हवे तेही संभाजीला लाभले नसता, ही काव्यप्रसूती वर्ष-दीड वर्षांच्या शृंगारपूरच्या वास्तव्यात झाली असावी, असा अंदाज अव्यवहारी ठरतो. एक तर शृंगारपूरच्या वास्तव्यात तांत्रिक मंत्रांत, कलशाभिषेका-सारख्या वामाचारात गुंतलेला युवराज, संस्कृत काव्य रचण्यातही मग्न असेल असे संभवत नाही. त्याच्या भोवतीच्या कुणीतरी ते रचिले आणि छत्रपतीच्या नावावर ते जाहीर झाले. असे प्रकार आजही अनेक होत असल्याचे आपण पाहतो. तरीदेखील संभाजी संस्कृत ग्रंथकार असल्याची फुशारकी वारंवार का झडत राहते, कळत नाही.

## काही त्रुटी

साधने जमविण्यात आणि ती पद्धतशीर मांडण्यात डॉ. गोखलेबाईंनी पुष्कळ मेहनत घेतली आहे, हे पुनः सांगितले पाहिजे. मात्र कित्येक स्थलनामांची निश्चिती

करून घेणे आवश्यक होते ते झालेले दिसत नाही. मोठ्या प्रमाणावरील नकाशे तसेच त्या वेळचे इतर उल्लेख हुडकून पाहिल्याखेरीज अशा स्थलांचा तपास पुरा होत नाही. स्वॉली मरीन ( पृ. ३०९ ), मकनगाव ( पृ. २४१ ), कवनी ( पृ. २३३, ३१४ ), मोलेऱ्हा ( पृ. ३२१ ), शेक्स ( पृ. ३०१ )... अशी काही ठिकाणे अज्ञात वाटतात. खकुलो ( पृ. २३९, ३७८ ) हे अकोला असावे असे संदर्भावरून कळते. नाडगौंडा ( पृ. ४३ ) हे स्थलनाम नसून "पाटीलकी" सारखे वतन आहे. नाडदेश; गौंडा = पाटील; नाडकर्णी = कुलकर्णी ह्या कानडी शब्दांची ओळख झालेली असावी.

"फॅक्टरी रेकॉर्ड" ह्या नावावरून आणि इंग्रजी छापील मजकूर असल्यामुळे त्यांचा उपयोग जरूर नसताही करण्याकडे प्रवृत्ती कित्येक संशोधकांची आहे. सौ. गोखले यांनीही अनेक ठिकाणी 'फॅक्टरी रेकॉर्डस'चा उल्लेख असाच केलेला दिसतो. एप्रिल–मे ( १६८४ ) मध्ये शहाअलमच्या निष्फळ स्वारीची खबर मार्चच्या २३ तारखेस सुरतेच्या वखारवाल्यांनी हुगळीला लिहून कळविली ! (पृ. ३०१) औरंगजेबाने "पगडी" फेकून दिल्याची खबरही अशीच इंग्रजी फॅक्टरी रेकॉर्डमधून उचलली आहे ( पृ. ३०२ ). वास्तविक औरंगजेब "पगडी" घालणारा नव्हे. एकीकडे पगडीबद्दलचा पण सांगून लगेच नंतर दिल्लीला परत जाण्याचा विचार करणारा अस्थिर मनाचा औरंगजेब पुनः 'फॅक्टरी रेकॉर्डस'च्या आधारे रंगविला आहे. असे आधार घेताना किंवा ते उद्धृत करताना, त्याचा अर्थ ग्रंथकाराला समजला आहे अशी अपेक्षा. पण प्रस्तुत ग्रंथात असे अर्थ न समजता घेतलेले उतारे आढळल्यामुळे थोडी शंका येते. पृ. ३५ वरील "मानइले" ह्या दोन शब्दांचा घोटाळा झालेला दिसतो. तो "मशारनिल्हे" याच्या लेखी संक्षेपामुळे असावा. "मातोश्री आईची वंधिली" याचा अर्थच कळत नाही. पृ. १२७ वर "३ वार स्कार्लेट" असा उल्लेख आहे, त्यातील साटीन किंवा इतर कसले तरी "कापड" हा शब्द गळाला असावा. पृ. २०४ वर मासिरी-आलमगिरी ( अनु० जदुनाथ सरकार ) मधील उतारा पृ. १३४ वरील म्हणून दिला आहे. त्यातही थोडी गल्लत-गफलत आढळते. सिद्दी ऐवजी सय्यद; दोनबद्दल दहा... असा थोडा घोटाळा पाहिल्यावर वाटते की हे सगळे आधार बारकाईने तपासणे जरूर आहे की काय ? पृ. २०७ वर "मोआते मदराब" असा किताब सांगितला आहे त्याचा अर्थ कळत नाही ! "मारवाड" (पृ. ३२०, ३२३, ३२५) हे काही तरी वेगळे नाव दिसते. मारवाड किंवा रामनाड असा एक उल्लेख आहे. आणि म्हैसूरकरांनी मारवाडांच्या सहाय्याने मदुरेच्या राज्यातले काही गड जिंकले असा दुसरा निर्देश आढळतो. त्याचा संदर्भ लागत नाही. सैरम व कोहीर हे प्रांत ( पृ. २२० ) कोणते ते समजत नाही.

## शब्दार्थांची छाननी

"कलुशा" याचा फार्सी व उर्दू भाषेतील अर्थ सांगताना ( पृ. ३५४ ) सौ.

गोखले कुणावर तरी विसंबलेल्या दिसतात. उर्दू-मराठी शब्दकोशात तरी " कल्लुशा " हा शब्द आढळत नाही. मात्र सौ. गोखले यांना अभिप्रेत असलेला अर्थ "कल्लवान" या शब्दाचा दिला आहे. " कल्लाश" असाही दुसरा शब्द आहे त्याने अर्थ " नीच", " निर्धन " असे कोशात दिले आहेत (पृ. ६८ ).

" दक्षिणी " या शब्दाचा अर्थ इतिहास-काली थोडा निराळा होता. दखनी, डेक्कनी अशी त्याची इंग्रजी रूपे आहेत. दखनी म्हणजे केवळ दक्षिणी (= महाराष्ट्री ) किंवा द्वीपकल्पीय नव्हत. परकी मुसलमानांना झालेली एतद्देशीय संतती किंवा बाटून मुसलमान झालेले अत्रस्थ, अशा अर्थानेही ' दखनी ' शब्द वापरलेला आढळतो. तो अर्थ संदर्भावरून शब्द कुणी वापरला आहे त्यावरून ठरवावा लागतो. त्याचा सर्रहा अर्थ दक्षिणी–महाराष्ट्री असा करणे गैर होईल. " खवासखानाच्या कारकीर्दी–तील दक्षिणी लोकांना काढून बहलोलखानाने राज्यात पठाणांचा भरणा केला " (पृ.२०० ) या ठिकाणी दखनी मुसलमान असा अर्थ अभिप्रेत आहे.

वेदाजी केशव ( पृ० ३११ ) यांची नक्की भूमिका कोणती हे निवेदनावरून समजत नाही. " स्नेहाची घटाई " याचा अर्थही विपरीत घेतलेला दिसतो. " घट " म्हणजे कमी होणे. " घटाई " म्हणजे कमी झालेले–घट्ट झालेले नव्हे.

## काही लेखनविशेष

शिवपुत्र संभाजीमध्ये किल्येक विशेषनामे नव्या स्वरूपात अवतरली आहेत. मोगलांऐवजी मुघल हे नाव चालेल एक वेळ; पण मनूची ऐवजी " मानुत्ची " हे कुठले सोंग ! शुद्ध इटालियन भाषेत दोन अडीच शतकांपूर्वी त्याचा उच्चार कसाही असो, आज सुमारे शंभर वर्षे मराठी वाचकांना मनूची म्हणून टाऊक असलेल्या लेखकाला " मानुत्ची " का बनवावे ? बरे, मानुत्ची = मानुच्ची = मानुची हाच त्याचा उच्चार होत असल्याने खरा फरक मनुची – मानुची यांतला आहे. म्हणून " मानुत्ची " लिहिण्याचा हव्यास ही एक फॅशन दिसते. पोर्तुगीज ऐवजी पोर्तुगेज लिहिण्याचे आणि त्याला फिरंगी जोडण्याचे प्रयोजनही समजत नाही. इतिहासलेखनात वैयक्तिक विकल्पांना पुष्कळ अवसर असला तरी त्याला बळी न पडता एका बहुमान्य पद्धतीचा स्वीकार, हा व्यवहारी शहाणपणा ठरतो. काटेकोर दृष्टीने पाहावयाचे तर फिरंगी शब्दाचा उपयोग सर्रहा सर्व युरोपियनांबाबत तरी व्हावा किंवा फ्रेंचांना उद्देशून तो शब्द योजावा. केवळ पोर्तुगीजांनाच फिरंगी असे का म्हणावे ? नुसते पोर्तुगीज म्हटल्याने अर्थबोध व्यवस्थित होत असता पोर्तुगीज–फिरंगी असा जोड शब्द जेथे तेथे का वापरावा कळत नाही. अस्तु.

## संभाजीची तरफदारी

एकंदरीने पाहता " शिवपुत्र संभाजी " ही संभाजीची तरफदारी वाटते. अगदी

नवा निराळा संभाजी सादर करण्याचा हा प्रयत्न आहे. रूढ कल्पना दूर सारण्यासाठी आपणास हे चरित्र लिहावयाचे आहे, अशा जाणिवेने केलेला हा खटाटोप वाटतो. संभाजी चरित्रात " रिकामा " वेळ किती गेला, हे कालपटावरून सहज समजते. या अवधीत ही संभाजीची निष्क्रियता का ? ह्या प्रश्नाचे उत्तर प्रस्तुत ग्रंथात मिळत नाही. तद्वत संगमेश्वरासारख्या ठिकाणी तो शत्रूच्या तावडीत सापडला, याचे कारण उमगत नाही. तो दाखविला आहे तसा युद्धविशारद असता, त्याचे हेरखाते तत्पर असते तर त्याजवर असा प्रसंग ओढवताना ! चोहोकडून शत्रूंनी घेरले आहे याचीही ज्याला खबर नाही तो अशा वेळी " बेसावध " राहिला, कुठल्या तरी कैफात तो असावा असे अनुमान काढले, तर ते गैर नाही. संभाजी तळघरात दडला की नाही, तो संगमेश्वरास सापडला की त्याला नावडी येथे पकडले हा वाद मुख्य नसून अशा प्रकारे शत्रूच्या हाती तो कसा पडला हा महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याला तत्रस्थांनी सावध राहण्याची सूचना दिली नसेल असे वाटत नाही. पण त्या सूचनेची दखल घेण्याइतका " सावध " तो नसावा असे वाटते. कोणत्याही दृष्टीने पाहा संगमेश्वरासारख्या ठिकाणी संभाजी मोगलांच्या हाती पडतो, ही मोठी नामुष्कीची गोष्ट ठरते. राजपुरुषाला अत्यावश्यक ती सावधगिरीही त्याने घेतली नाही–शत्रू चोहोबाजूस आहे याची जाणीवही त्याला नव्हती, हीच बाब संभाजीराजांच्या इतर गुणांवर विरजण घालण्याइतकी प्रभावी आहे.

## यद्यपि शुद्धं...

तांत्रिक शाक्त पंथीयांच्या आहारी संभाजी गेला, हीच गोष्ट त्याच्या दुराचाराचा पक्का पुरावा असता, इंग्रजी ग्रंथाधारे तंत्रात वाईट काही नाही, असे आधुनिक मत मांडून संभाजीला सदाचाराचे सर्टिफिकेट जाहीर रीत्या अर्पण करण्याचा खटाटोप हास्यास्पद ठरतो. " यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं – नाचरणीयं " हा दंडक सहजमान्य आहे. तंत्राचा प्रभाव असलेले प्रदेश ( आसाम, ओरिसा इत्यादी ) सुजनांना प्रवासासाठी वर्ज्य होते. शाक्तांच्या आचाराला वामाचार हे नाव सर्वमान्य होते, ह्या गोष्टींचा सौ. गोखलेबाईंनी विचारच केलेला दिसत नाही.

## स्वराज्यद्रोह-पितृद्रोह...

संभाजी सपत्निक मोगलांकडे आश्रयार्थ गेला, छत्रपती शिवाजीवर रुसून गेला, ह्या घटनेचे देखील योग्य मोजमाप, संभाजीवरील आत्मीयतेमुळे असेल कदाचित, ह्या ग्रंथात झाले नाही. स्वराज्याचा कट्टा वैरी औरंगजेब, त्याच्या आश्रयाला छत्रपतींच्या युवराजाने कबिल्यासह जावे, ही घटना साधीसुधी नव्हे. राष्ट्र ही कल्पना त्यावेळी उद्भवली नव्हती; पण स्वराज्य ही बाब तर तत्कालीनांना समजत होती ना ? स्वराज्य-द्रोह, पितृ-द्रोह ( आणि संभाजीला धर्मवीर ठरवायचे तर ) धर्मद्रोह अशा तिहेरी

पातकांचा धनी संभाजी सदाचारी म्हणून मिरवायचा असेल, त्यांनी तो खुशाल मिरवावा. अशा पातकांना – देहान्त प्रायश्चित्त असल्याने संभाजी छत्रपती झाला, हीच मोठी आपत्ती महाराष्ट्रावर आली, असे तत्कालीन मुत्सद्द्यांना वाटावे अशी स्थिती होती. राघोबाला पेशवा होऊ देण्यात जी हरकत होती – तीच थोड्या अधिक प्रमाणात संभाजीबाबत होती. हा व्यापक विचार शिवपुत्राबाबत आढळत नाही.

संभाजीचा इंग्रजी अवतार लवकरच वाचकांना सादर करण्याचा सौ. गोखले यांचा विचार आहे. तो अमलात आणण्यापूर्वी वरील विवेचनाचा विसर न व्हावा.

श्री. रा. टिकेकर

*

☐ **अठरा लक्ष पावलं** ( ललित )— दि. बा. मोकाशी, मौज प्रकाशन, मुंबई ४; ९ रु. ५० पैसे ☐ **पपा सांगा कुणाचे** ( नाटक )— सुरेश खरे, के. वा. जोशी, पुणे ३०; ५ रु. ☐ **एखादी तरी स्मितरेषा** ( नाटक )— बाळ कोल्हटकर के. वा. जोशी, पुणे ३०; ५ रु. ☐ **ययाति** ( नाटक )— गिरीश कर्नाड, अनु. श्री. र. भिडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४ रु. ☐ **चेहरे आणि मुखवटे** ( एकांकिका )— पद्माकर गोवईकर, के. वा. जोशी, पुणे ३०; ५ रु. ☐ **रात्र एक अंधारी आणि हत्या** ( एकांकिका )— श्रीनिवास भणगे, के. वा. जोशी, पुणे ३०; २ रु. ☐ **माझी ताई** ( नाटिका )— पु. शं. पतके, पां. र. अंबिके, पुणे ३०; ३ रु. ☐ **सत्तेचा विजय असो** ( नाटक )— श्रीकृष्ण पुणेकर, शशिकांत जावडेकर, मेहुणपुरा, पुणे ३०; ६ रु. ☐ **निर्माल्य** ( कविता )— ग. शं. दीक्षित, ८७७ गोखले नगर, पुणे १६; ५ रु. ☐ **फलज्योतिषातील समग्र ग्रहयोग** — व. दा. भट, के. वा. जोशी, पुणे ३०; १५ रु. ☐ **पद्य रुक्मिणीस्वयंवर**— सौ. लक्ष्मीबाई कुलकर्णी, मंगळवार, सातारा; १ रु. ☐ **रुबायत** — उमर खय्याम, अनु. वा. ल. अंतरकर, हंस प्रकाशन, पुणे ३०; २ रु. ☐ **चंद्रफूल** ( कविता )— सौ. संजीवनी मराठे, स्त्री सखी प्रकाशन, किर्लोस्कर प्रेस, पुणे ९; ५ रु. ☐.

# भरारी

कवयित्री विमलाबाई देशपांडे, नागपूर प्रकाशन, नागपूर, किं. ६ रु.



आजच्या पिढीला विमलाबाईंचे नाव कवयित्री म्हणून बहुतेक अज्ञातच आहे. काव्यलेखन हे विमलाबाईंनी आपल्या व्यवसायाचे, किंबहुना व्यक्तित्वाचेही महत्त्वाचे अथवा अपरिहार्य असे अंग केव्हाच मानले नसावे. त्यामुळे गेल्या अर्धशतकात (१९२० ते १९७०) त्यांनी लिहिलेल्या कवितांची संख्या पाउणशेच्या आतबाहेरच राहिलेली आहे. मनातून काव्यरचनेची ऊर्मी आल्यावाचून कविता लिहू नये हे पथ्य त्यांनी कटाक्षाने पाळलेले दिसते. गेल्या दहा वर्षांत (१९६१-१९७१) आणि त्याआधी १९३९-४९ या दशकात त्यांनी काव्यरचना केली नाही. पिढीच्या दृष्टीने त्या 'अनिलकवी'-च्या कालातील आहेत. विशीच्या आतच काव्यरचनेला त्यांनी प्रारंभ केला. विशीएकविशीत प्रेमानुभवाच्या आवर्तात त्यांनी अठरा कवितांची 'माला' आपल्या प्रेमदेवतेस अर्पण केली. प्रेमसाफल्याने या पहिल्या काव्यरचनेची प्रेरणाच शांत झाल्याने पुढे काव्यरचनाही थंडावली आणि त्यापुढील १५ वर्षांत अधूनमधून आठदहा कविता लिहून तिने दहा वर्षे विश्रान्तीच घेतली. त्यानंतर १९४९ पासून पुनः काव्यरचना सुरू झाली; परंतु पहिल्या विमल कोल्हटकरचे आता विमलाबाई देशपांडे यांच्यात रूपांतर झाले होते. आता प्रेमभावनेच्या आविष्कारास गौणत्व आले, आणि जीवनातील इतर भावानुभवांकडे लक्ष गेले होते. त्यांनाही प्रकट रूप देण्याची आवश्यकता १९६१ नंतर त्यांना वाटली नसावी, म्हणून त्यापुढे हीही काव्यरचना थांबली; निदान तिचे दर्शन या संग्रहामध्ये होत नाही. विमलाबाईंच्या काव्यरचनेचा हा थोडक्यात आलेख आहे.

या कवितेचा सविस्तर परामर्श कवी अनिल यांनी प्रस्तावनेमध्ये घेतला आहे. ते या काव्यरचनेचे पहिल्यापासून साक्षी होते. त्यामुळे हे कार्य त्यांनी मोठ्या आत्मीयतेने केले आहे. त्यांच्याखेरीज इतर कोणास ते इतक्या चांगल्या प्रकाराने करिताही आले नसते. "या कवितेतील अनुभव-विश्व स्वतःच्या जीवनातून साकारलेले आहे; म्हणून या कविता खऱ्या आहेत" असा निर्वाळा ते देतात, आणि त्यांचा तसा अधिकारही आहे. ते आणखीही म्हणतात, "कवीच्या काळाशी, त्याच्या जीवना-

नुभवाच्या विशेषतेशी, ह्या कवितेच्या तळाशी असणाऱ्या आशयाशी आणि त्या कवितेच्या अभिव्यक्ति–पद्धतीशी समरस होता आले पाहिजे." कवी अनिल यांच्या ठिकाणी ही क्षमता बहुतांशी असल्याने त्यांना त्या कवितेचे रहस्य साहजिकच समर्थ-पणे विशद करिता आले आहे. इतरांना त्यात काही भर घालणे शक्य होणार नाही.

परंतु अनिल काही झाले तरी ' वधू-बन्धू ' आहेत, आणि त्यामुळे काही गोष्टी त्यांना स्पष्टपणे सांगता आलेल्या नसाव्यात. ते म्हणतातः– "काव्यसौंदर्य घाटात असते, तोल आणि लय यांच्या थाटात असते, इत्यादी इत्यादी आहेच, पण ते अर्थातही असते. अर्थसौंदर्य, विचारसौंदर्य, कल्पनासौंदर्य हीसुद्धा काव्यसौंदर्याचीच अंगे आहेत त्यांचेही दर्शन घ्यावयाला हवे." या विधानांचा रोख नव-समीक्षेवर आहे हे सहज कळण्यासारखे आहे, पण त्याचा असाही अर्थ होऊ शकतो की, विमलाबाईंच्या कवितेत ' घाट किंवा तोल–लय यांचा थाट ' यांचे दर्शन व्हावे, तितके होत नाही.

आणि हे बऱ्याच अंशी खरे आहे, पूर्वार्धातील कवितेमध्ये बरेच रचनाशैथिल्यही आहे. विमलाबाईंच्या कवितेत कवितेचा नखरा म्हणता येईल, तो जुन्या किंवा नव्या कोणत्याच प्रकारचा नाही. मनातील भावनांचा तो सरळ व प्रामाणिक आविष्कार आहे, आणि त्यानेच येणारे काही सहजसौंदर्य तीमध्ये आहे. हा आविष्कार करिताना गज्जल किंवा मुक्तछंद यांचा साधन म्हणून स्वीकार त्यांनी केला असला, तरी त्यात रविकिरण मंडळ व अनिल यांचा अनुकार मुळीच नाही. तो आविष्कार त्यांचा स्वतःचा आहे. भावनेचा आविष्कार मोकळा, स्पष्ट असला, तरी त्यामध्ये उत्तानता, तारुण्यातील किंवा प्रौढ वयातील कवितेत – कोठेच दिसणार नाही. संयम हा तिचा स्वाभाविक असा गुण आहे. बहुतेक ठिकाणी हा भावनाविष्कार निसर्गातील प्रतिमांच्या साहाय्याने करणे, त्या प्रतिमांचा वेचक आणि समर्पक उपयोग करणे, कवितेत शब्दाचे वा अर्थाचे जाणून अलंकरण न करणे व कृत्रिमता येऊ न देणे, तीमध्ये अकारण पसारा कटा-क्षाने टाळणे असे या कवितेचे रूप आहे. तीमध्ये आजच्या कवितेची दुर्बोधता मुळीच नाही. केवळ स्वतःसाठी किंवा फार तर दोघांसाठी लिहिलेल्या प्रारंभीच्या प्रेमकवितेत क्वचित किंचित गूढता असली, तरी ती दुर्बोध झालेली नाही. विमलाबाईंची कविता ही कविता जशी असावी तशी–म्हणजे स्वार्थ – स्वतःकरिताच आहे. तिला लोकांसमोर मिरविण्याची साहजिकच हौस नाही. तथापि जीवनाच्या संध्याकाळी त्यांनी ती एकत्रित-पणे लोकांना उपलब्ध करून दिली हे चांगले झाले. कारण, तीमध्ये ' वसंत ', ' तेव्हा आणि आता ',' दीपविसर्जन ', ' एका धुंद पहाटेस ', ' असु दे मलाच माझ्याजवळ ', ' माझ्या बागेत ', ' जवळीक हवी त्याला ', ' जीवा विसाव जरा ', इत्यादी दहा बारा तरी कविता अशा आहेत की ज्या कोणाही रसिकास चटका लावतील आणि त्याच्या कायम स्मरणात राहतील. आणि हे कवियशही काही थोडके नाही.

रा. श्री. जोग



अनुक्रमणिका







## डॉ. भाऊ दाजी, व्यक्ति, काल आणि कर्तृत्व

लेखक : अ. का. प्रियोळकर, प्रका. मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४, पृ. २८ + ५८६, मूल्य १५ रु.

'डॉ. भाऊ दाजींचा काळ, कर्तृत्व आणि व्यक्तित्व' यांचा समग्र आणि साधार परिचय करून देणारा इतका उत्कृष्ट चरित्रग्रंथ उतारवयात श्री. प्रियोळकरांनी मराठी वाचकांना उपलब्ध करून दिला, यानिमित्त त्यांचे सर्वांनीच आभार मानले पाहिजेत. या ग्रंथाचे वैशिष्ट्य हेच आहे की, ग्रंथकर्त्यांनी स्वतःच्या व्यक्तित्वाचा बहुतांशी लोप करून चरित्रनायकासंबंधी आणि त्याच्या काळासंबंधी परिश्रमपूर्वक मिळविलेली माहिती मूळच्या स्वरूपातच वाचकांना उपलब्ध करून दिली आहे. वर्तमानकाळी देशात खोट्या इतिहासांचे नि चरित्रांचे कारखाने चालू झाले असल्याने डॉ. भाऊ दाजींच्या चरित्रातील या 'साधनशुचिते'चा सकृद्दर्शनीच अगत्यपूर्वक उल्लेख करावा, असे वाटणे स्वाभाविक आहे. अशाच प्रकारची साधनशुचिता कै. लोकशिक्षणकार जांभेकरांनी बाळशास्त्री जांभेकरांच्या चरित्रातही पाळण्याचा प्रयत्न केला असला तरी त्या ग्रंथात लोकशिक्षणकारांनी स्वतःच्या व्यक्तित्वाचा अत्यधिक आविष्कार केल्यामुळे मूळ विषयालाच गौणत्व प्राप्त झाले.

डॉ. भाऊ दाजी हे गौड सारस्वत कुळात जन्मले. काही संशोधकांची अशी समजूत आहे की, मत्स्यजीवी समाजातच मानवी संस्कृतीचा जन्म झाला. कारण प्राचीन काळी मत्स्यजीवी समाजांनाच नदीतीरावर अथवा समुद्रकाठी एकाच स्थळी पिढ्यान् पिढ्या राहून आपली राहणी अधिकाधिक सुखदायक करणे आणि आपल्या मातृभूमीचे ऐश्वर्य वाढविणे शक्य होते. आदिम युगातील पशुपाल तर बोलून चालून भटके. शेतीत सुधारणा होईपर्यंत शेतकऱ्यांनाही आपल्या धान्योत्पादनाचे क्षेत्र वरचेवर बदलावे लागत असे. त्यामुळे ईशावास्यात म्हटल्याप्रमाणे 'तदेजति तन्नेजति' अशा स्थिर आणि चंचल जीवनाचा मत्स्यजीवी समाजांनाच संलग्न अनुभव घेता येत होता. ते कसेही असो. भारतात जलचरांचे राज्य प्रस्थापित झाल्यानंतर पाश्चात्त्य संस्कृती आत्मसात करून घेऊन मातृभूमीचा उद्धार करण्याच्या उपक्रमात बंगाल आणि महाराष्ट्रातील गौडसारस्वतांनी प्रामुख्याने भाग घेतला होता, ही गोष्ट निर्विवाद आहे.

## डॉ. भाऊ दाजींची बहुमुखी प्रतिभा

डॉ. भाऊ दाजी हे मुंबईच्या आयुर्विद्या महाविद्यालयाचे पहिले स्नातक. त्या नात्याने आपल्या व्यवसायात तर ते अग्रणी होतेच. त्याव्यतिरिक्त सामाजिक सुधारणा, राजकारण, उद्योगव्यवसाय, शिक्षणसंस्था, नाटकमंडळ्या इत्यादी विविध क्षेत्रांतील आदोलनांतून ते प्रामुख्याने भाग घेत. ते जाणते झाले तेव्हा संस्कृतीची सर्व क्षेत्रे जवळ जवळ ओसाड पडली होती आणि कीर्तिमंदिरातील बहुतेक सारी स्थाने शून्य राहिली होती. त्यामुळे भाऊ दाजींची प्रज्ञा आणि उद्योगशीलता यांचा नवोदित सुशिक्षित समाजावर लवकरच प्रभाव पडून त्यांची मुंबईतील प्रमुख नागरिकांत गणना होऊ लागली. भाऊ दाजी हे मुंबईतील सार्वजनिक सभा जी 'बॉंबे ॲसोसिएशन' तिचे प्रमुख कार्यकर्ते, तत्कालीन शिक्षण मंडळाचे सभासद, स्त्रीशिक्षणाचे सक्रिय पुरस्कर्ते, मुंबई विद्यापीठातील कला आणि वैद्यक या विभागांच्या कार्यकारिणीचे प्रारंभापासूनचे सभासद, प्राच्यविद्या संशोधनासाठी स्थापलेल्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे पहिले भारतीय उपाध्यक्ष होते. त्रोटक उल्लेखांवरूनही त्यांच्या बहुमुखी प्रतिभेची आणि उद्योगशीलतेची वाचकांना कल्पना येईल.

## बहुमुखी प्रतिभेचा आर्थिक आधार

भाऊ दाजींच्या सारखी बहुमुखी प्रतिभा बंगाल्यातील तत्कालीन कार्यकर्ते राजा राजेंद्रलाल मित्र यांच्या प्रभावळीतील अनेक विचारवंतांना, आणि बंकिमचंद्र चतर्जींना लाभली होती. पण राजेंद्रलाल मित्रांना भूस्वामित्वाचा (जमीनदारीचा) आणि बंकिमचंद्रांना सरकारच्या सेवेचा जसा आर्थिक आधार होता, तसा भाऊ दाजींना नव्हता. त्यामुळे त्यांना आपल्या वैद्यकव्यवसायासह मुंबईतील सनातन सट्टयाच्या व्यवसायात भाग घेण्याची बुद्धी झाली. हा व्यवसाय त्यांना प्रथम लाभदायक झाला. पण नंतर अधिकाधिक साहसे करण्याचा मोह पडून शेवटच्या दिवसांत त्यांच्यावर आर्थिक आपत्तींना तोंड देण्याची पाळी आली. ज्यांना आपल्या कर्तृत्वाविषयी पूर्ण आत्मविश्वास असतो, असेच लोक भाऊ दाजींच्या सारखी साहसे करण्याला प्रवृत्त होतात. ते कधी सावधगिरी नामक श्रीमंत पण कुरूप कुमारीच्या आराधनेकडे वळत नाहीत. ब्लेकने म्हटले आहे, 'Prudence is a rich, ugly old maid wooed by incapacity.' असली सावधगिरी सामाजिक दुराचरणावर पांघरूण घालून द्रव्यलाभ करून घ्यावयाला शिकवीत असताना डॉ. भाऊंनी गुजराथी वैष्णव महाराजांच्या विरुद्ध साक्ष देऊन त्यांना झालेल्या लैंगिक रोगांची सार्वजनिक रीतीने वाच्यता केली. अशी वाच्यता केल्याने पुष्कळ पापी श्रीमंतांनी डॉ. भाऊंवर बहिष्कार टाकला. त्यामुळे झालेली आर्थिक हानीही त्यांनी आनंदाने सहन केली. केवळ वैष्णव महाराजांच्या अनाचारांचाच नव्हे, तर इंग्रज राज्यकर्त्यांच्या अत्याचारांचाही प्रतिकार

करण्यात भाऊ दाजी पुढाकार घेत असत. त्यांच्या काळी एका इंग्रजाने आपल्या शिंप्याकडून कपडे शिवून घेतल्यानंतर त्याचे पारिश्रमिक पारितोषिक म्हणून त्याला द्रव्य न देता त्याला आपल्या घरी बोलावून त्याचे चांगलेच अंगमर्दन केले. (आपल्याला होणाऱ्या मारपिटीचे वर्णन राजबंदी 'अंगमर्दन' या शब्दानेच करतात.) इतकेच नव्हे तर त्याच्यावर खोटा आरोप करून त्याला न्यायालयाकडून शिक्षा करविली. ही कथा भाऊंनी वृत्तपत्रांतून वाचल्यानंतर त्यांनी शिंप्याचा पक्ष उचलून धरला आणि त्याच्या नावाने वरिष्ठ न्यायालयाकडे आवेदन करून सरतेशेवटी त्याला न्याय मिळवून दिला. या प्रकरणी भाऊंना निदान दशसहस्रांची घस सोसावी लागली. डॉ. भाऊ दाजी हे व्होल्तेरसारखे श्रीमंत नव्हते, तरीसुद्धा व्होल्तेरसारखीच त्यांना अन्यायाची अतिशय चीड होती आणि त्यामुळेच वर उल्लेखिलेल्या शिंप्याच्या प्रकरणासारखी अन्यायाची उदाहरणे त्यांच्यापुढे आली तर त्या दलितांना न्याय मिळवून देण्याकरिता ते आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीत.

## परक्यांनी लिहिलेले भारताचे इतिहास

परक्यांनी लिहिलेले परतंत्र भारताचे इतिहास म्हणजे दलित भारतावर होत असलेल्या अन्यायांचे ज्वलंत प्रतीकच त्यांना भासत असल्याने, आपण स्वतःच भारताचा खरा इतिहास लिहावा आणि भारतीय अस्मितेला जडलेला महारोग दूर करावा, अशी त्यांची फार इच्छा होती. जुने शिलालेख, जुनी संस्कृत पुस्तके यांचा त्यांनी मोठा संग्रह केला होता. काठेवाड, काश्मीर, काशी, पुरी, मद्रासेतील प्रमुख ठिकाणे येथे आपली माणसे पाठवून जुन्या ग्रंथांची हस्तलिखिते त्यांनी मिळविली. जिथे हस्तलिखिते हस्तगत झाली नाहीत, तिथे त्यांच्या प्रती आपल्या पंडितांकडून करून घेतल्या. फ्रेंच, जर्मन प्रभृती पाश्चात्त्य भाषांतून भारतीय संस्कृतीवर झालेल्या ग्रंथांची त्यांनी स्वतःसाठी इंग्रजीत भाषांतरे करून घेतली. असले उद्योग आज इतिहास-संशोधनाला वाहिलेल्या संस्थासुद्धा करीत नाहीत. केलेच, तर अत्यल्प प्रमाणावर करतात. या इतिहासवेडापायीही भाऊंना अपरिमित व्यय करावा लागत होता, हे सांगायला नकोच.

## शालेय विद्वानांचे अज्ञान

पाश्चात्त्य विद्वानांच्या संशोधनाकडे भाऊंचे लक्ष्य असले तरी त्यांनी आताच्या शालेय विद्वानांच्या प्रमाणे पाश्चात्त्यांना आपली बुद्धी गहाण टाकली नव्हती. परदेशाहून कल्पनांची, विचारांची उसनवारी करण्याच्या सवयीने बुद्धीला परावलंबनाची खोड जडते आणि स्वतःची विचारशक्ती दुर्बल होते. हॅझलिटने म्हटले आहे, "The faculties of the mind when not exerted, or when cramped by custom and authority, become listless, torpid and unfit for the

purpcses of thought and action· Can we wonder at the languor and lassitude which is thus produced by a life of learned sloth and ignorance. " असल्या मानसिक परावलंबनाने भाऊंची विचारशक्ती क्षीण अथवा निकामी बनली नसल्याने त्यानी प्रिन्सेप, थॉमस, स्टीव्हन्सन प्रभृतींच्या चुका दाखवून प्राचीन शिलालेखांतील संख्यावाचक चिन्हांचे वाचन निश्चित केले आणि भारतीय इतिहासातील घटनांचा कालानुक्रम लावणे शक्य आणि सुलभ केले. भाऊ दाजींचा हा शोध महत्त्वाचा असला तरी वर उल्लेखिलेल्या पाश्चात्त्य विद्वानांवर टीका करण्याचे पाप त्यांनी केले असल्यामुळे त्यांच्या कीर्तीला काळिमा लावण्याचा प्रयत्न पाश्चात्त्यांनी कसा केला ही कथा येथे सांगितली पाहिजे. डॉ. भाऊंनी संशोधनाच्या कार्यात स्वतःला साहाय्य करण्याकरिता गोपाळ पांडुरंग पाध्ये नामक एक संस्कृत पंडित आणि शिलालेखांचे वाचन करण्याकरिता, ठसे घेण्याकरिता भगवानलाल इंद्रजी हे एक होतकरू गुजराती तरुण यांना आश्रय दिला होता. भाऊंच्या हाताखाली संशोधनाचे धडे घेऊन भगवानलाल इंद्रजींनी पुढे संशोधक या नात्याने चांगली कीर्तीही संपादिली. एके काळी भारतीय पंडित संचाराला बाहेर पडले म्हणजे त्यांच्या सहशिष्यांचे तांडे असत. इतकेच नव्हे, तर ज्याला शिष्य नाहीत, तो पंडित नव्हेच अशी तेव्हा लोकांची समजूत होती.

## आरोपाचे खंडन

एखाद्या थोर गुरूंच्या हाताखाली पडेल ते काम करून आपण त्यांच्या विद्येचे वारस व्हावे, आणि त्यांची परंपरा अखंडित ठेवून देशाचे कल्याण करावे, अशा बुद्धीने गुरूचा शोध करणारे शिष्यच आता उरलेले नाहीत. अशा युगात भाऊंनी गुजराथेतील चार विद्वानांच्या कडे शोध करून भगवानलाल इंद्रजी हा शिष्य मिळविला आणि त्याचा सारा व्यय स्वतः चालवून आपली संशोधनाची संजीवनी विद्या त्याला समर्पण करून अजरामर केला, हे त्यांच्या थोरवीचे एक देदीप्यमान उदाहरण आहे. असे डॉ. भाऊ दाजी आणि त्याचे शिष्य भगवानलाल इंद्रजी यांच्या परस्परसंबंधांची पवित्र स्मृती दूषित करण्यासाठी डॉ. ब्युएलर यांनी भाऊ दाजींवर आपल्या शिष्याचे विद्याधन चोरल्याचाआरोप केला, "I have strong reasons for the belief that at least a considerable share of the results at which Dr. Bhau Daji arrived is due to Bhagawanlal Indraji's industry and ingenuity." या निराधार आरोपाचे प्रियोळकरांनी समर्पक खंडन केलेले वाचकांनी मुळातूनच पाहावे. इथे इतकेच सांगितले म्हणजे पुरे की, पुरातत्व संशोधनात मुरलेले माझे मित्र श्री. सदानंदराव दीक्षित यांच्या मनात डॉ. भाऊंच्या विषयी दृढमूल झालेला दुर्ग्रह प्रियोळकरांचे विवेचन वाचून दूर झाला.

# महारोगासंबंधी संशोधन

डॉ. भाऊ दाजी यांनी रुग्णसेवेचा व्यवसाय स्वीकारला होता. आणि या व्यवसायात केवळ प्रचलित विज्ञानावर विसंबून न राहता या विज्ञानात आपली स्वतःची त्या विज्ञानात नवी भर घालावी, अशी आकांक्षाही त्यांच्या मनात होती. त्यामुळे मानवांचा महान शत्रू जो महारोग त्याच्यावर रामबाण उपाययोजना शोधून काढण्याचा त्यांनी प्रथमपासूनच प्रयत्न चालविला होता. पण त्यांना या प्रयत्नात यश आले, ते कापसाच्या सट्ट्यात ते सपशेल बुडाल्यानंतर आले. नवीन औषधांचा प्रयोग, हा मानवी जीवनाशी एक प्रकारचा सट्टाच होय. मात्र कापसाच्या सट्ट्यात प्रतिकूल झालेले दैव या सट्ट्यात त्यांना अनुकूल झाले. हे पाहून समाजबहिष्कृत महारोग्यांना आपले चराऊ कुरण समजणाऱ्या खिस्ती धर्मोपदेशकांना आणि त्यांच्या हस्तकांना त्यांचे वैषम्य वाटू लागले. कारण समाजबहिष्कृत महारोगी धनी असला तर त्याच्या धनाचा वारसा खिस्ती धर्मप्रचारक संस्थांना मिळवून देणे आणि तो दरिद्री असल्यास त्याच्या सेवेच्या निमित्ताने धर्मप्रसारकांच्या संतपणाची नौबत वाजविणे, हे उद्देश मनात बाळगूनच हे लोक महारोग्यांत मिसळत. भाऊ दाजी यांना महारोगावरील औषध साध्य झाल्यामुळे आपल्या मुखातील महारोग्यांचा ग्रास हे काढून नेत आहेत, अशी त्यांची भावना झाली. डॉ. डेव्हिड यंग, एम्. डी. या खिस्ती धर्मोपदेशकांच्या भिषग्वर्यांनी, 'बॉम्बे गार्डियन' सारख्या वृत्तपत्रातून डॉ. भाऊ दाजी यांच्याविरुद्ध कोल्हेकुई करण्याला प्रारंभ केला. आणि त्यांचे हस्ते डॉ. सखाराम अर्जुन यांच्यासारख्या महाराष्ट्रीय सज्जनांनी (!) लोकांवर गुप्तपणे प्रयोग करून त्यांच्या प्राणांशी सट्टा खेळण्याच्या अपराधानिमित्त भाऊंना फाशी द्यावे, अशी निर्लज्जपणे उघड मागणी केली. हा सारा इतिहास वाचला म्हणजे पारतंत्र्यामुळे मानव अधःपाताच्या किती पराकोटीला जातो, याची कल्पना येते. महारोगावरील शोधून काढलेल्या उपचारांची सविस्तर माहिती डॉ. भाऊंनी रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलीक यांना सांगितली होती. आपले प्रयोग पूर्ण झाल्यानंतर स्वतःच ती सर्व प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार होता. पण त्यापूर्वीच त्यांना पक्षघातामुळे पंगूपणा आल्याने ते काम त्यांच्या हातून झाले नाही. देशहितासाठी आपल्याला भाऊंनी सांगितलेली माहिती प्रसिद्ध करण्याची मंडलिकांची इच्छा होती. पण भाऊंच्या आप्तांनी अदूरदर्शित्वामुळे त्यांनी ती मंडलिकांना प्रसिद्ध करू दिली नाही. अशा प्रकारे भाऊंच्या अत्यंत महत्त्वाच्या संशोधनाला आपला देश मुकला. प्राचीन इतिहासाच्या क्षेत्रात डॉक्टरांनी जसा एक शिष्य केला होता, तसाच त्यांनी या महारोगाच्या संशोधनात केला असता, तर पारतंत्र्याच्या प्रारंभीच्या काळातही भारतीय प्रतिभा मानव जातीवर केवढे उपकार करू शकते, याचे निदर्शन मुंबईत महारोग्यांना रोगमुक्त करण्याच्या रुग्णालयाच्या रूपाने परदेशांना दाखविता आले असते. पण

आपल्या दुर्दैवाने ते घडू शकले नाही. असो. अशा या थोर पुरुषाचे साधार चरित्र संशोधनाचे कष्ट करून श्री. प्रियोळकरांनी उतारवयात लिहिले, त्यानिमित्त त्यांचे पुनश्च अभिनंदन करून हे परीक्षण संपवितो.

अ. ज. करंदीकर

## विप्र विश्वनाथकृत अभिमुन्ये – वीव्हावो*

संपादक प्रा. व. दा. कुलकर्णी, प्रकाशक–मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, पृष्ठे ११० मूल्य रु. ३



विप्र विश्वनाथ या कवीविषयी आजवर सर्वश्री. वि. का. राजवाडे, पांगारकर य. खु. देशपांडे, वि. ल. भावे, वि. अं. कानोले, ज. शा. देशपांडे आणि डॉ. प्रभु देसाई यांनी संशोधन केले आहे. विप्र विश्वनाथाचा काळ, त्याचे वाङ्मय, त्याची परंपरा आणि त्याचा संप्रदाय याविषयीची सुस्पष्ट कल्पना येत नाही. विप्र विश्वनाथ प्रस्तुत आख्यान-काव्याचे हस्तलिखित मराठीचे प्राध्यापक उस्मानिया विद्यापीठातील प्रा. व. दा. कुलकर्णी यांना मिळाल्याने त्या कवीविषयी अधिक माहिती उपलब्ध होण्याची शक्यता निर्माण झाली होती. तथापि या हस्तलिखितातही वरील बाबीसंबंधींचे फारसे उल्लेख या संदर्भात आढळत नसल्याने निराशाच पदरी येते. या काव्यात जे थोडेफार उल्लेख येतात त्यांच्या आधारावरच काही अनुमाने करून विप्र विश्वनाथाचा 'अभिमुन्ये-वीव्हावो' या काव्याचे हस्तलिखित सकळ लिपीत लिहिलेले आहे, ते एका महानुभाव संस्थानात उपलब्ध झाले, ' त्याची पोथी बायदेशकरे लेहीली ' इ. गोष्टीवरून विप्र विश्वनाथ हाही महानुभाव साम्प्रदायिकच असावा, असे अनुमान करण्याकडे कुणाही संशोधकाच्या मनाचा कल होण्याची शक्यता आहे. तथापि या आख्यानकाव्याचे प्रत्यक्ष वाचन केल्यानंतर त्यात महानुभाव पंथाची छाप आढळत नाही, याविषयी संपादकांनी मांडलेले मत योग्यच आहे. महानुभाव सांप्रदायिक तत्त्वज्ञानाच्या खुणा तर या ग्रंथात आढळत नाहीतच, उलट, पंथास मान्य नसलेल्या भवानी आदि देवतांचा त्यात आदरपूर्वक उल्लेख केल्याचे आढळते. महानुभाव संप्रदायात या ग्रंथास मानाचे स्थान मिळाले असावे, त्याचे कारण हे आख्यान महानुभावांस पूज्य वाटणाऱ्या, तसेच महानुभावांनी ज्यास पूर्णावतार मानले, त्या कृष्णावताराशी संबद्ध आहे. संपादकांनी याही गोष्टीचा उल्लेख केला असून त्यांचे हे मत स्वीकारणेच उचित ठरेल.

प्रस्तुत आख्यान-काव्यातील अभिमन्यु-विवाहाची कथा बारा प्रसंगांत विभागली आहे. संपादकांना उपलब्ध झालेली प्रत बरीच जुनी—म्हणजे शके १५६९ मधील आहे. ती आद्यन्तयुक्त आहे, हा तिचा एक विशेषच मानावयास हवा. तथापि या काव्याची जी अन्य हस्तलिखिते 'संपादकांच्या पाहण्यात' आली, त्यांचा तपशील त्यांनी प्रस्तावनेत दिलेला नाही. तो दिला असता तर संपादनार्थ उपयोजिलेली संहिता हीच उपलब्ध संहितांमधील संपादकांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे 'प्राचीनतम संहिता होय' असे त्यांना साधार सिद्ध करता आले असते. या अन्य हस्तलिखितांचा विचार न केल्याने प्रस्तुत संपादनात पाठभेद देण्यात आलेले नाहीत. ते दिले असते तर विविध हस्तलिखितांतील शब्दरूपांच्या साहाय्याने कवीच्या मूळ लेखनाप्रत जाणे अधिक सोयीचे झाले असते. त्याचप्रमाणे कवी ज्या कालखंडातील आहे, त्या पंधराव्या किंवा सोळाव्या शतकातील भाषेचे स्वरूप—दर्शनही नेमके घडलेले आहे, हे स्पष्ट झाले असते.

संपादकांनी आपल्या प्रस्तावनेत या आख्यानकाव्याच्या वैशिष्ट्याचे विवरण केलेले नाही. ते होणेही अवश्य होते. हे विवेचन न केल्यामुळे प्रस्तावनेत केवळ कवी विप्र विश्वनाथासंबंधीची ओझरती माहितीच काय ती मिळते. आख्यानकाव्य या दृष्टीने या काव्याचा स्तर कोणता याचा विचार होणेही आवश्यक होते. एकूण बारा प्रसंगांपैकी पहिल्या पाच प्रसंगांमध्ये पांडवांच्या द्यूतक्रीडेपासून द्रोपदीवस्त्रहरण प्रसंगा-पर्यंतचे वर्णन येते व खऱ्या कथाभागास एका अर्थाने तेथून पुढेच प्रारंभ होतो. अशा कित्येक गोष्टींची नोंदही या मूल्यमापनात संपादकांना घेता आली असती. तसेच कथा-निवेदन प्रसंगांची जडणघडण, स्वभावचित्रण, रसाविष्कार वर्णनशैली इ. विशेषांच्या संदर्भात या काव्याचे मूल्यमापन या गोष्टी येत्या तर अभ्यासकांची सोय झाली असती. ते न झाल्यामुळे प्रस्तावना त्रोटक वाटते. सवडीअंती संपादकांनी यासंबंधीही विवेचन केल्यास ते या ग्रंथातील प्रस्तावनेस निश्चितपणे पूरकच ठरेल.

**यू. म. पठाण**

# उभयान्वयी अव्यय

ले. चंद्रकांत खोत, अबकडई प्रकाशन, मुंबई ११, पृ. १६४, मूल्य रु. १०

' उभयान्वयी अव्यय ' ही आपली पहिली कादंबरी श्री. चंद्रकांत खोत यांनी अबकडई प्रकाशनाच्या वतीने स्वतःच प्रकाशित केली आहे. यापूर्वी ' मर्तिक ' या त्यांच्या काव्यसंग्रहाला राज्यसरकारचे पारितोषिक मिळाल्यामुळे ते मराठी वाचकांना परिचित झाले होते. चंद्रकांत खोत हे आजच्या पिढीतील लेखक आहेत. लिटल मॅगेझिनमधून लेखन करणाऱ्या आजच्या तरुण लेखकांचे फारच थोडे कौतुक प्रतिष्ठितांकडून होत असते. ( अर्थात या तरुण लेखकवर्गाला त्याची फारशी फिकीर नसल्याचेही त्यांनी अनेक ठिकाणी नमूद केले आहे. ) वाङ्मयाच्या क्षेत्रात असे घडणे शक्य असले तरी डाचत नाही. सहानुभूतिशून्य दृष्टिकोणामुळे नवीन पिढीतील लेखकांवर अन्याय होण्याची शक्यता असते. पूर्वग्रहदूषित वृत्तीमुळे या नवीन साहित्याचे मोजमाप सहानुभूतीने केले जात नाही. कामप्रवृत्तीच्या चित्रणाला प्राधान्य दिले गेल्यामुळे या लेखकांवरील टीका अधिक प्रखर होत असल्याचे आढळून येते. कामजीवनाशिवाय दुसरी कोणतीच अंगे या लेखकांना दिसत नाहीत काय, असा प्रश्न विचारून या टीकेचे दुसरे टोक गाठण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. केवळ नवेपणाचा स्वीकार म्हणून किंवा वाचकांचे व टीकाकारांचे लक्ष चटकन वेधून घ्यावे म्हणून कामजीवनाचे चित्रण नव्या अथवा जुन्या कोणत्याही लेखकाने केले तर त्या चित्रणाचे वाङ्मयीन मूल्य अलिप्तपणे निश्चित केले पाहिजे. 'उभयान्वयी अव्यय' मध्ये कामजीवनाचे परीक्षण केले गेले आहे व ती आजच्या तरुण लेखकांपैकी एका लेखकाने लिहिली आहे म्हणून तिच्या परीक्षणाबाबत एकांगी दृष्टिकोण स्वीकारणे योग्य नाही, ही जाणीव मनात बाळगूनच ' उभयान्वयी अव्यय 'चे परीक्षण पुढे केले जाणार आहे.

कामवासना ही मानवी जीवनातील एक प्रबळ अशी प्रवृत्ती आहे ही प्रवृत्ती लेखक किंवा सामान्य माणूस कुणालाच टाळता येणे शक्य नसते. प्रत्येक व्यक्ती जरी कामजीवनाचा प्रत्यय घेत असली तरी तो प्रत्यय घेण्याला मर्यादा असतात. मात्र व्यक्तिगत

जीवनातील वासनाचित्रणाला कलाकृतीत स्थान मिळते तेव्हा तिला अनेक संदर्भ प्राप्त होत असतात. कामजीवनातील विविध पातळयांचे निरनिराळया अंगांनी लेखक दर्शन घडवीत असतो. नेहमीच्या जीवनातील सांकेतिकता व मर्यादा दूर पडून कलाकृतीला शुद्ध स्वरूप प्राप्त होते. उलट या कामजीवनाच्या चित्रणाविषयी एखाद्या लेखकाने काही संकेत निर्माण केले, की त्या चित्रणाच्या मर्यादा अपरिहार्यपणे निश्चित होत असतात.

'उभयान्वयी अव्यय'च्या परीक्षणाच्या बाबतीत वरील विचार मुद्दामच मांडले आहेत. कारण 'उभयान्वयी अव्यय'मधील पात्रांच्या परस्परसंबंधांना व कामवासनेच्या चित्रणाला काही संदर्भ प्राप्त झाले आहेत. हे निरनिराळे संदर्भ कादंबरीचा नायक प्रदीप सावंत यांच्या निवेदनातून जाणवत आहेत. दिसायला सुन्दर असलेला हा नायक दिनकर नावाच्या आपल्या मित्राच्या वासनेला बळी पडतो. शकूताई ही आपली बहीण आहे असे समजणाऱ्या प्रदीपवर एका विशिष्ट प्रसंगी शकूताई मात्र, प्रदीप हा आपला भाऊ आहे, या भावनेने प्रेम करू शकत नाही. कादंबरीतील चवथे पात्र म्हणजे सलमा. सलमा ही एक वेश्या आहे. 'उभयान्वयी अव्यय'मधील ही चार माणसे एकमेकांशी वेगवेगळ्या संदर्भात निगडित आहेत. त्यातल्या त्यात प्रदीप, दिनकर व सलमा यांची जीवने परस्परांशी अधिक निगडित आहेत, तर शकूताई ही केवळ प्रदीपच्या जीवनाशी अधिक निगडित आहे.

समसंभोगाच्या विकृत सवयीने पछाडलेला दिनकर, परिस्थितीच्या भोवऱ्यात असाहाय्य झालेला प्रदीप, विशिष्ट कोंडीत सापडलेली शकूताई व वेश्येचे जीवन जगणारी सलमा या साऱ्यांच्या जीवनातील वास्तव हे कठोर व जीवघेणे वास्तव आहे. या चौघांचे जीवन हे चार-चौघांसारखे जीवन नाही. त्यांच्या परस्परसंबंधांना वेगवेगळे ताण प्राप्त झाले आहेत. यामुळेच 'उभयान्वयी अव्यय' कादंबरीतून स्तिमित करणारे, अस्वस्थ करणारे आणि वाचकाला अंतर्मुख करणारे काही निर्माण व्हावे, अशी अपेक्षा निर्माण होणे सहज शक्य आहे. मात्र प्रत्यक्षात तसे घडत नाही, हे या कादंबरीचे एक फार मोठे अपयश आहे.

या अपयशाला काही कारणे आहेत. ती कारणे लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाशी निगडित आहेत. चंद्रकांत खोत यांनी जे जीवनानुभव (ज्यांतही पुन्हा कामप्रेरणेला फार मोठे स्थान आहे) व्यक्त करायचे ठरविले त्यांची दिशा त्यांनी स्वतःच निश्चित केली आहे. काही आडाखे लेखकाने आधीच मनाशी बांधले आहेत. सलमा या वेश्येला शेर आवडणे, तिने एक जीवननिष्ठा म्हणून प्रदीपशी शय्यासोबत न करणे, प्रदीपने शकूताईशी असलेले संबंध वास्तव पातळीवर न आणता त्यांना आदर्शाचे रूप देणे इत्यादी घटनांतून व प्रसंगांतून लेखकाचे आडाखे निश्चित झालेले आढळून येतात. चंद्रकात खोत हे मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजातील लेखक आहेत. आपल्या वाचनातल्या (ह. मो. मराठे यांची कथा, सत्यकथेचा अंक इ.)

त्यांनी केलेला उल्लेख, सलमा या व्यक्तिरेखेला दिलेले प्रगल्भ रूप, शकूताईविषयी वाटणारे आदर, हळवे व भाबडे असे प्रेम इ. मधून सुशिक्षित व काही आदर्श जीवननिष्ठा जोपासणारा लेखक दिसतो. काही अंशी लेखक या चित्रणाने सुखावलाही गेला असेल. पण वाचकाच्यां नजरेतून खोतांच्या लेखनातील ही विसंगती सुटू शकत नाही. एका बाजूने जीवनातील कठोर व भेदक सत्याचे दर्शन घडवू इच्छिणारा लेखक विरुद्ध दिशेने कमालीचा हळवा, संवेदनाक्षम व भाबडा झालेला आढळून येतो. एखाद्या कलाकृतीमधील पात्राच्या स्वभावातील विसंगती समजावून घेणे शक्य असते. पण कलावंत म्हणून जेव्हा अशा दोन पातळ्या चंद्रकांत खोत एकाच वेळी गाठतात, तेव्हा कलाकृती म्हणून त्यांची निर्मिती सुसंवाद गाठू शकत नाही. ' उभयान्वयी अव्यय 'मधील प्रदीप सावंत काही वेळा प्रदीप सावंत आहे तर काही वेळा तो चंद्रकांत खोत आहे. लेखकाला ही विसंगती जर टाळता आली असती तर 'उभयान्वयी अव्यय' कादंबरीने अधिक वास्तव व प्रत्ययकारी रूप धारण केले असते. दिनकर व प्रदीप, प्रदीप व शकूताई, प्रदीप व सलमा या भावसंबंधांवर वेगळा प्रकाश पडू शकला असता. स्वतःची जीवनदृष्टी व स्वतःची काही मते लेखक जेव्हा अन्य पात्रांवर लादण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा सर्वच मामला अगदी तकलुपी व ढोबळ बनतो. अपघात व नाट्य-पूर्ण प्रसंगांची निर्मिती हे परंपरागत असे लेखनशैलीचे काही विशेष आहेत. चंद्रकांत खोत या लेखनशैलीच्या मोहातून सुटू शकले नाहीत. मेल प्रॉस्टिट्यूट म्हणून गेल्यावर शकूताईशी प्रदीपची झालेली भेट, दादा लोकांची मारामारी, प्रदीपने दिनकरचा सलमाशी थाटून दिलेला संसार या साऱ्या प्रसंगांतून परिणामकारकता वाढविण्या-साठी काही आडाखे बांधून लेखक पुढे जात असताना दिसून येतो. त्यामुळेच ' उभयान्वयी अव्यय ' मधील सांकेतिकतेमधून उभारले जाते ते वास्तवाभास निर्माण करणारे वास्तव. सांकेतिक परंपरा सांभाळणारी एक वाचनीय कादंबरी हे रूपही या कादंबरीला घेता आले नाही. आणि कठोर वास्तवदर्शन घडविणारी श्रेष्ठ शोकात्मिकाही इथे निर्माण होऊ शकत नाही. ( शकूताईचा मृत्यू कादंबरीच्या शेवटी आहे म्हणून या कादंबरीला शोकांतिका म्हणणे बरोबर नाही. )

श्री. चंद्रकांत खोत यांची ही पहिलीच कादंबरी आहे. प्रारंभीच्या लेखनांत दिसून येणारे काही दोष इथे दिसून येतात. तसे ते दिसणे अपरिहार्य आहे. परीक्षणाच्या सुरुवातीला मांडलेल्या विचारात नव्याचा धिक्कार करणे वा पुरस्कार करणे या प्रवृत्तींचा निर्देश केला आहे. 'उभयान्वयी अव्यय' बाबतच्या माझ्या प्रतिक्रिया नकारा-त्मक आहेत. पण त्या सर्वस्वी निराशाजनक मात्र मुळीच नाहीत. कारण या प्रारंभीच्या लेखनात श्री. चंद्रकांत खोत यांच्या शैलीतील सहजपणा, उत्स्फूर्तपणा—चटकन जाणवतो. जीवनानुभव घेतला जाणे व तो तसाच मांडला जाणे हे यशस्वी लेखनशैलीचे गमक असते. 'उभयान्वयी अव्यय'मधील बालजीवनाचे लेखकाने केलेले चित्रण अधिक-

वास्तव वाटते ते या सहजसुंदर शैलीमुळे. (हीच सहजता पुढील भागात विशेष करून कामजीवनाच्या चित्रणात आली असती तर हे समाधान वाढले असते.) या कादंबरीच्या संदर्भात 'धीटपणे केलेले लेखन' म्हणून ही चर्चा केली गेली आहे. धीटपणा या मुद्द्याला फारसे महत्त्व दिले जाऊ नये. कारण धीटपणाला एक तात्कालिक मूल्य आहे. भविष्यकाळात कदाचित हा 'धीटपणा' धीटपणाही वाटणार नाही. नवेपणाचे व धीटपणाचे कौतुक कलाकृतीवर व कलावंतासही अन्याय करील अशी भीती सदैव असते. या धीटपणाच्या बाबतीत लेखक आत्मसंतुष्ट राहिला तर त्याच्या लेखनाची मर्यादित दिशा निश्चित होईल. त्याचा विकासही खुंटेल; 'उभयान्वयी अव्यय' ही कादंबरी लिहिणाऱ्या चंद्रकांत खोत यांच्याकडून अपेक्षा आहे ती अधिक मूलगामी लेखनाची आणि अशा समर्थ लेखनाची काही बीजे 'उभयान्वयी अव्यय' मध्ये निश्चितच आहेत!

—वि. शं. चौघले

## लोकसंस्कृतीची क्षितिजे

ले. रामचंद्र चिंतामण ढेरे, विश्वकर्मा साहित्यालय, पुणे ३०, १९७१,
पृ. १९०, मूल्य आठ रुपये

❦

मराठी वाचकांना, श्री. रा. चिं. ढेरे यांचे नाव एक व्यासंगी संशोधक म्हणून उत्तम परिचयाचे आहे. प्रस्तुत ग्रंथ त्यांच्या या लौकिकात भर घालील असाच उतरला आहे. 'दत्त', 'नाथ' यांसारखे सुप्रतिष्ठित पंथ व परंपरा यांच्या अभ्यासाकडून, कदाचित त्यामुळेच–त्यांनी आपला मोहोरा 'लोकसंस्कृती'कडे वळविला आहे. ज्यांना आजच्या समाजात फारशी प्रतिष्ठा नाही आणि ज्या नाहीशाही होण्याच्या मार्गावर आहेत अशा संस्था व परंपरा यांचा अन्वयार्थ लावण्याचा हा यत्न आहे. 'गोंधळा'-सारख्या संस्था आणि नागनरसोबा यासारख्या देवदेवता यांची पालटत जाणारी रूपे आणि त्यांच्या मूलस्थानी असणाऱ्या भारतीय परंपरा यांची एकात्मता श्री. ढेरे यांनी डोळ्यांसमोर साक्षात उभी केली आहे. 'क्षितिजे' हा शब्द विचारपूर्वक योजलेला आहे. 'त्यांना ना अन्त ना पार' असे आरंभीच सांगून त्यांनी वाचकांना, हा प्रवास अखण्ड चालणार असल्याची जाणीव करून दिली आहे. लेखकाच्या संगतीत आणि मार्ग-

दर्शनाने घडणारा हा वैचारिक प्रवास उद्बोधक आणि मनोरंजक ठरतो, हे निश्चित. विशेषतः आपल्या नित्याच्या परिचयाच्या विधीतून आणि वाङ्मयातून, माहितीच्या अर्थाच्या किती विविध छटा दिसू शकतात, हे लक्षात आल्यावर मन स्तिमित होते, सुखावते.

जवळपास प्रत्येक पंथाच्या, संस्थेच्या मूलस्थानी 'यक्ष'-पूजा किंवा 'वीर'-पूजा होती हा प्रतिपादनातील मुख्य निष्कर्ष होय. यक्ष ह्या द्रव्यरक्षक देवता होत असे मणिभद्र यक्षाच्या संदर्भात सांगितले आहे. तरी सगळेच यक्ष हाच उद्योग करीत असावेत असे दिसत नाही. भयप्रद अथवा उपकारक अशा अनेक गोष्टी व शक्ती यावर देवत्वाचा आरोप करण्यात आला व त्या सर्व 'यक्ष'—कोटीत बसल्या असे वाटते. 'यक्ष' या देवतासमूहाची विस्तृत व मूलगामी चर्चा या ग्रंथाला पोषक तर ठरेलच, पण स्वतंत्रपणेही मोलाची होईल. श्री. ढेरे यांनी आता हा उद्योग हाती घ्यावयास हवा, अन्यथा, आपला प्रवास मधेच खुंटला अशी चुटपुट वाचकांना लागून राहील.

ग्रंथातील विवेचनातून उत्पन्न होणाऱ्या काही शंका प्रांजलपणे मांडणे आवश्यक वाटते. स्कंदपुराणातील प्रभासक्षेत्रमाहात्म्य आणि त्यातील तीर्थयात्राखंड, तसेच काश्यपसंहिता यांचा काल कोणता ? रूढ अशा परंपरा त्यात जर अगदी अलीकडे ग्रथित केल्या असतील तर ऐतिहासिक उपपत्तीच्या चर्चेत त्यांचे स्थान गौणच ठरेल. 'कलगीतुरा' हा शब्द व संस्था यांची येथे दिलेली व्युत्पत्ती आजपर्यंत देण्यात आलेल्या इतर कुलकथांपेक्षा नक्कीच अधिक संभवनीय वाटते. याचे सुनिश्चिततेत रूपान्तर व्हावयाचे तर काही प्रश्नांची सोडवणूक अगत्याची ठरते. 'तुर्या' हे केवळ नावच केरळातून आले की नृत्यप्रकारही आला ? 'कलगे' या कानडी नावाशी हे नाव (कलगीतुरा) जर इतके संबद्ध आहे तर ही संहती कर्नाटकातूनच इकडे आली असे समजावयाचे का ? तसे असेल तर 'कळगे—तुर्या' हा प्रकार कर्नाटकात अस्तित्वात आहे का ? नसेल तर या दोन वेगळ्या परंपरा महाराष्ट्रात कशा व केव्हा एकत्रित झाल्या, यांचा विचार व्हावयास हवा. 'विट्टिरा' व 'लंबस्तनी' अशा मूर्ती भारतात सर्वत्र मिळतात, आणि त्यांचा कालखण्डही विस्तृत आहे. इतर देशांतील तत्सम मूर्ती 'मातृदेवते'च्या म्हणजे 'सुप्रजनना'च्या आहेत, तशाच येथील देवताही असाव्यात, असे समजतात. यांचा विचार 'बालग्रह' या विवेचनात अधिक खोलवर व्हावयास हवा.

आपल्या शेवटच्या निबंधाच्या आरंभीच लेखकाने संशोधनाची उद्दिष्टे आणि पद्धती यावर काही विचार मांडले आहेत. विशेषतः पुरातत्त्व व लोकतत्त्व यांचा उल्लेख केला आहे. त्यासंबंधी काही लिहिणे प्रासंगिक ठरेल. पुरातत्त्व व लोकतत्त्व यांत आज द्वैत उत्पन्न झाले आहे हे नाकबूल करण्यात अर्थ नाही. फक्त त्याची कारण-

मीमांसा पाहिली असता, आपण चुकीच्या माणसांकडून मोठ्या अपेक्षा करीत आहोत, हे स्पष्ट होईल. संस्कृतीच्या अभ्यासकाला दोन प्रकारची साधने उपलब्ध होतात. पहिला प्रकार ' परंपरा ' नावाने ओळखता येईल–यात लिखित अथवा मौखिक तसेच ' अस्फुट ' पण व्यवहाराच्या कृतीतून दिसणाऱ्या सगळ्या परंपरांचा समावेश होईल. दुसरा प्रकार म्हणजे ' जड ' अवशेषांचा – ' वस्तू आणि वास्तू ' यांचा. आज असा समज प्रबळ झाला आहे की, पहिल्याची कक्षा संपते तेथे दुसऱ्याची सुरू होते. दोन्ही परस्परांना पूरक आहेत याचा विसर पडला आहे. पुरातत्त्व-संशोधनात मानववंश, पदार्थविज्ञान, ' भूशास्त्र ' यांसारख्या वैज्ञानिकी शाखांतील कल्पना व अभ्यासपद्धती यांचा अधिकाधिक वापर व्हावयास लागला, तसतसे परंपरेशी नाते पुसट होऊ लागले. भिन्न पीठिका असणाऱ्या अभ्यासकांच्या हातांत संशोधन गेले आहे. त्यातच, भारतीय परंपरेला ज्यांची स्मृतीही राहिली नव्हती, असे अश्मयुगीन समाज, सिंधू संस्कृती यांच्या शोधानंतर, परंपरेला अज्ञात असे एक फार मोठे दालन अजून शिल्लक आहे, अशी पुरातत्त्वविदांची खात्री झाली. या दोन्ही साधनप्रकारांचा साकल्याने विचार करणारे विचारवंत आता फारसे नाहीत. गेल्या पिढीतील संशोधकांनी हा भेद फारसा ताणला नाही. त्यांचा या दोन्ही शाखांशी संबंध होता म्हणूनच कै. वासुदेव-शरण अग्रवाल यांच्यासारखे पंडित पुरातत्त्वीय ज्ञानाला काही घनता देऊ शकले. दुसरा एक धारकावा असा की, परंपरेचा अभ्यासक हा आपले ' भारतीयत्व ' क्षण-भरही विसरू शकत नाही. तर पुरातत्त्वविद हा सबंध मानवी समाजाच्या उत्क्रान्तीकडे लक्ष देतो. केवळ भारतीय पीठिकेचा विचार करीत नाही. त्याची पार्श्वभूमी ' जागतिक ' असते. आजच्या नव्या पिढीच्या संशोधकांत ही पृथगात्मता स्पष्टपणे जाणवते–नव्हे बोचते. भिन्न पूर्वपीठिका व उद्देश यामुळे ही गोष्ट अटळ झाली आहे हे मात्र खरेच. म्हणूनच या दोन्ही शाखांचा एकत्र विचार करू शकेल असा स्वतंत्र अभ्यासकांचा वर्ग अस्तित्वात येईल. श्री. ढेरे हे त्याचेच प्रतिनिधी असे समजावयास हवे. म्हणून, त्यांनी पुरातत्त्वीय अन्वेषणाचा परंपरेच्या आधारे असाच पाठपुरावा करीत राहावा, अशी आग्रहाची विनंती त्यांना करावीशी वाटते.

—मधुकर श्रीपाद माटे








## समानधर्मा

लेखक : राजेंद्र बनहट्टी, प्रकाशक : इनामदार बंधू प्रकाशन : पृष्ठे–१३४;
किंमत–५ रुपये.



समानधर्मा हा राजेंद्र बनहट्टी यांच्या दहा कथांचा संग्रह. किर्लोस्कर, सत्यकथा, मनोहर, दीपावली या मासिकांतून पूर्वी या कथा प्रसिद्ध झाल्या आहेत.

समानधर्मा ही एक फसलेली कथा वगळली तर बाकीच्या सर्वच कथा वाचनीय आणि दर्जेदार वाटतात. लेखकाचे अनुभवविश्व समृद्ध आहे असे हा कथासंग्रह वाचताना वाटणार नाही. परंतु जे काही अनुभव लेखकास आले आहेत ते कथेच्या कलात्मक पातळीवर व्यक्त करण्यात चांगलेच यश आलेले आहे. ओघवती कथनशैली, सहजसंवाद, प्रभावी स्वभावदर्शन यांच्या आधारे लेखकाचा जीवनानुभव कलात्मक आकार धारण करतो. कथेच्या मांडणीत कुठेही पसरटपणा जाणवत नाही किंवा कलात्मकतेची हानी करणारे उपरे भाष्यही तो कुठे करीत नाही. त्यामुळे एक नेटका आटोपशीरपणा सर्व कथांना आलेला दिसतो.

प्रीतीचे नकळत गुंफले जाणारे नाजुक धागे (सुखात), स्वार्थावर आधारित मानवी संबंध (वारसा), व्यावसायिक क्षेत्रातील वशिलेबाजी (बढती, इंटरव्ह्यू), मानवी मनाच्या भावनात्मक किंवा वासनात्मक विकृती (मी कोण आहे? चिमटा), आजचा युगधर्म, भ्रष्टाचार (क्रांती), पारंपरिक माधुर्य गमावून बसलेले विवाह (गालबोट) आणि खोल कुठेतरी असलेला स्वाभिमानाचा पीळ (रहस्य) हे या कथांचे विषय आहेत. आजच्या तरुण मनाला ज्या अनुभवाचा कधी ना कधी स्वीकार करावाच लागतो असेच हे विषय आहेत. संयमित, फिकट रंगात या अनुभवांचे चित्र रेखाटलेले दिसते, आणि हे रेखाटन करताना लेखकाने कुठेही अतिशयोक्ती केलेली नाही. मनाला आलेला कडवटपणा निवेदनाला चिकटू दिलेला नाही. एक प्रकारची सुजाण, समंजस वृत्ती त्याच्यापाशी आहे. म्हणूनच तो अनुभवाला कलात्मक पातळीवर आणण्यापेक्षा अधिक काही करत नाही आणि कथा मात्र पुष्कळ काही सांगत राहतात. समंजस कथनकौशल्य हे या लेखकाचे सामर्थ्य आहे.



अनुक्रमणिका

परिस्थितीशी निकराने मुकाबला करतानाही स्वाभिमानाचा पीळ सांभाळणारी मिसेस पांगारेची व्यक्तिरेखा चित्रित करणारी 'रहस्य' ही हृदयस्पर्शी कथा आहे, तर 'चिमटा' या कथेत वृद्ध वडिलांच्या वासनात्मक चाळवाचाळवीसंबंधी त्यांच्या मुलाच्या आणि सुनेच्या प्रतिक्रिया फार हळुवारपणे लेखकाने दाखविल्या आहेत. वडिलांनी ऑफिसातील एका मुलीच्या पाठीचा चिमटा घेतला आहे. त्यांच्या सद्‌सद्विवेक बुद्धीला टोचणी लागली आहे. मुलाला आणि सुनेलाही सारे काही समजले आहे. आणि तरीही कुणीच कुणाशी कबुली देत नाही, सर्वांचा एकमेकास समजून घेण्याचा सावरण्याचा प्रयत्न चालला आहे. समंजसपणे स्वीकारण्याची ही एक जीवनातील फसवणूक आहे. इथे एका छोट्या घटनेभोवती उमटलेली असंख्य मानसिक आंदोलने अतिशय सूचकतेने दाखविली आहेत. 'इंदुमती दारातून निघून गेली होती' या एका साध्या वाक्याला या सूचकतेने किती तरी गुंतागुंतीचा अर्थ प्राप्त होतो. ही या संग्रहातील सर्वोत्कृष्ट कथा म्हणता येईल.

'समानधर्मा' ही कथा मात्र जमलेली नाही. व्ही. एल. मुसळे आणि पुंडलिक-शेट यांच्यातील समानधर्म दाखविता आलेला नाही. मुसळेने आयुष्यात एकदा चोरी केलेली आहे आणि त्यास कोणीही नोकरी देत नाही. शेवटी पुंडलिकशेट त्यास नोकरी देतात. पण तेवढ्यावरून ते दोघे समानधर्मी आहेत असे सिद्ध होत नाही आणि लेखकाचा दृष्टिकोणही स्पष्ट होत नाही. समानधर्मा म्हणजे सहानुभूती दाखविणारा अशा अर्थाने पाहिले तरी कथेचा तोल साधला जात नाही.

श्री. वनहट्टी यांचा हा पहिलाच कथासंग्रह असावा. जीवनातील प्रकृति विकृतीकडे कलात्मक तटस्थतेने पाहून लेखन करण्याची त्यांची वृत्ती आहे. या वृत्तीला व्यापक जीवनानुभवाची जोड मिळाल्यास त्यांची कथा अधिकच बहारदार होईल अशी आशा वाटते. मात्र उपरोध, उपहास ही टीकात्मक साधने किंवा भडक भावनाविष्कार हे रंजनाचे साधन न वापरता संयमित निवेदनावर भर देणारी ही कथा आजही आकर्षक आहे, अंतर्मुख करणारीही आहे.

— रवींद्र घवी

*



अनुक्रमणिका






## काचापाणी

लेखक : 'एन्', प्रकाशक : देशमुख आणि कं., कसबा पेठ, पुणे ११.
पृष्ठे २६५ मूल्य रु. १०



मानवी जीवनातील विकृती हा आजच्या ललित साहित्यातील चित्रणाचा प्रमुख विषय होऊ पाहात आहे. ' काचापाणी ' कादंबरीचा विषय म्हणजे श्यामा या तरुणीची विकृत मनोवस्था व तिचे विविध भावसंबंध यांचे चित्रण. इंजिनियर नवऱ्यापासून दूर राहणारी श्यामा आपला मृत प्रियकर राऊ याच्या आठवणी सदैव घोळवीत राहते. आपण राऊची विधवा आहोत या भावनेने ती पछाडली गेली आहे. म्हणजेच ह्या कादंबरीचा विषय विधवेचे किंवा परित्यक्तेचे जीवन-चित्रण अशा रूढार्थाने तरी होऊ शकत नाही. वरीचशी विकृत आणि लहरी बनलेली श्यामा स्वतंत्र जीवन जगू पाहते. नेहमीच्या मराठी कादंबरीपेक्षा ' काचापाणी ' मधील चित्रण वेगळे ठरते, ते यामुळेच. पण केवळ वेगळेपणामुळे ती यशस्वी कादंबरी ठरते, असे मात्र म्हणता येणार नाही.

ही कादंबरी वाचल्यावर काही प्रश्न निर्माण होतात. रूढ चाकोरीबाहेरचा विषय कादंबरीच्या यशाला कितीसा साह्यभूत होतो ? श्यामाच्या जीवनातील विकृती खरोखरच अपरिहार्य आहे काय ? श्यामाच्या व्यक्तिरेखेचा इतर पात्रांच्या संदर्भात विचार करता ही कादंबरी कितपत यशस्वी ठरते ?

या प्रश्नांची उत्तरे नकारार्थीच मिळतात. श्यामा या व्यक्तिरेखेभोवतीच ही कादंबरी गुंफली गेली असती तर ती अधिक यशस्वी होण्याची शक्यता होती ( अनेक लेखकांनी मिळून लिहिल्यामुळे असे झाले नसेल ना ?) श्यामाच्या जीवनातील विकृतीचे समर्थन या व्यक्तिरेखेच्या व्यक्तिकेंद्रिततेमुळे करता येणे सोईचे ठरले असते. श्यामाच्या स्वभावातील विकृतीला एक वाङ्मयीन अर्थ प्राप्त होऊ शकला असता. ' काचा-पाणी'च्या बाबतीत वरील सर्व शक्यता नाकारल्या गेल्या आहेत. श्यामा धड घटस्फोटिता नाही, परित्यक्ता नाही, विधवा तर मुळीच नाही. तिच्या वाट्याला आलेले दुःख हे तिचे स्वतःचे दुःख आहे. तिचे हे जिणे सर्वस्वी वेगळे आहे. तिचे एकटीचेच आहे. कादंबरीच्या यशाच्या दृष्टीने अधिक अपेक्षा होती, ती तिच्या एकारलेल्या व्यक्तिमत्त्वा-

तील संपन्नतेची. या कादंबरीतील ही उणीव चटकन लक्षात येते. श्यामाचा कोंडमारा, अगतिकता, सर्वस्वी एकटीचे असलेल्या दुःखाचा येणारा प्रत्यय यांचा जरी परिणाम मनाला जाणवला तरी ते दुःख अंतःकरण ढवळून टाकू शकत नाही.

श्यामाच्या जीवनाचा ( आणि कादंबरीच्या कथानकाचाही ) अन्य पात्रांच्या संदर्भात विचार केला असता हे अपयश अधिकच नजरेत भरते. मावशी, मथुरा आणि शेखर या तीन पात्रांशी श्यामाचा संबंध येतो. मावशी या सुखवस्तु विधवा. नुकत्याच दिवंगत झालेल्या पतीच्या आठवणीने त्या बेचैन होतात तरीही आपले दैनंदिन जीवन सुरळितपणे चालू ठेवतात. खऱ्या विधवा असणाऱ्या मावशीचे दुःख व विधवासदृश श्यामाचे दुःख यात मूलतः विरोध आहे, परंतु कादंबरीतील हा विरोधसुद्धा शेवटी शेवटी फिका होत गेलेला दिसतो. सहजपणे यशस्वी रीतीने विकसित होणारी श्यामाची व्यक्तिरेखा आणि तिजबरोबर कादंबरीचा होत असणारा विकास यांना मर्यादा पडतात. श्यामाला मावशींनी दिलेली सावधानतेची सूचना ग्रांथिक, कृत्रिम आणि ढोबळ वाटू लागते. या सुखवस्तु समाजातील पात्रांना विरोधी म्हणूनच की काय, या कादंबरीत मथुरा मोलकरणीचे चित्र उभे केले आहे. जात्याशी लागू असणारी, तंबाकू मळणारी आणि कधी कधी गावठी पिणारी मथुरा श्यामाला मार्गदर्शन करते. स्वतःचे असे खास तत्त्वज्ञान ऐकवते. मथुरेच्या सल्ल्यामुळेच श्यामाचा ‘ हिस्टेरिकपणा ’ कमी झाला आहे असे भालूदादाचे मत आहे. श्यामाला मिळालेल्या मथुरेच्या प्रोत्साहनामुळे श्यामा वाहात गेली याच विचाराने मावशी अस्वस्थ होतात.

कादंबरीतील पात्रयोजनेमधून आणखी एक प्रश्न निर्माण होतो. खालच्या समाजातील स्त्री-पुरुषांच्या कामविषयक कल्पना कादंबरीकाराला विरोध म्हणून उभ्या करावयाच्या आहेत की वस्तुस्थिती म्हणून ! येथे केवळ विरोधी चित्रणाचा हेतू दिसत असल्यामुळे श्यामाच्या व्यक्तिरेखेला कलात्मक यश प्राप्त होऊ शकत नाही. आजच्या सुशिक्षित समाजातील स्त्रीपुरुषांचे विचार खरोखरच इतके अप्रगत आहेत काय, हाही प्रश्न निर्माण होतो. या प्रश्नाचेही उत्तर नकारात्मक मिळते. शेखर-श्यामा यांचे कादंबरीतील वागणे मथुरेच्या भूमिकेमुळे विसंवादी वा विसंगत वाटते. मथुरेची भूमिका ही मोलकरणीची न राहता मार्गदर्शिकेची राहते, ही गोष्ट प्रत्यक्ष मथुरेची व्यक्तिरेखा आणि अन्य पात्रे यांच्यावर अन्याय करणारी आहे. ‘ श्यामा-मावशी-मथुरा’ या त्रिकोणाचे स्वरूप अगदी ठरीव झाले आहे. त्यामुळेच ‘ काचापाणी ’ ही कादंबरी विषयाचा अपवाद सोडला तर फारशी चाकोरीबाहेर जाऊ शकत नाही.

काचापाणी हे शीर्षक प्रतीकात्मक आहे. काचापाण्याच्या खेळाचा उल्लेख कादंबरीत अनेक वेळा केला गेला आहे. त्याचप्रमाणे पिंजऱ्यातील पोपट, निसर्गातील बदलती चित्रे यांनाही प्रतीकात्मक अर्थ आहे. कादंबरीतील ही प्रतीकात्मता पुष्कळच आखीव रेखीव आहे व म्हणून रूढ पातळी स्वीकारणारी आहे.

' काचापाणी ' ही कुठल्याही एका लेखकाने लिहिलेली कादंबरी नाही. साहित्य-क्षेत्रात ' सहकारी तत्त्वावर ' यापूर्वी ' आदिमाया ' ही याच प्रकाशनाने प्रसिद्ध केलेली एक कादंबरी आहे. प्रस्तुत कादंबरी एकूण आठ लेखकांनी मिळून लिहिली आहे. श्री. रा. ज. देशमुख यांनी ' एक प्रयोग ' या आपल्या प्रास्ताविकात याचा उल्लेख केला असून या सर्व लेखकांशी जमवून घेताना प्रयास पडल्याचे सांगितले आहे. एखाद्या कलाकृतीचा विचार करीत असताना ती कुणी लिहिली आहे अथवा किती जणांनी लिहिली आहे, याला फारसे महत्त्व नाही; निदान असू नये. मात्र अशा पद्धतीने लिहिल्या गेलेल्या कादंबरीचे समीक्षण करीत असताना काही अडचणी निर्माण होतात. कोण-त्याही कलाकृतीचा केवळ लेखकनिरपेक्ष असा विचार करणे नेहमीच शक्य नसते. त्या लेखकाचे व्यक्तिमत्त्व, त्याचे आधीचे लेखन, अनुभव घेण्याची त्याची ताकद या सर्वांचा विचार हा अपरिहार्यपणे केला जातो व त्यामुळे समीक्षा डोळस होते. अगदी अपरिहार्य नसले तरी या बाबींना महत्त्व हे असतेच. ही कादंबरी थोर कादंबऱ्यांत गणली गेली नाही, तरी तिच्या कल्पांसंबंधीचे गूढ आणि एकंदरीत वेगळे चित्रण यामुळे लक्षणीय ठरावी.

वि. शं. चौघुले

*

## तुलसीदल

कवयित्री : अंजली टकार, मौज प्रकाशन, मुंबई ४; पृष्ठे ७६, मूल्य : पाच रुपये



" तुलसीदल " हा अंजली टकार यांचा हा भावकाव्यात्म रचनांचा संग्रह तसा वैशिष्ट्यपूर्ण नाही. पण समकालीन कवि-कवयित्रींच्या ' नव्या ' नवलाईच्या काव्यात मात्र याचे सापेक्ष वेगळेपण जाणवल्यावाचून राहात नाही. सरळ, साध्या, स्वाभाविक मनोवृत्तीचे रोमँटिक काव्यमय शैलीत चित्रण करण्याचा जमाना मागे पडला असूनही " तुलसीदल " मध्ये त्याच जमान्यातली वाटावीत अशी भावशब्दचित्रे प्रतीकसंकुल रचनाशैलीतून रेखाटलेली आढळतात. पण चालू तऱ्हेच्या काव्यशैलीचा, नेत्र दिपवणारा झगझगाट जरा बाजूला करून पाहिल्यास या संग्रहात एका भावनम्रा, समर्पणशील अशा व्यक्तित्वाची ओळख पटते. काव्याचा मालमसाला, रीतभात हे सर्व अगदीच रविकिरणी जमान्यातले नाही; पण ते ' इंदिरा'शैलीचेही नाही. पद्मा, शांता

शेळके यांसारख्या काल-परवाच्या कवयित्रींच्या कवितेचे वाण यात आहे. प्रेम आणि अनुनय आणि परिपूर्ती व तिचे गोरेगोमटे फळ यासंबंधीच्या अपेक्षित प्रतिक्रियाच यात सविशेष पडसादलेल्या आहेत. बाकीचा काव्योद्योग अव्यापारेषु व्यापार वाटावा. जवानीच्या भरात मनात प्रेमभावनेप्रमाणेच इतरही भावना उसळतात, त्या मांडताना तारतम्य सुटते. कवि 'पहिलटकर' असो, वा "पहिलटकरीण" असो, त्यांच्या स्वकृति-विषयक आत्मसंतुष्टतेमुळे असे घडते, हे स्वानुभवाने सांगता येईल. "तुलसीदला"-तही असे अतिरिक्त 'निज' कौतुक दिसते.

"तुलसीदला"तली दले, त्रिदले, पत्री सर्व काही 'घरकुला'च्या भोवतीच्या घरबागेतले आहे, पण जे भावस्पंदन आहे ते मोठे शालीन, संस्कारशील आणि तरीही सूचित उत्कटतेचे आहे. प्रथम दिसते ती एकलेपणाची आग — ! लाघवी वातावरणात 'प्रतिउमले कळीची' —

> परि शुभ्र एकांतात
> छाया हाले पिंपळाची;
> एकलीला भेडसावी
> काळरात्र पुनवेची ('एकलीला भेडसावी,' पृ. २)

या प्रीतीच्या स्पंदनाला प्रियाच्या भेटीचा पडसाद लाभतो; पण तो आहे अपरूप, 'मोकळेढाकळे...फसवे-आगळे' उगाच बोलायला आलेला. हा प्रेमिक बहुधा ध्यानस्थ, त्यागी, विरक्त आहे; आणि अनुनय करणारी ती गरजू, भोळी, अनुरक्त आहे. ती त्याच्याकडे येते —

> ...ओल्या शेवाळी स्मृतींनी
> त्यागी किनारा चळला ...
> परि विरक्त पाण्याला
> दाद कश्शाची नसाची ('ओढ कुणाची लागावी,' पृ. ६)

असे तिला भासते; पण संगतीच्या ओढीने ती मनात नसताही, तेथे येते, मुक्या मनाने उभी राहते, भधू मनाने परतू पाहते, तरी —

> तूही घुमा अन कुढते मीही ...
> ...रंग उफाळे कळे न कसला
> वळून मागे हसता हसता. ('तुझ्या घराशी,' पृ. ७)

मग मनमिळणी आहे,

प्रेमिका म्हणते —

जेव्हा प्रथम हातात हात
नको असलेले आढेवेढे;
आठवते कशी गदगदली होती
पावसाने ओथंबलेली झाडे ! ( ' आठवते ' !, पृ. ३१ )

पण ती या आधीच्या कवितेत, या वेळच्या स्पर्शाचे वर्णन एका सुंदर प्रतिमेने करते —

पिसे सूर्यपक्ष्याची रे जशी तुझी बोटे
फिरत फिरत स्वप्नांची त्या खोवितात देठे !
( ' दिवस उडत येई, ' पृ. ३० ' )

त्यानंतर 'अशीच भिजावी' या अप्रतिम कवितेत व्यक्त झालेली हळुवार, अस्फुट आसक्ती व्यक्त होते—

आणि मग मधुमीलनाचा अपूर्व क्षण प्रेमिका एका प्रतिमेने चित्रबद्ध करते.—

तळ्याकाठचा पिंपळ
काही स्मरून सळसळे;
त्याच्या छायेच्या मिठीत
शहारते संथ तळे !

याच पिंपळाखाली, याच तळ्याकाठी ती दोघे आलिंगनात धुंदली, या पळाचा तिला—

येतो पुसट आठव—
शहारते मन खुळे;
कधी उदास होऊन
डुचमळे संथ तळे ! ( ' तळ्याकाठचा पिंपळ, ' पृ. ५)

असे असले तरी त्याने सळसळत्या रक्तातल्या पोलादी बळाने तिला कसे झेलले आणि उभ्या जिण्याचा भक्कम सेतू कसा उभवला ते 'सेतू ' कवितेत समर्थपणे चित्रित केलेले आहे आणि याची परिणती म्हणजे—

त्या दगडी मनगटाने
अंधाराचे अजस्र ढापण उचलले
आणि सूर्य आरवला :
पहाते तो पुढ्यात हुंकारणारे कोवळे विश्वरूप;
आणि लज्जेनेच मुख झाकून मी खुदकन हसले—

बाळाला प्रथम पाजताना
पहिलटकरीण हसते तसे (पहिलटकरीण,' पृ. २९)

हे चरण अगदी बोलके आहेत. सर्वच कविता आशयघन आहे. पण वरील दोन चरणांच्या अगोदर 'यातना विसरून' असा चरण कवितेत आला आहे, तो तेथे चपखलपणे न बसलेला आहे. तो टाळला असता, निदान कंसात टाकला असता, तर आविष्करणातील प्रवाहाला खळ पडतो तो पडला नसता. (या संग्रहात असे परिष्करण संपादन अनेक स्थळी पाहिजे होते; त्यामुळे अधिक अर्थपूर्ण व कलात्मक आविष्कार साधला गेला असता.) आणि या प्रेमाच्या परिपूर्तीमुळेच 'घरकुल' साखरझोपेत गुंगून जाते—

साखरझोपेत घरकुल कुजबुजते
कोवळ्या उन्हात न्हात वसू ('घरकुल,' पृ. ५१)

पण हे सर्व कोणामुळे आहे? तो आहे 'वाटसरू'— वाटेचा वाटसरू नव्हे तर जीवनाची साथी सहप्रवासी. तोच आहे कर्ता हर्ता. पण तो अलिप्त आहे! जीवनानंदाचे जे काही थेंब त्याच्यामुळे मिळाले त्यात प्रेमिका संतुष्ट आहे. 'वाटसरा' या अतिशय आशयघन अशा कवितेत ती म्हणते—

तुझ्या मनासारखे अपरंपार आभाळ
पुन्हा पुनः पहाते – जसे तुला
सुखदुःखावर केव्हाच तुळशीपत्र
ठेवून बसलेला तू.
कुणी नसते वेड्या या लोकी
तुझ्याइतके उदार
आत्म्याच्या कमंडलूतले थेंब थेंब
पाजलेस माझ्या वाटसरा;
देशील तेवढा थोडाच वाटेल कवेत आसरा.
('वाटसरा,' पृ. ५४)

पण या अशा छान, भावपूर्ण कवितेची सुरुवात मात्र एकंदर कवितेच्या थाटाला जुळेशी वाटत नाही. 'माझ्याकडून अजाणता घडून गेलेल्या चुकासारखे हे चुकचुकणाऱ्या ताऱ्यांचे' वर्णन केवळ एक व्याकरणीय विधान झाले आहे, काव्यगर्भ व्यंजक शब्दावली नव्हे. हीच सुरुवात 'तुझ्या मनासारखे अपरंपार आभाळ' याने करून मग त्यावर 'लुकलुकणाऱ्या चुकचुकणाऱ्या ताऱ्यांनी' चुका-चुकचुकणारे यांतील सूक्ष्म प्रासाच्या सह, जडण केली असती तर रचना कमी विरस करणारी म्हणून अधिक सरस झाली असती.










प्रेमाच्या या ' संपूर्ण कहाणी'त इतर काही प्रेमकाव्यांनी वेगवेगळया छटांचे रंग भरले आहेत. अगदी प्रथमदर्शनी छापलेल्या अर्पणवजा ' तुझे न सारे ' या कवितेत प्रेमिकांच्या मनातला नेहमीचा 'त्याच्या' किंवा 'तिच्या'बद्दलचा पूर्णताभाव व स्वतः-बद्दलचा शून्यभाव चांगल्या वेधक विरोधोक्तीतून व्यक्तवलेला आहे; ' वाट तुझी ', ' पारध, ' ' प्राजक्त, ' ' शाप, ' ' कसरत, ' ' माझ्या मनाचे पाखरू, ' 'रान रान तुडविते ' यांसारख्या कवितांतून प्रेमाच्या आठवणी, हुरहुर, धीटपणा वगैरे भाव आहेत; पण त्यातही ' निरोप, ' ' गर्द झाडी, ' ' आजकाल ' या कवितांतील शैली लक्षणीय आहे. – त्या कवितांत गद्यबोलीतील मुक्त लय चांगल्या सूचकतेने वापरलेली आहे. या कवयित्रीला एकंदरीने प्रासांचा हव्यास फार दिसतो. काही ठिकाणी तो रसापकर्षक वाटत नाही हे खरे, पण काही कवितांत तो अनाकर्षक व कृत्रिम वाटतो. ' क्षणाच्या चुकांना, ' ' प्रार्थना ' यांसारख्या सामाजिक आशयाच्या कवितांत हे अंतर्गत प्रास फारसे अनाठायी वाटत नाहीत, कारण एकंदर शैली वक्तृत्वपूर्ण असल्यामुळे त्यात हे प्रास चपखल बसतात. उदाहरणार्थ, ' क्षणाच्या चुकांना '-मधील ' अंधार पेलीत स्कंधांवरी ' किंवा ' प्रार्थना ' मधील ' रसरशीत '-'टसटशीत' यांसारखे शब्दबंध याचे निदर्शक आहेत; याच्या उलट ' किती काळ '-मधील ' उडणार चिंध्या-आदिमाया वंध्या, ' ' दिशाहीन माशांमधे ' या कवितेच्या शीर्षकी चरणातील, ' दिशा-माशांची सांगड', आणि विशेषतः 'करणी' मधील ( वाचकांची ) ' अक्कल ' ' थक्क ' करून गुंगविणारा प्रास हे रसवर्धक निश्चित नाहीत.

' एक ' कवितेत तर ' कावा–गावा ' च्या प्रासात अडकल्यामुळे " वाट पुसु नये व्हा गा " " जायचे ना गावा " यासारख्या नीरस गद्यवजा ओळी जुळवल्या गेल्या आहेत ! याशिवाय अन्य कवितांत ' सल्ला–पल्ला ', ' पिंडाच्या गुंडा'ने यासारखे प्रासानुप्रास आलेले आहेतच ! ' पेरिलेस बीज ' मधल्या ' अब्द युगाखाली अंकुरले शब्द ' या ओळीत पूर्वगामी कवींच्या रचनेचा पडसाद आहे आणि तो तसाच ' आम्हीच पाडितो ', ' रडा अर्भकांनो ', ' सांग ' यांसारख्या कवितांतही उमटतो – आणि या सर्व कविता मर्ढेकरी घाटणीच्या सामाजिक आशयवादी कविता आहेत. संतांच्या उक्तींचा दुबळा पडसाद ' सुखासाठी साऱ्या ' या अशाच विरोधोक्तिमय कवितेत आहे. खरोखर सामाजिक विषमता, अन्याय, संघर्ष यांच्या संबंधीच्या सर्व काव्यांवर गडकरी, मर्ढेकर, विंदा करंदीकर यांच्या शैलींची छाया आहे. मर्मभेदक अशी कविता अगदीच भारूडभरती नसली, तरी प्रेमगीतांच्या संग्रहाला प्रकाशनाच्या प्रवाहातून नीट हाकारण्यासाठी घातलेला हा समतोलक भरवण ' बलास्ट आहे, यापरते त्यांचे कार्य नाही.

लेखिकेचे व्यक्तिमत्त्व अगदीच चाकोरीतले ' शालीन ', ' विनम्र ' वगैरे तऱ्हेचे नसले, तरी प्रीतीच्या विविध आविष्कारांत ते ' विनत ' झालेलेच आढळते. नायक

जरी सुखदुःखावर 'तुळशीपत्र' ठेवून निःस्पृहपणे बसलेला आहे तरी नायिका ही प्रणयातली आर्त भक्तच आहे, ती ध्यानस्थ प्रीतिदेवाची "तुलसीदलां"नी पूजा बांधीतच आयुष्य कंठणार आहे– निदान ती तसे म्हणते खरे. पण प्रीतीची सर्व बाजूंनी झालेली परिपूर्ती (वर दर्शविल्याप्रमाणे) पाहिल्यावर हा केवळ प्रणयाच्या अध्यात्माचा दिखाऊ पण लोभसवाणा विरोधक भास आहे, हे सहज लक्षात येते.

ना. ग. जोशी

*

## अनिमिष

कवि : गोविंद कुलकर्णी, स्वयंप्रभा प्रकाशन, प्रका. विजय पाडळकर, 'भाग्यश्री' गणेश नगर, नांदेड. पृष्ठे ६४; मूल्य पाच रुपये.

हा एक चिमुकल्या कवितांचा छोटासा संग्रह आहे. संग्रह चाळायला लागल्या-वर लगेच काही लेखकाच्या मनोभावांशी संवाद सुरू करता येत नाही, तरीही पुढे वाचीत गेल्यावर काव्यातील आशय व लय याबद्दल उत्सुकता वाटू लागते. सरळ, तर्कबद्ध रीतीने काही उमगलेसे वाटत नसताही कवीच्या उत्कट व प्रामाणिक शब्दो-च्छ्वासाशी आपला मेळ बसत जातो. हा कवी अनिमिषपणे काहीतरी धुंडाळीत आहे, नि ते त्याच्या संवेदनांना जाणवत असूनही इंद्रियांपासून छपून बसते, त्याला भुलावण दाखवीत दूर-सुदूर जाते असा भास होत राहातो.

त्रिखंड हिंडुनी धुंडाळीत बसायला ज्यामुळे या कवीला भाग पडले आहे, ते केशवसुत किंवा त्यापूर्वीचे उपनिषत्कालीन द्रष्टे यांनी धुंडाळायचा प्रयत्न केला त्याहून खरोखरच वेगळे अपूर्व असे काही आहे काय? या अर्वाचीन पूर्वसूरींनी धुंडाळलेले 'तत्त्व' विश्वात्मक होतेच, पण ते इंद्रियातीत आहे व ते फक्त संवेदनाला आपोआप उमगले तर उमगते, अशी त्यांना 'अनुभूती' झाली. तरीही युगायुगातल्या शोधकांनी पुनः पुन्हा इंद्रियातीत 'अचपळ' तत्त्वबुद्धीने पकडण्याचा हव्यास धरला. या कवीचा हव्यास असाच काहीतरी असावा असे वाटते. पण त्यात एक मोठा भेद आहे. कवीला "याचि देही याचि डोळा" सर्व काही पाहावयाचे आहे, जाणावयाचे आहे. पण ते

केवळ अवकाशमय आहे — " आभाळ; आभाळच आभाळ..." आहे याची वेदनामय जाणीव संवेदनेला होते, कारण " पापणीपलीकडे पसरलेली सायंकाळ " आहे आणि " जवळ दूर कोणीही ओळखत नाही, " " काळोख : काळोखासारखा बुडून गेलेला मी " आहे. हे सत्य कविमनाला कळून चुकते. 'स्व-'ची संवेदना व्यापक करीत-करीत विश्वात्मक चैतन्याशी जोडलेली पाहण्याची तळमळ त्याला लागली आहे.

खरोखरच एवढा गाढ गूढवाद " अनिमिष "-कार गोविंद कुलकर्णी यांना अभिप्रेत आहे का? की केवळ संवेदनांच्या भुलावणीचे शब्दांकित चित्र रेखाटण्याची मर्यादित कलात्मक इर्षाच या कवितांतून डोकावत आहे? काहीही असो, एवढे खरे की " आपल्यातील अर्थवलये रसिकांच्या मनःपृष्ठावर संथपणे पसरविण्याचे " कार्य गोविंद कुलकर्ण्यांच्या कवितांना करावयाचे आहे. पण हे सांगताना सुधीर रसाळ मलपृष्ठावरील भलावणीत म्हणतात, तसे त्यातले सामर्थ्य 'अजोड' वाटत नाही; आणि या प्रकारच्या जाणिवा मराठी कवितेत " अनोख्या " नाहीत व त्या " प्रथमच इतक्या समर्थपणे " व्यक्त होत आहेत, असेही नाही.

या कवितांच्या संकलनात काही एक संयोजन दृष्टीस पडते —

" जवळ दूर
कुणीही
ओळखत नाही मला
पापणीपलीकडे पसरलेली सायंकाळ
काळोख : काळोखासारखा
बुडून गेलेला मी. माझे डोळे.
आभाळ; आभाळच आभाळ ..."

ही शेवटी दिलेली संपूर्ण अनुभूती काही क्रमाने व अंशाने जाणवलेली आहे, हे त्या आधीच्या मांडणीने कवी सुचवितो. ९ व्या पानावर संग्रहाला आरंभ करताना या अंत्यरचनेमध्ये अंतऱ्यासारख्या अलग छापलेल्या ओळीच दिलेल्या आहेत. त्यांतली शेवटची सुटी " आभाळ; आभाळच आभाळ " ही ओळ या संग्रहाचा आलंबन-चरण आहे, व तीच ओळ संग्रहातल्या अंत्य काव्यगुच्छाचे शीर्षकही आहे. नंतर सात कवितांचा पहिला तारकागुच्छ " पापणी-पलीकडे पसरलेली सायंकाळ " या चरणाने बांधलेला आहे. येथे 'पापणी' व 'पलीकडे' ही पदे जोडलेली नाहीत— त्यामुळे त्या दोन वेगळ्या अनुभवच्छटा म्हणून सूचित केलेल्या असाव्या असे वाटते. (की ती एक मुद्राराक्षसाची डुलकी आहे!) 'पापणी' हे शारीरिक माप. ते संवेदन-सूचक आहे. 'अनिमिष' असलेल्याची 'पापणी' अर्थात निःस्तब्धच असणार. अनिमिष पापणीच्या पलीकडे वेगळे, अपार, अनामिक असे काहीतरी आहे.

ते पसरलेले आहे, सर्वगामी आहे, त्याची लांबी-रुंदी आणि खोली या सर्वच "डायमेन्शन्स्" नहिवत आहेत. आणि ते जे अमर्याद अनंत आहे ते 'सायंकाळ' या शब्दाने प्रतिमाबद्ध व प्रतीकांकित केलेले आहे. हा प्रथम तारकापुंज संपल्यावर दुसरा येतो तो "काळोखः काळोखासारखा" या दोन दोन शब्दांनी ध्वनित केलेला. बहुधा 'काळोख' व 'काळोखासारखा' याही वेगवेगळ्या संवेदनच्छटा म्हणून कवीला दर्शवावयाच्या आहेत. 'काळोख' ही 'सायंकाळ'चीच परिणती. हा 'काळोख' 'काळोखासारखा' आहे ? की 'काळोख' 'सारखा काळोख'च आहे ?—असे वाटून बुद्धीने स्तिमित व्हावे अशीच ही स्थिती. जाणिवेची धारच नाहींशी होते जणू, म्हणून या पसरलेल्या आभाळातला तिसरा काव्यतारकाचा पुंज "बुडून गेलेला मी. माझे डोळे" या शब्दांनी प्रस्ताव केलेला आहे. 'बुडून' या पदाने क्रिया पुरी झाल्याचा अर्थ, केवळ क्रिया चालू झाल्याचा नव्हे, कवीला सुचवावयाचा असावा. मग पुरी क्रिया झाल्याचा दर्शक असा अलग पडलेला शब्द आहे—'गेलेला.' पुढे पूर्ण विराम. या अनुभावक व्यष्टीची सर्व चेतनाच ज्यात एकरूप झालेली आहे ते संवेदनकेंद्र जे 'डोळे'—'माझे डोळे' त्यांची ही स्मृतीच बहुधा रेंगाळत आहे ! —ते 'माझे' आहेत का ? आणि ते 'डोळे' आहेत का ? दृक्प्रत्ययाभावी तीही एक नास्तिपक्षी अनुभवस्मृती झाली आहे. कारण पुढचा अंत्य काव्य-समूह "आभाळ; आभाळच आभाळ" असा प्रस्तावित आहे. कवीच्या इतर सर्व संवेदना नामरूप हरवून दृक्संवेदनेत एकवटल्या. 'अनिमिष,' 'डोळे,' 'पापणी' या संज्ञांच्या द्वारे कवीने हेच जणू सुचविले आहे. बाकीच्या संवेदनांचे कार्य अशेष आहे, घडून संपलेले आहे. काव्यगुच्छात जे अनुभूतिक्षण टिपलेले आहेत ते, शतलक्ष प्रकाशवर्षांपूर्वीचे तारकाकिरण आज माणसाला जाणवावेत तसे आहेत. 'पापणी-पलीकडे' असलेले गूढ अस्तित्व गाठण्यासाठी चेतनपंखाने आपले पंख पसरून पाहिले-

"मी पाहतोय
पंखात—पंखापलीकडेही."

तरी तेथे तर 'अनिमिषपणे' निश्चलपणे केवळ पोकळी अवकाश आहे. 'एकच एक आकाश' आहे, आणि स्वतःची चेतनशक्ती तर आता फक्त 'चोचीत' सामावलेली आहे——

"एका चोचीशिवाय माझ्याजवळ काही नाही..." या बोलीतील लयीच्या आश्रयाने व्यक्त झालेल्या अनुभवानंतर, पद्यातील अभंग लयीमध्ये पंख मिटल्या-नंतरच्या क्षणात जाणवलेले संज्ञाविश्व आहे. ते एक सुंदर भावकाव्य आहे.

"पंख मिटले तरीही आत असे डहुळले..." असे म्हणत कवीने, दहा ओळीत, आपल्या संवेदनेला कशी, 'दूरतेची आतुरता' आहे, मनवीणेच्या सतरस्वरांना 'एक

अनाम चेतना ' कशी छळते आहे, ते उत्कटपणे प्रत्ययाला आणून दिले आहे. नंतर पुन्हा ' काय घडले नकळे ' या चरणत्तवकातही असेच एक भावगीत झंकारले आहे. येथले शब्द तर ' अनिल ' कवींच्या उलट भावुकतेचे अस्फुट पडसादच जणू भासतात किंवा सहानुभावामुळे त्या भावुकतेचे अनुस्मरणच जणू ते घडवितात.

" काय घडले नकळे; अवेळीच अंधारले...
क्षितिजाच्या ओंजळीत उभे आभाळ बुडाले. "

यात कुठे तरी ती आर्त जवळीक भासते. पुढे संग्रहातल्या इतर गुच्छातही ही भावगीतोर्मी उमटली आहे व तेथेही पुन्हा—

" जरी थकले हे डोळे वाट वोलाविते तुला..." या ( पृ. ४१ ) तिसऱ्या काव्य गुच्छातल्या कवितेतही तोच सहकंप तशाच लयीत पडसादलेला आहे. या ओळी ' अनिला ' च्या काव्यपठनातल्या पद्धतीप्रमाणे, प्रतिस्वरावर आघात देऊन भारपूर्वक गुणगुणल्या तर ही साथ-संगाथ जाणवल्यावाचून राहात नाही.

पुढच्या कवितांत याचप्रमाणे भावगीतोर्मींच्या आजूबाजूला संवेदनांचे गद्य-लयीतील आविष्करण आलेले आहे. संग्रहातल्या प्रतिमारूपकांत संमिश्रता आहे व ती साभिप्राय आणलेली असावी. पृ. ३२ वरच्या :' काळोखी ' काव्यगटातल्या एका कवितेत ' तोच आरसा तीच चौकट ' असे सांगून पुढे ' आपण...तेच टिकटिक ' अशी जाणीव व्यक्त झाली आहे ! तेथे आरसा, चौकट व आपण यातील अनुबंध कळून येतो, पण त्यात ' टिकटिक ' कोठे बसते आहे ? की आरशावर बसलेल्या अनुल्लिखित धुळीचे कण उडवताना होणारी ही ' टिकटिक ' म्हणावयाची ? पण अनेक ठिकाणी व्यंजकता खरोखरच विशाल परिमाण गाठते—

" एक थेंब.
एक वर्तुळ..."

ही सर्वांत छोटी कविता. तीत पापणीपलीकडचे, पंख मिटल्यानंतरचे, अनुभूति-विश्व आहे. पंखाला, चोचीला अंतराळांत एक थेंब जाणवतो, पण तो दृक्संवेदनेने की स्पर्शज्ञानाने ? विश्व हे थेंबासारखे आहे, आणि प्रत्येक अनुभव म्हणजे एक ' अणो-रणीयान ' सूक्ष्म बिंदू असून तो ' महतो महीयान् ' निहारिकांनी व्यापलेल्या गोलाकाराने भावलेल्या अनंत सूर्यमालांच्या विश्वरूप वर्तुळागत पसरत जात आहे व तेथे केवळ उरते ' आभाळ : आभाळच आभाळ. " शेवटच्या काव्यगुच्छाला तेच शीर्षक देऊन कवीने जणू वरील व्यंग्यार्थच सुचविला आहे.

या कवितासंग्रहात अगतिकता आहे. पण ती अनंत अनुभव विश्व केवळ दृक्-संवेदनेने आस्वादण्याच्या महदिच्छेचा अपरिहार्य परिणाम. हे कविसंवेदन अगदीच बी कवींच्या चाफ्यासारखे घुमे नाही. किंवा अतींद्रिय दिव्यानुभवात गुंगलेलेही नाही; पण

गूढात गोवले जाऊन आपल्या ' स्व '-ला हरवून बसण्यातला आध्यात्मिक तोंडवळा समान जातकुळीचा आहे. म्हणूनच या ' अनोख्या जाणिवा ' मराठीत प्रथमच व्यक्त होत आहेत, इत्यादी स्नेहजनित वर्णन परमार्थाने खरे नाही; कवीच्या सभोवती जी काव्यगत परिस्थिती होती तिचा परिणाम त्याच्या रचनात जाणवतो निश्चित. बाकी सर्वमात्र सुधीर रसाळांनी नमूद केल्याप्रमाणेच आहे हे अगदी खरे. या संग्रहातील प्रतिमाविश्व वैशिष्ट्यपूर्ण नक्कीच झाले आहे.

' अनिमिष 'कारांच्या काव्यप्रतिभेत जोम आहे, ताजेपणा आहे, स्वतःचे असे वेगळेपण आहे. त्याचा अविष्कार अधिकाधिक आशयमंथर व रूपघन रचनात पाहावयास मिळेल असा विश्वास वाटतो. अजूनही एकंदर थाट अद्‌भुतरम्य वातावरणाचा आहे. तादृश तपशील, त्यामागील आशय व लयींच्या अनेकविध गुंफणीतून व्यक्त झालेले त्याचे पडसाद यांत आणखी एकरूपता पाहिजे. भावगीताच्या अवस्थेतून नवकाव्याच्या आलंबनाकडे कविमन सरकत आहे हे स्पष्टच दिसते. संदर्भ श्रुतोक्ती, संयतपणा व त्यातून व्यक्त होणारी घनता, यांनी पृथक् बनलेली त्यांची भविष्यकालीन कविता कशी असेल ते पाहावयाची उत्सुकता कोणाही रसिकाला लागावी, असे सामर्थ्य " अनिमिषा " ने प्रत्ययाला आणून दिले आहे.

ना. ग. जोशी

## विनंती

या अंकाबरोबर परिषदेच्या साधारण सभासदत्वाची वर्गणी संपते. तरी सभासदांनी नव्या वर्षाची वर्गणी पाठवून उपकृत करावे ही विनंती.

१९७२।७३ साली पत्रिकेच्या चार अंकांपैकी तीन अंक **विशेषांक आहेत. वाङ्मय समालोचन विशेषांक, साहित्यसम्राट केळकर विशेषांक, नाट्याचार्य खाडिलकर विशेषांक.** हे तिन्ही अंक वर्गणीतच मिळतील. वाढत्या महर्गतेमुळे अंक मर्यादित निघतील. तरी आग्रहाची सूचना अशी की वेळेवर वर्गणी भरून आपल्या अंकांची निश्चिती करावी.

आपल्या स्नेह्यांना व संबंधितांना वर्गणीदार करा म्हणजे हे महत्त्वाचे अंक अल्प वर्गणीत त्यांच्या संग्रही राहतील.

मराठीतील प्रत्येक साहित्यिकाने परिषदेचे सभासद व्हावे अशी परिषदेची नम्र विनंती आहे,

# प रि ष द् वा र्ता

## कार्यवाह

❧

## जन्मशताब्दि-महोत्सव

**सारस्वतकार भावे जन्मशताब्दी :** दि. ६ नोव्हेंबरला म. सा. परिषद आणि विश्वकर्मा साहित्यालय यांच्यातर्फे महाराष्ट्र सारस्वतकार कै. वि. ल. भावे यांची जन्मशताब्दि शिक्षणशास्त्रसंस्थेच्या सभागृहात कुलगुरु डॉ. वा. पां. आपटे यांच्या अध्यक्षतेखाली साजरी झाली. याप्रसंगी म. सा. पत्रिकेच्या भावेविशेषकांचे आणि रा. चिं. ढेरेसंपादित ' वारसा ' या पुस्तकाचे प्रकाशनही झाले. डॉ. रा. शं वाळिंबे, श्री. दि. वि. काळे. डॉ. स. गं. मालशे आणि डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी भाषणे करून ' सारस्वत ' कारांच्या विविध वाङ्मयसेवेचा श्रोत्यांना परिचय करून दिला व त्यांना आदरांजली वाहिली. श्री. राजाभाऊ माटे यांनी शेवटी आभार मानले.

**वा. गो. आपटे जन्मशताब्दी :** आनंद कर्ते कै. वा. गो. आपटे हे परिषदेचे व संमेलनाचे पहिले चिटणीस. त्यांची जन्मशताब्दी दि. २३ नोव्हेंबरला आनंद कार्यालयाच्या सहकार्याने परिषदेने साजरी केली. या दिवशी शिक्षणशास्त्रसंस्थेच्या सभागृहात पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सभेत सौ. शामला शिरोळकर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. श्री. के. क्षीरसागर, डॉ. रा. शं. वाळिंबे आणि डॉ.भीमराव कुलकर्णी यांची भाषणे झाली.श्री.यशवंत जोशी यांनी आभार मानिले.

**समर्थभक्त देव जन्मशताब्दी :** समर्थभक्त कै. शंकर श्रीकृष्ण देव यांच्या जन्मशताब्दीला श्री. शिवाजीराव भावे ( धुळे ) हे व्याख्याते लाभावे हा फार चांगला योग आला. दि. ९ फेब्रुवारीला श्री. भावे यांचे 'नानासाहेब देव यांचे समर्थकार्य', या विषयावर एक अतिशय हृदयस्पर्शी भाषण झाले. आचार्य भागवत यांनी श्री. भावे यांचा परिचय करून दिला केले. डॉ. वाळिंबे यांनी समारोप केला.

**कविवर्य रेंदाळकर :** कविवर्य कै. ए. पां. रेंदाळकर यांच्या ५० व्या स्मृति-दिनानिमित्त दि. २२ नोव्हेंबरला परिषदेत तैलचित्राच्या अनावरणाचा समारंभ महाराष्ट्र-कवी श्री. यशवंत यांच्या हस्ते झाला. या प्रसंगी कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे आणि श्री. यशवन्त यांची भाषणे झाली. कै. रेंदाळकर यांचे चित्र श्री. शं. वा. उमराणीकर ( निपाणी ) आणि श्री. भाऊसाहेब खांडेकर यांच्या सौजन्याने परिषदेला मिळाले.

**माधव जूलियन स्मृतिदिन :** दि. २९ नोव्हेंबरला माधव जूलियन यांच्या पटवर्धन सभागृहातील तैलचित्रप्रतिमेस पुष्पहार अर्पण करण्यात आला. त्यांच्या



अनुक्रमणिका






स्मृतिदिनानिमित्त ठेवण्यात आलेले डॉ. द. न. गोखले यांचे व्याख्यान आयत्या वेळी प्रकाशबंदी जाहीर झाल्यामुळे होऊ शकले नाही.

**व्याख्याने :**

२० नोव्हेंबर–फिन सँडबर्ग ( नॉर्वेचे कौन्सल जनरल ) यांचे ' इब्सेनची नाटके ' या विषयावर. अध्यक्ष–डॉ. अशोक रा. केळकर.

२ फेब्रुवारी–ब्रिटिश कौन्सिलच्या सहकार्याने कादंबरीकार पॉल स्कॉट यांचे ' आफ्टर मारबार : ब्रिटन अँड इंडिया-ए पोस्ट फॉस्टेरियन विव्ह ' या विषयावर. अध्यक्ष–डॉ. नागराजन.

**सत्कार :**

सुप्रसिद्ध कवी आणि भूतपूर्व संमेलनाध्यक्ष श्री. आ. रा. देशपांडे ( अनिल ) यांनी ७१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल दि. ३१ जानेवारी रोजी त्यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी ' कालची कविता व आजची कविता ' या विषयावर परिसंवाद झाला. त्यात प्रा. गोविंद जोशी, डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी भाग घेतला होता. कवी अनिल यांनी सत्कारादाखल केलेल्या भाषणानंतर स्वतःच्या काही कविता गाऊन दाखविल्या.

**डॉ. वाळिंबे :** परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांचा १३ फेब्रुवारीला म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यात आला. याप्रसंगी ' महाभारताचे मराठी ललित आविष्कार ' या विषयावर परिसंवाद ठेवण्यात आला होता. त्यात प्रि. अनंतराव आठवले, आणि डॉ. भीमराव कुलकर्णी यांची भाषणे झाली. डॉ. वाळिंबे यांनी आपल्या भाषणात मूळ महाभारताच्या आधारे सांप्रतच्या ललितकृतीतील व्यक्तिचित्रणे कशी अवास्तव असतात त्याचे परखड विवेचन केले. कार्यवाह श्री. ग. ल. ठोकळ यांनी आभार मानले.

**डॉ. पेंडसे :** परिषदेशी प्रदीर्घ काळ ऋणानुबंध असलेले डॉ. शं. दा. पेंडसे यांना २८ फेब्रुवारीला ७५ वर्षे पूर्ण झाली. यानिमित्ताने कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे आणि कार्यवाह डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी पेंडसे पतिपत्नीचे पुष्पहार घालून अभीष्टचिंतन केले. २ मार्चला तुकारामबीजेच्या दिवशी डॉ. पेंडसे यांचा परिषदेने म. म. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार केला. यावेळी डॉ. पेंडसे यांचे ' वस्तुनिष्ठ संशोधन आणि तुकाराममहाराजांचा साक्षात्कार ' या विषयावर व्याख्यान झाले.

सत्कारानिमित्ताने आयोजित केलेल्या या परिसंवादास श्रोत्यांनी गर्दी केली होती. या नव्या उपक्रमाचे वृत्तपत्रांनी व श्रोत्यांनी स्वागत केले.

**अभिनंदने :**

श्रीमती दुर्गा भागवत, श्री. ग. दि. माडगूळकर, डॉ. श्रीराम लागू, श्री. चिं.

वि. जोग आणि महाराष्ट्रराज्य शासनाची पारितोषिके लाभलेले मराठी लेखक यांचे (त्यांना मिळालेल्या विविध प्रकारच्या बहुमानाबद्दल) परिषदेतर्फे अभिनंदन करण्यात आले.

**श्रद्धांजली :**

कै. वि. वा. आंबेकर, कै. डॉ. रंगनाथ देशपांडे आणि कै. ना. ह. आपटे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी परिषदेतर्फे १५ नोव्हेंबरला दुखवटासभा झाली होती. या सभेत महाराष्ट्रकवी यशवन्त, डॉ. रा. शं. वाळिंबे, श्री. ग. ल. ठोकळ, डॉ. बा. वा. दातार, श्री. वि. शं. पारगावकर, श्री. ह. वि. दात्ये, सौ. कमलाबाई आपटे इत्यादींची भाषणे झाली.

कै. कॅ. गो. गं. लिमये, सौ. पद्मावती बनहट्टी आणि प्रकाशक कै. बाबूराव इनामदार (इनामदार बंधु प्रकाशन) यांनाही परिषदेतर्फे श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

**वाचनालयाची नवी सोय :**

मुंबईच्या युसिस ग्रंथालयातून आलेली पुस्तके परिषद-वाचनालयाच्या सभासदांना देण्याची नवी सोय उपलब्ध करून देण्यात आली आहे. त्यासाठी कसलेही शुल्क आकारण्यात येणार नाही. परिषद-वाचनालयाच्या सभासदांनी या सोयीचा फायदा घ्यावा ही विनंती.

*

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

**माहितीपत्रक तक्ता ४ – नियम ८**

१. प्रसिद्धिस्थान : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ३०.

२. प्रसिद्धिप्रकार : त्रैमासिक
मुद्रणस्थळ : चिं. स. लाटकर
राष्ट्रीयत्व : भारतीय
पत्ता : ४६१/४ शिवपार्वती, सदाशिव, पुणे ३०.

३; ४. मुद्रक प्रकाशक : भीमराव बळवंत कुलकर्णी
राष्ट्रीयत्व : भारतीय
पत्ता : महाराष्ट्र-साहित्यपरिषद, टिळकरोड, पुणे ३०.

५. संपादक : स. गं. मालशे
राष्ट्रीयत्व : भारतीय
पत्ता : ३ मनाली, आगरबाजार, कॉलेजगल्ली, मुंबई २८ डी डी

६. मालकी : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

मी, भीमराव बळवंत कुलकर्णी, असे जाहीर करतो की, वर दिलेली माहिती बरोबर व खरी आहे.

१५ मार्च १९७२

भीमराव कुलकर्णी
कार्यवाह, म. सा. परिषद


ANIL JOSHI M.B.B.S.
दवाखान्यासाठी फर्निचर ---- २०००=००
दवाखान्याचे भाडे ---- ३५०=००
औषधे ---- १५००=००
कंपाऊंडरचा पगार
लेटर पॅडस् इ. साहित्य ---- ५००=००
इतर खर्च ---- ३००=००



अनुक्रमणिका

